# अमर विश्व साहित्य

: ३ :

दहा इंग्लिश, पांच ग्रीक, तीन नॉर्वेजियन, दोन फ्रेंच, एक हंगेरियन मिळून
एकवीस नाटकें, दोन इंग्लिश व एक जर्मन मिळून तीन नाट्यकाव्यें आणि
एक ग्रीक लोककथा अशा पंचवीस जगप्रसिद्ध ग्रंथांचे सारांश

अनुवादक

**स. ह. मोडक**



**भारतीय ग्रंथ भवन, मुंबई १४**

मेसर्स हार्पर अँड ब्रदर्स, न्यू यॉर्क,
यांनी प्रकाशित केलेल्या
**मास्टरपीसेस ऑफ वर्ल्ड लिटरेचर इन् डायजेस्ट फॉर्म**
या ग्रंथावरून अनुवादित

पहिली मूळ इंग्रजी आवृत्ति : १९४९
दुसरी मूळ इंग्रजी आवृत्ति : १९५२
पहिली मराठी आवृत्ति : सप्टेंबर, १९६२

प्रकाशक :
कृ. रा. सामंत,
संचालक,
भारतीय ग्रंथ भवन, मुंबई १४

मुद्रक :
बा. ग. ढवळे,
कर्नाटक मुद्रणालय,
चिराबाजार,
मुंबई २

# अनुक्रमणिका

# ऋण निर्देश

पुढील कॉपीराइट ग्रंथांचा या भागांत उपयोग करण्यासप रवानगी दिल्या-बद्दल आम्ही त्या त्या ग्रंथांच्या लेखकांचे वा प्रकाशकांचे आभारी आहोंत :

**डियर ब्रूटस**, लेखक जेम्स एम्. बॅरी; 'द प्लेज ऑफ जेम्स् एम्. बॅरी' या ग्रंथांतून; प्रकाशक चार्ल्स क्रिब्नर्स सन्स यांच्या परवानगीनें; कॉपीराइट, १९१४, चार्ल्स स्क्रिब्नर्स सन्स यांचा, १९१८, १९२८, जे. एम. बॅरी यांचा. **द डिनास्ट्स**, लेखक थॉमस हार्डी; प्रकाशक द मॅकमिलन कंपनी यांच्या परवानगीनें; कॉपीराइट, १९०४, द मॅकमिलन कंपनी यांचा; पुन्हां नव्यानें घेतलेला कॉपी-राइट १९३१, द मॅकमिलन कंपनी यांचा. **फाऊस्ट**, लेखक योहान्न वुल्फगांग फॉन गटे, प्रकाशक आल्फ्रेड ए. नॉफ इन्कॉर्पोरेटेड. **जस्टिस**, लेखक जॉन गाल्सवर्दी; 'प्लेज,' लेखक जॉन गाल्सवर्दी, या ग्रंथांतून; प्रकाशक चार्ल्स स्क्रिब्नर्स सन्स यांच्या परवानगीनें; कॉपीराइट, १९०९, १९१०, जॉन गाल्सवर्दी यांचा, १९२८, चार्ल्स स्क्रिब्नर्स सन्स यांचा. **घोस्ट्स**, लेखक हेन्रिक इब्सेन; प्रकाशक चार्ल्स स्क्रिब्नर्स सन्स. **हेड्डा गॅब्लर**, लेखक हेन्रिक इब्सेन; प्रकाशक चार्ल्स स्क्रिब्नर्स सन्स. **लिलियोम**, लेखक फेरेन्क मोल्नार; अनुवादक बेंजामिन एफ्. ग्लेझर; खुद्द लेखक आणि त्याचे एजंट पॅरामाउंट पिक्चर्स इन्कॉर्पोरेटेडचे डॉक्टर एडमंड पॉकर यांच्या आणि प्रकाशक लाइव्हराइट पब्लिशिंग कॉर्पोरेशन यांच्या परवान-गीनें; कॉपीराइट, १९२१, बोनी अँड लाइव्हराइट इन्कॉर्पोरेटेड यांचा; पुन्हां नव्यानें घेतलेला कॉपीराइट, १९४९, फेरेन्क मोल्नार यांचा. **लॉयल्टीज**, लेखक जॉन गाल्सवर्दी; 'प्लेज,' लेखक जॉन गाल्सवर्दी, या ग्रंथांतून; प्रकाशक चार्ल्स स्क्रिब्नर्स सन्स यांच्या परवानगीनें; कॉपीराइट, १९०९, १९१०, जॉन गाल्सवर्दी यांचा, १९२८, चार्ल्स स्क्रिब्नर्स सन्स यांचा.

# कॅमील

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* अलेक्झांडर ड्यूमा, धाकटा (१८२४-१८९५). *कथानकाचा प्रकार :* भावनाप्रधान अद्भुतरम्यता. *काळ :* एकोणिसावें शतक. *स्थळ :* फ्रान्स. *पहिला प्रयोग :* १८५२.

*प्रमुख पात्रें :* **कॅमील गॉतिये**, पॅरिस शहरांतील एक स्त्री. **नानीने**, तिची मोलकरीण. **कौंट द वारविल्ले**, कॅमीलची अभिलाषा धरणारा. **आर्मां दुवाल**, तिच्यावर प्रेम करणारा. **मशूर दुवाल**, आर्मां याचे वडील. **मादाम प्रूडन्स**, कॅमीलची मैत्रीण.

*समीक्षण :* 'कॅमील' ही कथा १८४८ सालीं कादंबरी म्हणून प्रसिद्ध झाली असली तरी १८५२ सालीं नाटकाच्या स्वरूपांत प्रथम सादर झाली आणि नाटक म्हणूनच ती अधिक विख्यात आहे. 'कॅमील' या नाटकानें फ्रेंच रंगभूमीवर सामाजिक व नैतिक प्रश्न नव्या धर्तीनुसार सादर केले आणि टीकाकारांनीं त्याचें सकौतुक स्वागत केलें. आधुनिक प्रेक्षकांना कॅमील व तिचीं प्रेमप्रकरणें यांची कहाणी कांहींशी अतिरंजित वाटते. कारण या नाटकांतील पात्रें भावनाप्रधान व अवास्तव आहेत. परंतु त्यांत सादर केलेला नैतिक प्रश्न हा कोणत्याहि समाजांत अस्तित्वांत असतो, मग हा समाज आधुनिक असो किंवा हजार वर्षांपूर्वीचा असो.

*कथानक :* कॅमील गॉतिये ही पॅरिस शहरांतील एक कम-लौकिकवान स्त्री होती. तिच्या स्वभावाचें प्रतीक म्हणजे चीनजपानमधील कॅमेल्लियाचें फूल. निस्तेज आणि निर्विकार. एका काळीं ती शिंपीण होती. बाग्नेरे येथें प्रकृति सुधारण्यासाठीं ती विश्रांति घेत असतां एका श्रीमंत ड्यूकनें तिच्याशीं मैत्री जोडली. कारण त्या ड्यूकच्या मुलीचा व हिचा तोंडवळा सारखा होता. मुलगी वारल्यावर ड्यूकनें आपल्याबरोबर कॅमील हिला पॅरिसला परत नेलें आणि शिष्ट समाजांत तिचा शिरकाव करून दिला. पण कुठल्या तरी मार्गानें कॅमीलच्या पूर्वचरित्राच्या अफवांचें पीक पॅरिसच्या राजरस्त्यांवरून फोफावत गेलें आणि शिष्ट समाज तिच्याकडे कपाळावर आठ्या आणून बघूं लागला. ती खऱ्या प्रेमासाठीं हपापलेली असून पॅरिस शहरांतील ख्यालीखुशालीच्या जीवनाला रामराम ठोकूं इच्छिते, ही गोष्ट ठाऊक असलेले कांहीं थोडे मित्रच तेवढे

तिच्याविषयीं आदर दर्शवीत असत. पत्त्यांच्या जुगारांत हरल्यामुळें तिला खूप कर्ज झालें आणि सावकारांचें कर्ज फेडण्यासाठीं तिच्याजवळ स्वतःचे असे पैसे मुळीं राहिलेच नाहींत.

तिचा ताजा चाहता कौंट द् वारविल्ले यानें तिचीं सगळीं कर्जें फेडण्यासाठीं पैसे देऊं केले. पण एक अट घातली. तिनें त्याची रखेली झालें पाहिजे. पण तिनें या गोष्टीला संमति देण्यापूर्वीच आर्मो दुवाल याच्याशीं तिची गांठ पडली. आर्मोजवळ तिला देण्याजोगें स्वतःच्या प्रेमाखेरीज दुसरें कांहींच नव्हतें. तिला कपडे पुरविणारी दुकानदारीण मादाम प्रूडन्स हिनें तिचा त्याच्याशीं परिचय करून दिला होता. मादाम प्रूडन्स ही तिची मैत्रीण असण्याचा बहाणा करीत असे. परंतु कॅमील सढळ हातानें पैसे खर्च करणारी आहे येवढ्याच कारणासाठीं तिच्याशीं या बाईची लगट होती.

पहिल्या प्रथम आर्मोच्या प्रेमाचा कॅमीलनें अव्हेरच केला. कारण साध्यासुध्या जीवनासाठीं ती हपापलेली असली तरी प्रत्यक्ष गरिबींत दिवस काढणें तिला सर्वस्वीं अशक्य होतें. परंतु आर्मोनें आपला अनुनय चिकाटीनें चालू ठेवला. आणि शेवटीं कॅमीलनें त्याच्या प्रेमयाचनेला प्रतिसाद दिला आणि त्याला सांगितलें कीं "मी माझा सध्यांचा मित्रपरिवार सोडून तुझ्याबरोबर कुठं तरी दूर जावं म्हणत्यें." तिला खोकल्याचा फार त्रास होत होता, म्हणून तिनें पॅरिस शहर सोडून कुठल्या तरी निवांत ठिकाणीं जावें आणि तिथें तिनें विश्रांति घ्यावी व ताज्या हवेचा फायदा घ्यावा अशी आर्मोची इच्छा होती.

म्हणून कॅमील, आर्मो व तिची मोलकरीण नानीने अशीं तिघें ग्रामीण विभागांतील एका पर्णकुटींत राहायला गेलीं. अनेक आठवडे आर्मोच्या मनांत कॅमीलविषयीं संशय डोकावत होता आणि त्याला अशी धास्ती वाटत होती कीं हिला आपल्या जुन्या दोस्तांच्या सहवासाअभावीं चुकल्याचुकल्यासारखें होत असावें. पण शेवटीं तिच्या खऱ्या प्रेमाविषयीं त्याची खात्री पटली, आणि आर्मोचा अस्वस्थपणा नाहींसा झाला, आणि आतां तीं दोघें सुखांत एकत्र कालक्रमणा करूं लागलीं. ती पॅरिस शहरीं नेहमीं कॅमेलियाचीं फुलें आपल्या अंगावर मिरवीत असे, त्यांऐवजीं आतां त्यानें बागेंत लावलेल्या फुलझाडांचीं फुलें काढून तीं अंगावर मिरवूं लागली.

पण त्यांचें हें सुख अल्पजीवी ठरलें. आर्मोचे वडील कॅमीलला भेटायला आले आणि त्यांनीं तिला अशी गळ घातली कीं " कसंहि करून तूं माझ्या मुलाला धुडकावून लाव." त्यांना तिचा पूर्वीचा बदलौकिक ठाऊक होता आणि त्यांना असें वाटत होतें कीं हिच्यापायीं आपल्या मुलानें स्वतःच्या व स्वतःच्या कुटुंबाच्या तोंडाला काळोखी फांसून घेतली. पण कॅमील त्यांचें ऐकेना. कारण आर्मोचें आपल्यावर प्रेम आहे आणि आपल्याशिवाय तो सुखी होणार नाहीं हें ती जाणून होती. मग आर्मोचें वडील तिला म्हणाले, "हें बघ, माझ्या मुलीचं एका गृहस्थाशीं लग्न ठरलंय. आणि त्या गृहस्थानं अशी धमकी दिली आहे कीं कॅमील व आर्मो यांनीं एकत्र राहण्याचा आग्रह कायम ठेवला तर आपण हें लग्न मोडून टाकणार." आर्मोच्या उपवर बहिणीविषयीं सहानुभूति वाटल्यामुळें कॅमीलचें अंतःकरण द्रवलें. तिनें त्याच्या वडिलांना असें वचन दिलें कीं " आपण कांहीं एक काळजी करूं नका. मी आपल्या चिरंजीवांना माझ्यापासून दूर करत्यें."

पण आपण आर्मोशीं दगलबाजी केल्याखेरीज तो आपल्याला सोडून जाणें अजिबात शक्य नाहीं हें ती जाणून होती, म्हणून तिनें त्याला असें सांगायचा बेत केला कीं, " माझं तुझ्यावर आतां मुळींच प्रेम राहिलेलं नाहीं. मी यापुढें पुन्हां माझा पूर्वीचा नित्यक्रम चालू करणार आहें." त्या वेळीं आर्मोच्या वडिलांना कळून आलें कीं हिचें आपल्या मुलावर खरोखरीचें प्रेम आहे. म्हणून त्यांनीं तिला असें वचन दिलें कीं " तुझ्या मृत्यूनंतर — ( कारण आपण लवकर मरणार असें तिला वाटत होतें. ) —मी आर्मोला खरी परिस्थिति सांगून टाकीन. केवळ त्याच्या कुटुंबाच्या इभ्रतीचं रक्षण व्हावं येवढ्याचसाठीं तूं त्याला धुडकावून लावलंस हें मी त्याला जरूर सांगेन."

पण असला धडधडीत खोटेपणा आर्मोशीं करणें आपल्याला कधींच जमणार नाहीं हें कॅमील जाणून होती. म्हणून तिनें त्याला उद्देशून एक चिठी लिहून ठेवली कीं " तूं माझ्यासाठीं ज्या साध्यासुध्या जीवनाची तरतूद केलीस त्याचा मला आतां अगदीं वीट आला आहे. आणि येवढ्याचसाठीं मी पॅरिस शहरीं द वारविल्ले यांजकडे परत जाऊं इच्छित्यें." ही चिठी वाचल्याबरोबर आर्मो बेशुद्धच झाला. त्याच्या वडिलांनीं त्याला आपल्या बाहुपाशांत सांवरलें.

त्यानें ती पर्णकुटी सोडून दिली. नंतर पॅरिस शहरहि सोडून दिलें. कित्येक आठवडे तो पॅरिसला परतलाच नाहीं. दरम्यान कॅमीलनें आपला खाक्या पूर्ववत्

चालू केला. ती आपला सगळा वेळ संगीतनाट्यगृहांत किंवा आपल्या जुन्या दोस्तांशीं पत्ते खेळण्यांत घालवूं लागली. कॅमेलियाचें फूल ती पूर्ववत् आपल्या अंगावर जाहीर रीतीनें सतत मिरवूं लागली. कौंट द वारविल्ले हा तिचा आतां सततचा सवंगडी झाला. तरी पण तिचें हृदय मात्र अजूनहि आर्मोच्याच प्रेमासाठीं हपापून राहिलेलें होतें. तिचा खोकल्याचा विकार खूपच बळावला. आतां आपण लवकरच मरणार हें तिला कळून चुकलें, तेव्हां आर्मोची पुन्हां एकदां भेट व्हावी यासाठीं तिचा जीव कासावीस झाला.

शेवटीं कॅमील व आर्मो यांची भेट एकदांची झाली. त्या वेळीं आर्मोनें तिची व कौंट द वार्विल्ले याची भयंकर बेइज्जत केली. त्यानें कॅमीलच्या अंगावर मोहरा फेंकल्या आणि ठासून सांगितलें कीं "तुझ्यासारख्यांना पकडायला व धरून ठेवायला असलंच आमिष हवं." आणि तिथें हजर असलेल्या लोकांसमक्ष त्यानें जाहीर केलें कीं "कौंट द वार्विल्ले हा माणूस पैसेवाला असला तरी अब्रूदार नाहीं." यावर द वार्विल्ले यानें या अपमानाबद्दल त्याला द्वंद्वयुद्धाचें आव्हान दिलें. आर्मोनें द्वंद्वयुद्धांत द वार्विल्ले याला जखमी केलें आणि पॅरिस शहराला रामराम ठोकला.

मग कॅमीलनें केलेला हा अपूर्व स्वार्थत्याग बघून आर्मोच्या वडिलांना स्वस्थ राहवेना. त्यांनीं त्याला पत्र लिहिलें कीं "कॅमीलच्या दगलबाजीपाठीमागची सत्य घटना मी तुला सांगतों. केवळ तुझ्या बहिणीच्या इज्जतीसाठीं व सुखासाठींच तिनं तुला सोडून जाण्याचं हें नाटक केलेलं आहे." हें पत्र मिळाल्यावर मात्र आर्मो पॅरिसला परत आला.

पण आर्मो परत येईपर्यंत कॅमील अगदीं मरणाच्या दाराशीं पोंचलेली होती. एकटी नानीने व कांहीं निष्ठावंत मित्रमंडळी येवढाच परिवार तिच्या सहवासांत राहिलेला होता. त्यांत मादाम प्रूडन्स ही देखील होती. कारण तशा दरिद्री अवस्थेंत सुद्धां कॅमीलनें आपल्याजवळ जें कांहीं होतें त्यांतला वांटा तिला दिलेला होता. कॅमील व नानीने या दोघी आतां एका लहानशा भिकारड्या जागेंत राहायला गेलेल्या होत्या. आणि तिथेंच आर्मो त्यांना भेटायला गेला. तो आला तेव्हां कॅमीलचे प्राण अगदीं कंठाशीं आलेले होते. पण तशा अवस्थेंत देखील, त्यानें एका काळीं तिला दिलेलीं साधींसुधीं फुलें तिनें पुन्हां आपल्या छातीवर लटकावलेलीं होतीं. तिला पाहातांच आर्मोनें तिचे पाय धरले. आपल्या

अमर प्रेमाची तिला ग्वाही दिली. तिची क्षमायाचना केली. अशा प्रकारें एका काळची स्वरूपसुंदर कॅमील, तिच्या छातीवर तिनें लटकावलेल्या फुलांप्रमाणेंच निर्जीव झालेली कॅमील, आपल्यावर खरेंखुरें प्रेम करणाऱ्या प्रियकराच्या बाहुपाशांत राहूनच इहलोक सोडून गेली.

## द सेन्सी

*वाङ्मयप्रकार* : नाट्यकाव्य. *लेखक* : पर्सी बिश शेले ( १७९२-१८२२ ). *कथानकाचा प्रकार* : अद्भुतरम्य शोकान्तिका. *काळ* : १५९९. *स्थळ* : रोम आणि ॲपेनाइन पर्वत. *प्रथम प्रकाशन* : १८१९.

*प्रमुख पात्रें* : **कौंट सेन्सी**, एक रोमन सरदार. **बिॲट्रिस**, त्याची कन्या. **बर्नार्डो**, त्याचा पुत्र. **गियाकोमो**, त्याचा दुसरा पुत्र. **ल्युक्रीशिया**, त्याची पत्नी व त्याच्या मुलांची सावत्र आई. **कौंट ऑर्सिनो**, बिॲट्रिसनें एका काळीं याच्यावर प्रेम केलें होतें ; हा जोगी झालेला असतो. **ऑलिम्पियो व मार्झियो**, सेन्सीचे मारेकरी. **साव्हेल्ला**, सेन्सीच्या खुनाचा यानें पत्ता लावला; हा पोपचा प्रतिनिधि असतो.

*समीक्षण* : या नाटकामध्यें अनेक वक्तृत्वपूर्ण व अंतःकरण हालवून सोडणारे प्रसंग असून देखील याला रंगभूमीवर यश लाभलें नाहीं. फार झालें तर हें एक वाचनीय नाटक आहे असें म्हणतां येईल. कारण रेनेसान्स ( युरोपांतील विचारक्रांती ) च्या अखेरच्या काळांतील एका वैशिष्ट्यपूर्ण शोकान्तिकेंतल्या घडामोडी नाट्यस्वरूपांत सादर करणें हाच हें नाटक लिहिण्यामागचा कवीचा हेतु होता.

*कथानक* : कौंट सेन्सी हा एक क्रूर व पाशवी माणूस होता. लोकांना दुःख भोगायला लावणें यांतच त्याला अत्यानंद वाटत असे. त्यानें आपले दोन मुलगे स्पेनमधील सालामांका या गांवीं धाडून दिले होते. त्याला अशी आशा वाटत होती कीं तिथें त्यांची उपासमार होईल. त्याची मुलगी बिॲट्रिस हिचें कौंट ऑर्सिनो याजवर प्रेम होतें, पण ऑर्सिनो मठांत जाऊन जोगी झाला होता. आपल्या जिवाचें सांत्वन कुणाकडून करून घ्यावें हें तिला कळेना म्हणून तिची अगदीं हैराणगत झालेली होती. तिचे वडील तिच्याशीं क्रूरपणानें वागण्याची कमाल करीत होते आणि तिचा प्रियकर तर जोगी होऊन बसलेला होता. शेवटीं तिनें कॅथोलिक धर्मपंथाचे प्रमुख पोपमहाराज यांना उद्देशून एक अर्ज तयार केला.

आपल्याला व आपल्या कुटुंबांतल्या सगळ्या माणसांना आपल्या वडिलांच्या हातून जो सतत छळ सोसावा लागतो त्यांतून आपल्याला मुक्तता मिळावी अशी त्या अर्जांत तिनें प्रार्थना केलेली होती. हा अर्ज आपण स्वतः पोपमहाराजांना सादर करूं असें ऑर्सिनोनें तिला वचन दिलें. मग बिॲट्रिसनें ऑर्सिनोला एक बातमी सांगितली. ती म्हणाली, "आज रात्रीं माझे बाबा एक मेजवानी देणार आहेत. सालामांकाहून कसली तरी बातमी आलेली आहे आणि या आनंददायक बातमीच्या प्रीत्यर्थ ही मेजवानी देण्याचं बाबांनीं ठरवलं आहे. त्या वेळीं मी हा अर्ज तुझ्या हातीं देईन."

ती निघून गेल्यावर ऑर्सिनोनें स्वतःसमोर उभ्या असलेल्या समस्येचा विचार केला. मग त्यानें असें ठरविलें कीं बिॲट्रिसचा अर्ज पोपमहाराजांना दाखवायचाच नाहीं. कारण जर का हा अर्ज आपण पोपमहाराजांना दाखविला, तर पोपमहाराजांच्या आदेशानुसार तिचें लग्न होईल आणि आपल्याला लग्नाशिवाय तिचें अंतःकरण जिंकण्याची संधीच शिल्लक राहणार नाहीं. त्याचप्रमाणें त्यानें असेंहि ठरविलें कीं आपण लग्न करण्याची खास परवानगी पोपमहाराजांजवळ मागायचीच नाहीं. कारण आपण जर लग्न केलें तर खिस्ती मठांतून आपल्याला जी मोठी कमाई होते तिला आपण मुकूं.

त्या रात्रीं मेजवानीच्या वेळीं कौंट सेन्सीनें या समारंभाचा उद्देश जाहीर केला. तो म्हणाला, "माझे दोघे मुलगे सालामांका शहरीं अपघातांत ठार झाले. त्यांना आज्ञाभंग करण्याची व बंडखोरीची वाईट खोड जडलेली होती. म्हणून त्यांना अपघाती मृत्यूच्या रूपानं ही जी शिक्षा मिळाली ती अगदीं यथायोग्यच होती. आणि म्हणून या आनंददायक प्रसंगानिमित्त मी सर्वांना मेजवानीला बोलावलं आहे."

हें ऐकल्यावर तिथें जमलेल्या पाहुणे मंडळींचा पहिल्या प्रथम स्वतःच्या कानांवर विश्वासच बसेना. मग बिॲट्रिस धिटाईनें पुढें सरसावली व पाहुण्यांना उद्देशून म्हणाली, "बाप हो, मजवर, माझ्या सावत्र आईवर व माझ्या उरलेल्या दोघां भावांवर आपण दया करा. माझ्या वडिलांच्या हातून आमचा जो आणखी छळ होणार आहे त्यांतून आमची सुटका करा." यावर कौंट सेन्सी पाहुण्यांना उद्देशून म्हणाला, "माझ्या मुलीचं डोकं ठिकाणावर नाहीं. तिचं बोलणं तुम्ही मनावर घेऊं नका. तुम्ही आतां इथून निघूनच जा कसे." मग तो आपल्या

मुलीकडे वळून तिला म्हणाला : "थांब अशी. तुला मी आतां माझा इंगाच दाखवितों."

मग कौंट सेन्सीनें आपल्या मुलीला व पत्नीला फर्मावलें : "येत्या सोमवारीं तुम्ही दोघींनीं माझ्याबरोबर ॲपेनाइन पर्वतावरील माझ्या किल्ल्यांत आलं पाहिजे. आतांपासून तिकडे जाण्याच्या तयारीला लागा."

सेन्सीच्या वाड्यांत बिॲट्रिसनें आपल्या सावत्र आईला एक गुपित उघड करून सांगितलें. ती म्हणाली : "बाबांनीं इथं माझ्यावर येवढा भयंकर अत्याचार केला आहे कीं त्याचं वर्णन करून सांगायचं मला धाडसच होत नाहीं."

मग ऑर्सिनो या मायलेकींना वाड्यांत भेटायला आला व कौंट सेन्सीच्या खुनाची एक योजना त्यानें त्यांच्यापुढें सादर केली. तो म्हणालाः "ॲपेनाइन पर्वताकडे जाण्याच्या वाटेवर एक पूल आहे. तिथं मी दोघां बेडर मारेकऱ्यांना आणून ठेवतों. ते मोठ्या आनंदानं कौंट सेन्सीचा खून करतील."

दोघी मायलेकी ऑर्सिनोबरोबरचें हें बोलणें आटपून त्या दालनांतून बाहेर गेल्याबरोबर कौंट सेन्सीचा धाकटा मुलगा गियाकोमो आंत आला. त्यानें ऑर्सिनोला सांगितलें : "माझ्या लग्नांत माझ्या बायकोकडून आलेली हुंड्याची रक्कम मी बाबांना उसनवार म्हणून दिली. पण त्यांच्याकडून ती मला कधीं परतच मिळाली नाहीं." वस्तुतः कौंट सेन्सीनें गियाकोमोवर उलट असा अरोप केला होता कीं "तूंच हे सगळे हुंड्याचे पैसे एका रात्रींत चंगीभंगीपणा करण्यांत उडवून टाकलेस." येवढ्यावरच कौंट सेन्सी थांबलेला नव्हता. त्यानें गियाकोमोच्या बायकोजवळ म्हणजे स्वतःच्या सुनेजवळ अशी कागाळी करून ठेवलेली होती कीं "तुझा नवरा चोरूनमारून वाटेल तशी उधळपट्टी व रंगढंग करतो."

ऑर्सिनोनें गियाकोमोची समजूत घातली. तो म्हणालाः "ते पैसे तुला आतां कधींच परत मिळायचे नाहींत. पण तूं आतां काळजी करूं नकोस. तुझ्या वडिलांचा खून करण्याची सर्व योजना आम्ही आंखून ठेवलेली आहे."

मागाहून ऑर्सिनोनें येऊन गियाकोमोला अशी बातमी सांगितली कीं : "तुझ्या वडिलांना ठार करायचा कट फसला. ते सहीसलामत ॲपेनाइन पर्वतावरील आपल्या किल्ल्यावर जाऊन पोंचले." यावर गियाकोमो म्हणाला :

" आतां मीच माझ्या हातांनीं माझ्या बाबांचा खून करतों." तेव्हां ऑर्सिनोनें त्याला आंवरलें आणि सांगितलें : " आतां आपण असं करूं या. तुझे बाबा कौंट सेन्सी यांनीं ज्यांच्यावर अन्याय केला आहे असे दोघे इसम माझ्या ओळखीचे आहेत. ते आपल्या जुलुमकर्त्याचा या जगांतून कायमचा नायनाट करायचं काम खुषीनं पतकरतील."

तिकडे ॲपेनाइन पर्वतावरील किल्ल्यामध्यें कौंट सेन्सी आपली मुलगी व पत्नी यांना बरोबर घेऊन गेलेला होता. तिथें आपल्या मुलीच्या उर्मटपणाबद्दल तो संतप्तपणें गर्जत होता. त्यानें आपली पत्नी ल्युक्रीशिया हिच्याजवळ कबूलच केलें कीं "मी बिॲट्रिसचा आत्मा बिघडवून टाकण्याचा प्रयत्न केला. या कार्टीला तिच्या उर्मटपणाबद्दल अशीच अद्दल घडविली पाहिजे."

मग कौंट सेन्सी झोंपीं गेला. ही संधि साधून ऑलिम्पियो व मार्झियो हे दोघे मारेकरी तिथें हजर झाले. ल्युक्रीशियानें त्यांना सांगितलें कीं " तुम्ही अगदीं निर्धास्तपणानं खून करा. कौंटसाहेबांनीं झोपायच्या अगोदर जें पेय घेतलं त्यांत मीं गुंगीचं औषध घालून ठेवलं होतं. ते आतां अगदीं गाढ झोपलेले आहेत."

पण ते दोघे मारेकरी खून करायला कचरूं लागले. ऑलिम्पियो म्हणाला : " म्हाताऱ्या माणसाला तो झोंपलेला असतांना ठार मारायचं काम आपल्याला कांहीं जमायचं नाहीं बुवा." मार्झियो म्हणाला : " मला असा भास होतोय कीं माझ्या स्वतःच्या मृत वडिलांचं भूत झोपलेल्या कौंटसाहेबांच्या ओठांतून मला इशारा देतंय व खून करूं नको म्हणून बजावतंय."

दोघां मारेकऱ्यांचे हे भेकडपणाचे उद्गार ऐकून बिॲट्रिस संतापली. तिनें त्यांच्या हातांतला खंजीर हिसकावून घेतला आणि ती त्यांना दरडावून म्हणाली : " भेकडांनो, व्हा बाजूला. मी स्वतःच या सैतानाला ठार करून टाकत्यें."

तिचा हा रुद्रावतार बघून ते मारेकरी शरमले आणि ते स्वतःच कौंट सेन्सीचा खून करायला तयार झाले. त्यांनीं कौंटचा गळा दाबून खून केला आणि त्याचें शव कठड्यावरून बागेंत फेंकून दिलें.

तेवढ्यांत पोपमहाराजांचा प्रतिनिधी साव्हेला हा वारंट घेऊन तिथें हजर झाला. कौंट सेन्सीच्या गुन्ह्यांबद्दल त्याला ताबडतोब प्राणदंडाची शिक्षा देण्याचा हुकूम त्या वारंटांत होता. परंतु साव्हेला व त्याचे सहकारी येऊन

पाहतात तों कौंट सेन्सी अगोदरच मरून पडलेला होता. तेव्हां त्यांनीं त्याच्या मृत्यूची चौकशी आरंभली.

पाहरेकऱ्यांनीं मार्झियोला पकडून त्याची झडती घेतली. त्या दोघां मारेकऱ्यांची ओळख करून देण्यासाठीं ऑर्सिनोनें दिलेली चिठ्ठी त्यांना मार्झियोच्या खिशांत सांपडली. चिठ्ठींतलें हस्ताक्षर कुणाचें आहे असें साव्हेल्लानें विचारलें तेव्हां ल्युक्रीशिया व बीॲट्रिस या दोघी मायलेकींनीं आपल्याला तें ठाऊक नाहीं असें सांगितलें. तरी देखील साव्हेल्लानें त्यांना अटक केली आणि तो त्यांना म्हणाला, "तुम्ही दोघींनीं रोम येथील कोर्टांत हजर राहिलेंच पाहिजे."

ऑर्सिनोनें लढविलेल्या क्लृप्तीपायीं गियाकोमो नेमका रोमन पोलिसांच्या हातीं सांपडला. स्वतः ऑर्सिनो मात्र वेष पालटून पसार झाला.

खटल्याच्या वेळीं परस्परविरोधी साक्षीपुरावा कोर्टासमोर आल्यामुळें खुनाच्या आरोपांत खुद्द सेन्सी कुटुंबच सांपडलें. बिॲट्रिसनें या निरपराधी लोकांचे प्राण वांचविण्यासाठीं मार्झियोच्या नाना प्रकारें विनवण्या केल्या. परंतु या मारेकऱ्यानें आपल्या जबाबांत कांहीं एक बदल न करतां मुकाट्यानें मरण पतकरलें.

पोपसाहेबांच्या अंतिम निर्णयाची वाट बघत सेन्सी कुटुंब तुरुंगाच्या कोठड्यांमध्यें हालअपेष्टा भोगत राहिलें. बिॲट्रिसनें आपल्या सावत्र आईला धीर देण्याचा प्रयत्न केला. पण त्याचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं.

शेवटीं पोपसाहेबांचा हुकुम आला कीं सेन्सी कुटुंबांतील सगळ्यांनीं देहान्त प्रायश्चित्त भोगलें पाहिजे. हा निर्णय ऐकून बिॲट्रिस तर पहिल्या झटक्यालाच निराशेनें वेडीपिशी झाली. मग तरुण व निरपराधी बर्नार्डो पोप-महाराजांकडे दयेची याचना करायला गेला. पण आपला दयेचा अर्ज फेटाळण्यांत आल्याची बातमी घेऊन बिचारा बर्नार्डो हताश व दुःखीकष्टी होऊन परत आला. पाहरेकरी या मंडळींना शेवटीं फांशीं देण्यासाठीं तुरुंगाच्या कोठड्यांशीं आले. बिॲट्रिस व तिची सावत्र आई या दोघींनीं धीरोदात्त वृत्तीनें मन घट्ट करून मोठ्या अभिमानानें फांसावर जाण्यासाठीं प्रयाण केलें.

# द सिद

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* प्येर कोर्नीली ( १६०६-१६८४ ). *कथानकाचा प्रकार :* अद्भुतरम्य शोकान्तिका. *काळ :* अकरावें शतक. *स्थळ :* सेव्हिल ( स्पेन ). *पहिला प्रयोग :* १६३६.

*प्रमुख पात्रें :* **डॉन फर्नांद,** कॅस्टील प्रांताचा राजा. **डॉना उराको, इन्फान्ता,** फर्नांद राजाची कन्या. **डॉन दियेग,** रॉड्रीग याचे वडील. **डान गोम्स,** चिमेने हिचे वडील. **डॉन रॉड्रीग,** चिमेने हिचा वाग्दत्त वर. **डॉन सांचे,** याचें चिमेने हिजवर प्रेम असतें . **चिमेने,** डॉन गोम्स याची कन्या.

*समीक्षण :* फ्रान्स देशामध्यें " ' द सिद ' याच्या इतका चांगला " ही एक म्हणच रूढ झालेली आहे. आणि कोणत्याहि गोष्टीची खूप प्रशंसा करतांना या म्हणीचा उपयोग करतात. ' द सिद ' हें नव-अभिजात परंपरेंतील शोकान्त नाटक आहे. कोर्नीली याच्या कलाकृतींमध्यें हें नाटक सर्वोत्कृष्ट असल्याचें सर्व-साधारण मत आहे. नाटकाचा विषय खुद्द माणूस हाच असून या आत्मसमर्पणात्मक शोकान्तिकेमध्यें नायक स्वतःच आपलें भवितव्य निश्चित करून ठेवतो.

*कथानक :* आपण स्वतः राजकन्या. राजघराण्यांतली. यामुळें इन्फान्ता हिला वाटलें कीं आपल्यापेक्षां खालच्या दर्जाच्या सरदार घराण्यांतला रॉड्रीग याच्यावर आपल्याला उघडपणें प्रेम करतां येणार नाहीं. म्हणून तिनें चिमेने व रॉड्रीग या उभयतांमधील वाढत्या प्रेमसंबंधाला उत्तेजन दिलें. चिमेने हिनें आपले वडील डॉन गोम्स यांना अशी मुभा देऊन ठेवली कीं " आपले जामात म्हणून तुम्ही रॉड्रीग वा सांचे या दोघांपैकीं कोणाचीहि निवड करावी. " आणि आपले वडील कुणाची निवड करतात याची ती हुरहुरत्या अंतःकरणानें वाट बघत राहिली. तिचे वडील राजदरबारांत जायला निघालेले होते आणि लवकरच तिला त्यांचा निर्णय ऐकायला मिळणार होता. डॉन गोम्स यांनीं कसलेहि आढेवेढे न घेतां रॉड्रीग याचीच निवड केली. आणि याचें मुख्य कारण म्हणजे रॉड्रीगचे वडील डॉन दियेग यांची कीर्ति.

यानंतर लवकरच राजदरबारांत एक नवीच गुतागुंत निर्माण झाली. राजेसाहेबांनीं आपले चिरंजीव, युवराजमहाराज, आपल्या पश्चात् आपल्या गादीचे वारस, यांचे गुरु म्हणून डॉन दियेग यांची निवड केली. ही निवड

अन्यायकारक आहे असें डॉन गोम्स यांचें मत पडलें. तसें म्हटलें तर डॉन दियेग हे कॅस्टीलच्या राज्यांतील सर्वश्रेष्ठ योद्धे होते. परंतु आतां त्यांचें वय झालेलें होतें. म्हणून डॉन गोम्स यांना असें वाटत होतें कीं राज्यांतील सगळ्यांत जास्त महाप्रतापी सरदार आपण स्वतःच्च आहोंत. मग या निवडीवरून डॉन गोम्स व डॉन दियेग या दोघांचें कडाक्याचें भांडण जुंपलें. या भांडणाचे वेळीं डॉन गोम्स यांनीं डॉन दियेग यांजवर अन्यायानें भलताच्च आरोप केला. "तुम्ही खुशामत व बनवाबनवी करून राजेसाहेबांची मर्जी संपादन केलीत, आणि म्हणून तुम्हांला हें गुरुपद प्राप्त झालं" असें डॉन गोम्स यांनीं डॉन दियेग यांना चक्क तोंडावर सांगून टाकलें. येवढ्यावर हें वाक्ताडन थांबलें नाहीं. डॉन गोम्स यांनीं या संदर्भात असेंहि मत दिलें कीं "युवराजांना स्वतःचं जिवंत उदाहरण घालून देणारा असा गुरु पाहिजे. आपल्या पूर्व लौकिकावर गुजराण करणारा गुरु काय कामाचा?" आणि भांडण येवढ्या विकोपाला गेलें कीं संतापाच्या भरांत डॉन गोम्स यांनीं डॉन दियेग यांच्या ताडकन् श्रीमुखांत भडकावून दिली. त्या क्षणीं डॉन गोम्स यांजवर तरवार उपसण्याइतकें बळ डॉन दियेग यांच्या अंगीं नव्हतें. म्हणून हा अपमान आपल्याला निमूटपणें सहन करावा लागल्याबद्दल डॉन दियेग यांनीं स्वतःची तीव्र निर्भर्त्सना करून घेतली. आतां त्यांच्यापुढें एकच मार्ग शिल्लक होता. आपल्या कुळाची इज्जत राखण्याचें काम आपल्या तरुण मुलावर सोंपविणें हाच तो मार्ग.

म्हणून त्यांनीं आपला पुत्र रॉड्रीग याला आदेश दिला कीं "तूं डॉन गोम्स यांना द्वंद्वयुद्धाचं आव्हान दे आणि माझ्या मानहानीचा सूड घे." अशा प्रकारें एका बाजूला चिमेनेविषयींचें प्रेम आणि दुसऱ्या बाजूला कुळावरील अपमानाचा कलंक धुवून टाकण्याचें प्राप्त कर्तव्य अशा दोन परस्परविरोधी समस्यांच्या कात्रींत रॉड्रीग सांपडला. तरीहि त्यानें धीर करून आपले भावि श्वशुर डॉन गोम्स यांना द्वंद्वयुद्धाचें आव्हान दिलें. तसा रॉड्रीग हा कोवळ्या वयाचा तरुण. तशांत त्याच्या शौर्याचा कस अजून लागायचा होता. यामुळें हें आव्हान स्वीकारावें का नाहीं याविषयीं डॉन गोम्स यांच्या मनाची कांहीं काळ चलबिचल झाली. पण शेवटीं त्यांनीं आपल्या कन्येच्या प्रेमाचा याचक, आपला भावी जामात रॉड्रीग याचें आव्हान स्वीकारलें.

· आणि काय आश्चर्य ! या कच्च्या अननुभवी तरुणानें हां हां म्हणतां कॅस्टील राज्यांतील सर्वांत जास्त बलिष्ठ अशा योद्ध्याला पाणी पाजलें. ज्या गृहस्थाला आपले भावि श्वशुर म्हणून तो मोठा मान देत होता, त्यालाच त्यानें आपल्या तरवारीच्या फटक्यासरशीं लोळविलें. सारा दरबार रॉड्रीगचा हा पराक्रम पाहून स्तिमित झाला.

बिचारी चिमेने ! तिच्यावर हा केवढा भयंकर प्रसंग गुदरला ! आपल्या वडिलांचा मारेकरी ठरलेला रॉड्रीग हाच आपला प्रियकर असावा ना ! आतां आपण काय करावें ? वडिलांच्या खुनाचा बदला घ्यावा, का त्यांच्या मारेकऱ्याला क्षमा करून त्याच्याशीं विवाहबद्ध व्हावें ? शेवटी तिनें असें ठरविलें कीं आपल्या वडिलांच्या खुनाचा बदला हा घेतलाच पाहिजे. मग आपल्या प्रेमाचें कांहींहि होवो. म्हणून तिनें न्याय मागण्यासाठीं राजेसाहेबांसमोर अर्ज दाखल केला. असा अर्ज करण्याचा हक्क तिला होताच. यामुळें राजे डॉन फर्नांद यांना तिचें म्हणणें ऐकून घेणें भाग पडलें. भर दरबारांत या अर्जाची सुनावणी झाली. डॉन दियेग यांनीं आपल्या चिरंजिवांच्या कृतीचें जोरदार समर्थन केलें. त्यांनीं राजेसाहेबांना आवर्जून सांगितलें: " महाराज, माझ्या मुलाचा यांत काय दोष आहे बरं ? इभ्रतीसाठीं त्याला जें करणं भाग पडलं तेंच त्यानं केलं असं नाहीं का आपल्याला वाटत ? कुळाचं नांव उजळ राखण्यासाठीं अशा परिस्थितींत त्याला दुसरा कोणता मार्ग उपलब्ध होता तो आपणच सांगण्याची कृपा करावी."

या प्रकरणीं निर्णय काय द्यावा याची राजेसाहेबांना मोठीच पंचाईत पडली. परंतु तेवढ्यांत एक अकल्पित संकट दत्त म्हणून उभें राहिलें. उत्तर आफ्रिकेंतील मोरोक्कन मुसलमानांच्या फौजा सेव्हिल शहराच्या संरक्षक तटबंदी-जवळ येऊन थडकल्या. या भयंकर आक्रमणाचा प्रतिकार करणें हें राजेसाहेबांचें आद्य कर्तव्य होतें. म्हणून त्यांनीं चिमेनेच्या अर्जाचें प्रकरण तसेंच तहकूब ठेवून दिलें.

बिचारी चिमेने या लढाईचा शेवट काय होतो या गोष्टीकडे संमिश्र भावनांनीं लक्ष लावून बसली. शेवटीं कॅस्टीलचें लष्कर विजय मिळवून परतलें. दोन मोरोक्कन राजे या सैन्यानें आपल्याबरोबर कैद करून आणले. आणि हा विजय मिळविण्याच्या कामीं कॅस्टिलियन फौजेला स्फूर्ति देणारा व तिचें नेतृत्व करणारा साहसी वीर कोण होता बरें ? दुसरा कोण असणार ? चिमेनेचा प्रियकर

रॉड्रीग यानेंच हा अतुल पराक्रम गाजविलेला होता. राजेसाहेबांनीं कृतज्ञ होऊन या वीर पुरुषाला एक नवा किताब बहाल केला. ' द सिद ' हाच तो किताब. मोरोक्कन भाषेंतील हा शब्द असून त्याचा त्या भाषेंतील अर्थ ' सरदार ' असा आहे.

या सगळ्या प्रकारामुळें इकडे राजकन्या इन्फान्ता हिची तर फारच केविलवाणी अवस्था झाली. तिचा उच्च दर्जा लक्षांत घेतां तिला रॉड्रीगवर प्रेम करतां येत नसलें तरी ' द सिद ' याजवर प्रेम करण्याची तिला साहजिकच मुभा होती. कारण ' द सिद ' हा उच्च श्रेणीचा सरदार व कॅस्टीलचा पराक्रमी वीर पुरुष होता. असें असूनहि तिनें चिमेने हिचा रॉड्रीगवरचा अग्रहक्क मान्य केला आणि स्वतःच्या प्रेमभावनेला धीरोदात्तपणें आंवर घातला.

चिमेने मात्र अजूनहि आपल्यावरील अन्यायाची दाद मागण्याला बांधलेली होती. तिनें आपल्या अर्जाच्या फेरसुनावणीची मागणी केली तेव्हां राजेसाहेबांनीं तिच्या खऱ्या भावनांची कसोटी पाहण्याचें ठरविलें. आणि ती जेव्हां दरबारांत दाखल झाली तेव्हां राजेसाहेबांनीं गंभीर मुद्रा करून तिला सांगितलें कीं " रॉड्रीग लढाईत जखमी झाला आणि त्या जखमांपायींच अखेर त्याला मृत्यु आला." हें ऐकतां क्षणीं चिमेने बेशुद्ध होऊन पडली. ती शुद्धीवर आल्यानंतर राजेसाहेब तिला म्हणाले " बेटी, तुझं हृदय तुला जी प्रेरणा देत आहे त्या प्रेरणेनुसारच तूं वागलं पाहिजेस. त्यांतच तुझं कल्याण आहे. तूं वडिलांच्या मृत्यूचा सूड घेण्याचं हें तुझं वेड आपल्या डोक्यांतून काढून टाक बघूं."

परंतु चिमेनेच्या मनावर या युक्तिवादाचा कांहींएक परिणाम झाला नाहीं. प्रेमापेक्षां कर्तव्य श्रेष्ठ आहे, ही आपली भूमिका तिनें कायम ठेवली. म्हणून त्या काळच्या सरंजामी युगाला साजेशा रीतीनुसार तिनें अशी मागणी केली कीं " माझ्या वतीनं माझ्या वडिलांच्या खुनाचा बदला घेणारा पुरस्कर्ता पसंत करायचा मला हक्क आहे. हा हक्क अमलांत आणायची मला राजेसाहेबांनीं कृपावंत होऊन परवानगी द्यावी. "

तशी परवानगी तिला देणें राजेसाहेबांना भागच होतें. आणि या संधीचा फायदा घेऊन चिमेनेचा कृपाप्रसाद मिळतो का बघावा या विचारानें सांचे पुढें सरसावला. त्यानें चिमेनेला सांगितलें कीं " मी

रॉड्रीगला द्वंद्वयुद्धाचं आव्हान देऊन डॉन गोम्स यांच्या खुनाचा बदला घ्यायला तयार आहें. तूं मला आपला पुरस्कर्ता म्हणून पसंत कर." चिमेनेनें या गोष्टीला मान्यता दिली. शेवटीं राजेसाहेबांनीं असा निर्णय जाहीर केला कीं, "या द्वंद्वयुद्धामध्यें जो कोणी विजयी होईल त्याच्याशीं चिमेने हिनं लग्न केलं पाहिजे."

यानंतर रॉड्रीगनें खाजगी रीत्या चिमेने हिची भेट घेतली. प्रथम ती त्याच्यावर खूप संतापली. पण तेवढ्यांत रॉड्रीगनें तिला सांगितलें, "माझं ऐकून तर घे. या द्वंद्वयुद्धामध्यें मी तुझ्या इच्छेनुसार सांचेच्या हातून मरण पतकरायचं ठरवलं आहे. आतां तरी तुझी माझ्याबद्दल खात्री पटली ना?" हें ऐकतांक्षणीं तिचें अंतःकरण त्याच्याविषयींच्या प्रेमभावनेनें उचंबळून आलें. पुन्हां एकदां तिच्यापुढें प्रेम श्रेष्ठ का कर्तव्य श्रेष्ठ ही समस्या उभी राहिली. आणि तिनें रॉड्रीगला विनवून सांगितलें: "माझ्या प्रेमा, तूं हकनाक बळी जाऊं नकोस. तूं स्वतःचा बचाव करण्याचा जास्तींत जास्त प्रयत्न कर; तरच माझं समाधान होईल."

मग सांचे मोठ्या शौर्यानें रॉड्रीगबरोबर द्वंद्वयुद्ध करण्यासाठीं पुढें सरसावला. पण रॉड्रीगनें हां हां म्हणतां त्याच्या हातांतली तरवार उडवून लावली आणि आपण चिमेनेच्या पुरस्कर्त्याला ठार मारणार नाहीं असें जाहीर करून आपल्या दिलदारपणाचा प्रत्यय सगळ्यांना आणून दिला. इतकेंच नव्हे, तर त्यानें आपला स्वतःचा पराभव झाला असें दर्शविणारी खूण म्हणून आपली तरवार सांचे याच्या हातीं खुद्द चिमेने हिच्याकडे पाठवून दिली. आपला पुरस्कर्ता खुद्द रॉड्रीगची तरवार हातीं घेऊन आपल्याकडे येत आहे हें दृश्य बघतांक्षणीं चिमेनेला वाटलें कीं रॉड्रीग या द्वंद्वयुद्धांत ठार झाला असला पाहिजे. म्हणून ती तशीच धांवत धांवत राजेसाहेबांकडे गेली आणि म्हणाली: "महाराज, आपण आपला आदेश बदलण्याची कृपा करावी. कारण माझ्या प्रियकराच्या मारेकऱ्याशीं लग्न करण्याची कल्पनाहि मला सहन होणं शक्य नाहीं."

राजेसाहेबांनीं तिला खरा प्रकार समजावून सांगितला. द्वंद्वयुद्धांत रॉड्रीगनेंच कसा विजय मिळविला हें त्यांनीं तिला निवेदन केलें. आपलें खरें प्रेम कुणावर आहे हें अखेरीस तिनें उघडपणें जाहीर केलें याबद्दल तिचे भावि

श्वशुर डॉन दियेग यांनींहि तिची प्रशंसा केली. तरी देखील रॉड्रीगचा स्वीकार पति म्हणून करायला चिमेनेचें मन एकदम तयार होईना. तिच्या मनाची ही दुर्दशा राजेसाहेबांच्या ध्यानांत आली. तेव्हां त्यांनीं 'द सिद' याला मोरोक्कन मुसलमानांविरुद्ध चालू व्हावयाच्या मोहिमेचें नेतृत्व करण्यासाठीं दूर देशीं जाण्यास फर्माविलें. उभय प्रेमिकांच्या दरम्यान जें कटुतेचें खिंडार पडलेलें होतें तें बुजविण्यासाठीं कांहीं काळ जाऊं देणें हाच एकमेव इलाज आहे हें राजेसाहेब जाणून होते. तसे राजेसाहेब मोठे शहाणे होते.

## द क्लाउड्स : ढग

*वाङ्मयप्रकार* : नाटक. *लेखक* : ॲरिस्टोफेनीस (इ. स. पूर्व ४४८-३८५). *कथानकाचा प्रकार* : सामाजिक उपहासिका. *काळ* : इसवी सनापूर्वीचें पांचवें शतक. *स्थळ* : अथेन्स. *पाहिला प्रयोग* : इ. स. पूर्व ४२३.

*प्रमुख पात्रें* : **स्ट्रेपियाडीस**, एक अथेन्स-निवासी सद्गृहस्थ. **फिडिप्पिडीस**, त्याचा पुत्र. **सॉक्रेटीस**, एक सोफिस्ट तत्त्वज्ञानी.

*समीक्षण* : 'द क्लाउड्स' ही ॲरिस्टोफेनीसच्या अनेक आनंदपर्यवसायी नाटकांपैकीं सर्वांत अधिक प्रसिद्ध अशी एक नाट्यकृति आहे. हा ग्रीक नाट्यमहर्षि त्याच्या काळांतील सर्वश्रेष्ठ नाटककार म्हणून मान्यता पावलेला होता. अजून देखील आनंदपर्यवसायी नाटककारांमध्यें तो अग्रगण्य मानला जातो. आपल्या या नाटकामध्यें त्यानें विदूषकी थाटाची व उपहासाची अजब खुलावट वठविलेली आहे. अधून मधून या उपहासाला क्रूरपणाची व बोंचकपणाची धार आलेली आढळते. खऱ्याचें खोटें करून दाखविणाऱ्या सोफिस्टांच्या तत्त्वज्ञानावरील त्याचे टीकेचे हल्ले, स्ट्रेपियाडीस याला सॉक्रेटिसकडून मिळणारे तर्कशास्त्राचे धडे, आणि फिडिप्पिडीस यानें आपल्याच वडिलांना शिकविलेला धडा,—या सगळ्यांच्या योगानें अथेन्स-निवासी प्रेक्षकांना उच्च दर्जाच्या करमणुकीचे अनेक क्षण लाभले. सोफिस्टांचें तत्त्वज्ञान ॲरिस्टोफेनीस याला बिलकुल मान्य नव्हतें. सोफिस्टांना तो आदरशून्य व कृत्रिम विचार मांडणारे लोक समजत असे. आणि त्यांच्या शिकवणुकीचें विडंबन त्यानें प्रस्तुत 'द क्लाउड्स' या नाटकांत केलें.

*कथानक* : अथेन्स नगरींतील एक धनाढ्य सद्गृहस्थ स्ट्रेपियाडीस याला आपला बदफैली पुत्र फिडिप्पिडीस याच्या पायीं दारिद्र्याच्या व कर्जबाजारी-

पणाच्या खाईत पडावें लागलें. मुलाच्या सावकारांनीं त्याला सळो कीं पळो करून सोडलें. सर्वनाशांतून वांचण्यासाठीं काय इलाज करावेत याचा स्ट्रेपियाडीस विचार करूं लागला. त्याच्या कानांवर अशा बातम्या आल्या कीं सोफिस्टांनीं एका नव्या तर्कशास्त्राची शिकवण चालू केलेली आहे; या तर्कशास्त्राचा उपयोग आपल्या सावकारांच्या मनांत गोंधळ निर्माण करण्याच्या कामीं होऊं शकतो; अशा रीतीनें सावकारांच्या मनांत गोंधळ निर्माण केला कीं आपल्याला सावकारी कर्जांच्या कचाट्यांतून सुटतां येईल.

आपल्यापुढें उभ्या असलेल्या समस्येची सोडवणूक करण्याचा मार्ग सोफिस्टांच्या शिकवणुकींत सांपडण्याची शक्यता आहे असें एकंदरींत स्ट्रेपियाडीसला दिसून आलें. म्हणून त्यानें आपला पुत्र फिडिप्पिडीस याला असा आग्रह केला कीं "तूं सोफिस्टांच्या विद्यालयांत दाखल हो आणि त्यांचे नवे सिद्धान्त शिकून घे." फिडिप्पिडीसला विद्यार्जनापेक्षां घोड्यांच्या शर्यती खेळण्याची आवड अधिक होती. त्यानें वडिलांचें म्हणणें साफ धुडकावून लावलें आणि विद्यालयांत दाखल होण्यास चक्क नकार दिला. तेव्हां स्ट्रेपियाडीस खूप चिडला. त्यानें आपल्या मुलाचा धिक्कार केला. त्याच्या उधळीपट्टीबद्दल त्याची खूप खरडपट्टी काढली. आणि शेवटीं असें ठरविलें कीं आपण स्वतःच सोफिस्टांच्या विद्यालयांत दाखल व्हावें व त्यांची विद्या शिकून घ्यावी.

मग तो 'विचार-घरा' कडे गेला. सोफिस्टांच्या अभ्यासवर्गाला 'विचार करण्याचें विद्यालय ऊर्फ विचार-घर' असें म्हणत असत. तिथें त्यानें तत्त्वज्ञानी सॉक्रेटीस याची भेट मागितली. स्ट्रेपियाडीस यानें आपला येण्याचा हेतू समजावून सांगितला. तेव्हां सॉक्रेटीस त्याला नव्या विचारसरणीचे अनेक तर्कसिद्ध निष्कर्ष सोदाहरण समजावून सांगूं लागला. त्यावरून हें नवें तर्कशास्त्र सर्वनाशांतून व बेइज्जतींतून आपला बचाव करण्यास समर्थ आहे याची स्ट्रेपियाडीस याची आणखी अधिकच खात्री पटली. त्यानें आपल्याला त्या विद्यालयांत दाखल करून घेण्याची सॉक्रेटिसाला खूपच गळ घातली. शेवटीं सॉक्रेटिसानें त्याला एकदांचें 'विचार-घरा' मध्यें दाखल तर करून घेतलें.

पण दुर्दैवाची गोष्ट अशी कीं स्ट्रेपियाडीस याचें आतां वय झालेलें होतें. त्यामुळें अभ्यासवर्गामध्यें सोफिस्टांचें तंत्र आत्मसात करणें त्याच्या बुद्धीला झेपेना. तेव्हां सॉक्रेटिसानें याच्यावर एक तोड काढली. त्यानें असें

ठरविलें कीं स्ट्रेपियाडीसनें बाहेरच्या बाहेरच ही विचारविद्या शिकून घ्यावी. पण पुढें असा प्रकार झाला कीं सॉक्रेटिसानें काव्यविषयाला अनुलक्षून स्ट्रेपियाडीसला प्रश्न विचारले, आणि या प्रश्नांचीं मासलेवाईक उत्तरें ऐकून सॉक्रेटीस थक्कच झाला. त्या उत्तरांवरून स्ट्रेपियाडीसला काव्यविषयाविषयीं संपूर्ण अज्ञान असल्याचें सिद्ध झालें. शेवटीं सॉक्रेटिसानें आपला सपशेल पराभव कबूल केला आणि तो परत 'विचार-घरा'कडे चालता झाला. आपल्या सगळ्या बौद्धिक खटपटीची ही अशी दुर्दशा झालेली बघून स्ट्रेपियाडीसला स्वतःचाच भयंकर वीट आला. त्यानें असें ठरविलें कीं एक तर फिडिप्पिडीसला सोफिस्टांच्या विद्यालयांत जायला भाग पाडायचें, नाहीं तर त्याला घरांतून हांकलूनच द्यायचें.

वडिलांनीं फिडिप्पिडीसजवळ विद्यालयांत दाखल होण्याचा विषय दुसऱ्यांदां काढला. त्यानें पुन्हां या गोष्टीला आपला सक्त विरोध दर्शविला आणि या दुराग्रहाबद्दल वडिलांचा निषेध केला. पण शेवटीं नाइलाज म्हणून त्यानें वडिलांचें म्हणणें एकदांचें मान्य केलें. स्ट्रेपियाडीसला देखील वाटलें कीं आतां सगळें कांहीं ठीक होईल.

यानंतर कांहीं काळ असाच गेला. या मुदतींत आपल्या चिरंजिवांनीं विद्यार्जनामध्यें कशी काय प्रगति केली आहे याची माहिती घेण्यासाठीं स्ट्रेपियाडीस स्वतः चौकशी करायला गेला. फिडिप्पिडीस आतां अभ्यासामध्यें चांगलाच तरबेज झाला आहे असें सॉक्रेटिसानें त्याला आश्वासन दिलें. ही बातमी ऐकून स्ट्रेपियाडीसचा जीव भांड्यांत पडला. आपली योजना एकंदरीनें चांगलीच ठरली म्हणावयाची, अशी त्याला खात्री वाटली. आपल्या मुलानें आतां हें नवें तर्कशास्त्र तर शिकून घेतलेलें आहेच. तेव्हा त्याच्या जोरावर आपल्या सावकारांच्या तावडींतून आपण लवकरच सुटूं असा त्याला भरंवसा वाटायला लागला. त्यानें सॉक्रेटिसाला विनंति केली कीं "गुरुजी, जरा फिडिप्पिडिसला अभ्यासवर्गांतून बाहेर बोलावून घ्या बघूं." मुलाला बघतांक्षणीं स्ट्रेपियाडीसच्या डोळ्यांत आनंदाश्रु उभे राहिले. त्याचें कौतुक करून तो म्हणाला : "माझ्याच मुलानं मला कर्जाच्या खाईत लोटून दिलं होतं. आतां तोच मला यांतून वर काढणार, म्हणजे किती सुयोग्य अशी गोष्ट आहे ही!"

त्यानें फिडिप्पिडीसला आपल्या नव्या विद्येचा सोदाहरण प्रयोग दाखविण्यास सांगितलें. त्या नव्या तर्कशास्त्रांतील धूर्तपणाचे युक्तिवाद ऐकून स्ट्रेपियाडीस अक्षरशः स्तिमित झाला. योगायोग असा कीं त्याच क्षणीं स्ट्रेपियाडीसचा एक सावकार तिथें हजर झाला. " तुमच्या चिरंजिवांनीं एक घोडा खरेदी करण्यासाठीं माझ्याकडून पैसे कर्जाऊ घेतलेले आहेत, त्यांची तुम्ही आतांच्या आतां परतफेड केली पाहिजे," अशी त्या सावकारानें मागणी केली. सोफिस्टांच्या तालमींत शिकून तयार झालेला आपला पुत्र फिडिप्पिडीस कोणत्याहि सावकाराला कोर्टांत पाणी पाजल्याखेरीज राहणार नाहीं असा स्ट्रेपियाडीसला आत्मविश्वास वाटूं लागलेला होता. म्हणून त्यानें त्या सावकाराला एक कपर्दिकहि देण्याचें साफ नाकारलें. सावकारानें कोर्टांत जाण्याची धमकी दिली. तिला देखील त्यानें अजिबात जुमानलें नाहीं.

दुसऱ्या एका सावकाराची देखील त्यानें तशीच गत करून ठेवली. कोर्टांत दाखल झालेले सगळे दावे फिडिप्पिडीस आपल्या तर्कशास्त्रानुसार युक्तिवाद करून साफ उडवून लावील अशी त्याला बालंबाल खात्री होती. या आनंदांतच तो घरीं परत गेला.

परंतु सोफिस्टांच्या या शिकवणुकीचा प्रत्यक्ष प्रयोग फिडिप्पिडीसनें आपल्या घरीं सुरू केल्यावर मात्र एकंदर प्रकार वेगळाच असल्याचें दिसून आलें. तो स्ट्रेपियाडीसला उद्देशून म्हणाला : " बाबा, तुम्ही: मला अनेकदां माझ्या स्वतःच्या फायद्यासाठीं मारहाण केलेली आहे. तेव्हां आतां घरांत निर्माण झालेल्या आपल्या मतभेदाचं निराकरण करण्यासाठीं केवळ तुमच्या फायद्याप्रीत्यर्थच मी तुम्हांला मारहाण करतों आहे, आणि ती तुम्ही मुकाट्यानं सहन केला पाहिजे. " हें ऐकून म्हाताऱ्याला भयंकर चीड आली. पण बिचारा करतो काय ! फिडिप्पिडीसनें आपल्या नव्या तर्कशास्त्राच्या आधारें वडिलांचा सगळा विरोध मोडून काढला. इतकेंच नव्हे, तर त्यानें त्याच्याहि पुढें जाऊन वर अशी धमकी दिली : " बाबा, ज्या तत्त्वानुसार तुमच्या फायद्यासाठीं मी तुम्हांला मारहाण करतों आहे, त्याच तत्त्वानुसार माझ्या आईच्या फायद्यासाठीं मी तिलाहि मारहाण करायला चुकणार नाहीं. "

तेव्हां कुठें स्ट्रेपियाडीसच्या ध्यानांत आलें कीं हे सोफिस्ट तत्त्वज्ञानी आपल्या हिकमती तर्कशास्त्राच्या जोरावर सगळ्या प्रकारच्या पापांचें समर्थन करूं शकतात. अशा प्रकारची शिकवण अथेन्स शहरांतील तरुण पिढीला धोकादायक

आहे अशी त्याची ठाम समजूत झाली. या धोक्याचा नायनाट करण्यासाठीं त्यानें एक पलिता घेतला व ' विचार-घरा ' लाच आग लावून दिली. सॉक्रेटीस व त्याचे सोफिस्ट शिष्य या आततायीपणाचा निषेध करीत त्याच्यावर आग-पाखड करूं लागले. परंतु त्यांचा हा आरडाओरडा चालू असतांनाच ' विचार-घरां ' तून आगीच्या ज्वाळा उफाळून वर आल्या. स्ट्रेपियाडीस ही जाळपोळ शांत-पणें बघत राहिला. एक पाप या भूतलावरून आपण समूळ नष्ट करून टाकलें याविषयीं त्याची स्वतःची तरी पूर्ण खात्री पटली.

## डियर ब्रूटस

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* जेम्स एम्. बॅरी ( १८६०-१९३७ ). *कथानकाचा प्रकार :* अद्‌भुतरम्य कल्पनाविलास. *काळ :* ऐन उन्हाळ्यांतली सायंकाळ. *स्थळ :* इंग्लंड. *पहिला प्रयोग :* १९१७.

*प्रमुख पात्रें :* लॉब, शेक्सिपअरच्या ' मिडसमरनाइट्स ड्रीम ' या नाटकांत खोडकर पात्र म्हणून पूर्वीपासून गाजलेला ' पक '. मॅटी, त्याचा बबर्जी. लॉबच्या घरीं पाहुणचार घेण्यासाठीं आलेले निमंत्रित स्त्रीपुरुष पाहुणे.

*समीक्षण :* नाटककार बॅरी याचा एक सिद्धान्त आहे. मानवी जीवनांत अनुभवाला येणाऱ्या अडीअडचणी व्यक्तीच्या अपराधामुळें निर्माण होतात; तथाकथित ' कर्मा ' मुळें, दैवामुळें, त्या निर्माण होत नाहींत, हाच तो सिद्धान्त. या सिद्धान्ताचा विकास त्यानें ऐन उन्हाळ्यांतल्या सायंकाळासंबंधीं प्रचलित असलेल्या लोकभ्रमाचा उपयोग करून ' डियर ब्रूटस ' या नाटकांत मोठ्या कल्पकपणानें साधलेला आहे. या नाटकांत एकाच वेळीं कल्पनाविलास व वास्तववाद या दोन्ही गुणांचा समवाय झालेला आढळतो. त्यांतील पात्रांची रवानगी अवास्तवाच्या प्रदेशांत केलेली आहे म्हणून त्यांत कल्पनाविलासाला वाव मिळालेला आहे. आणि पात्रांचे विविध परस्परसंबंध त्यांत सर्वस्वी मनमोकळेपणानें वर्णन केलेले आहेत म्हणून तें वास्तववादीहि झालेलें आहे.

*कथानक :* रात्रीचा भोजनसमारंभ समाप्त झाला. लॉबच्या घरीं या समारंभानिमित्त जमलेल्या मंडळींपैकीं स्त्रिया उठून दिवाणखान्यांत परत जाऊन बसल्या. पुरुषमंडळींना त्यांनीं मनसोक्त धूम्रपान व मद्यपान करायला भोजन-

गृहांतच राहू दिले. घरांतला बबर्जी मॅटी यानें एका पाहुण्या बाईचे दागिने चोरलेले होते. बायामंडळींनीं त्याला आपल्याकडे बोलावून घेतलें आणि सांगितलें : " तूंच चोर आहेस. आम्हांला हें पक्कं ठाऊक आहे. बऱ्या बोलानं ते दागिने देऊन टाक. " मॅटीनें ते दागिने मुकाट्यानें जिचे तिला दिले. मग त्या महिला त्याला म्हणाल्या : " हें बघ, आम्ही तुझा हा गुन्हा कुणाला कळविणार नाहीं. पण एका अटीवर. आम्हांला या घरीं पाहुणचारार्थ कां बोलावलं हें तूं आम्हांला सांगितलं पाहिजेस. " मॅटी त्यांना या प्रश्नाचें सरळ उत्तर देईना. किंवा त्याला तें देतां आलें नाहीं असें म्हणा हवें तर. त्याच्याशीं महिलामंडळींचें जें संभाषण झालें, त्यांतून ज्या गोष्टी कळल्या त्या अशा :

या पाहुणेमंडळींचा यजमान ही एक रहस्यमय वल्ली आहे. हा कधींच म्हातारा होत नाहीं. याच्या बाबतींत वयाची गणना लागूच पडत नाहीं. शेक्सिपियरच्या ' मिड्समरनाइट्स ड्रीम ' या नाटकांतील दंतकथा-महशूर ' पक ' याचेंच लॅाब हें दुसरें नांव आहे.

मॅटीनें हेंहि कबूल केलें कीं " ऐन उन्हाळ्याच्या आठवड्यांत आमचे लॅाबसाहेब पाहुण्यांचे वेगवेगळे गट आपल्या घरीं मेजवानीला बोलावतात. हा त्यांचा नेहमींचा प्रघात आहे. " या नंतर त्यानें या महिलामंडळाला एक इशारा देऊन ठेवला. तो म्हणाला : " मेहेरबानी करून या ऐन उन्हाळ्याच्या सायंकाळीं तुम्ही कुणी इथल्या बागेच्या बाहेर जाण्याचं धाडस मात्र करूं नका. "

बागेबाहेरच्या जंगलांत न जाण्याचा हा इशारा देऊन तो निघून गेल्यानंतर महिलामंडळींनीं आजूबाजूला नजर टाकली. आणि त्या सगळ्या जणी बुचकळ्यांतच पडल्या. कारण त्या घराच्या आसपास कित्येक मैलांपर्यंत जंगलाचा मागमूसहि नव्हता.

मग यजमान लॅाब विचारमग्न मुद्रेनिशीं दिवाणखान्यांत दाखल झाला. त्याच्या पाठोपाठ मिस्टर कोएडे हे वृद्ध गृहस्थ आले. सरंजामी समाजव्यवस्थेवर एक प्रबंध लिहिण्याचा त्यांनीं संकल्प केलेला होता. आणि या प्रबंधासाठीं टिपणें जमा करण्याचें त्यांचें काम चाललेलें होतें. त्यांच्यासमवेत मिस्टर पर्डी हे बुद्धिजीवी तरुण बॅरिस्टरहि आंत आले. कोएडे व पर्डी या उभयतांनीं तिथें हजर असलेल्या मंडळींना अशी सूचना केली कीं " चला आपण एका रहस्यमय जंगलाचा शोध लावण्यासाठीं फेरफटका करून येऊं या. " तेव्हां लॅाब त्यांना

उद्देशून धूर्तपणानें म्हणाला : " अहो, पण खेडवळ लोकांचं या बाबतींतलं मत आपणाला ठाऊक आहे काय ? त्यांचं म्हणणं असं आहे कीं ऐन उन्हाळ्यांतच दर सायंकाळीं आसपासच्या भागांत वेगवेगळ्या ठिकाणीं जंगल अवतीर्ण होत असतं. आज इथं तर उद्यां तिथं, असा त्याचा थारेपालट चालतो. " पाहुण्यांच्या कुतूहलाला आणखी धार चढावी म्हणून लॉबनें आपल्या कानांवर हात ठेवले आणि या गोष्टीवर आपला मुळींच विश्वास नसल्याची बतावणी केली. पाहुणे मात्र या साहसाची तयारी करण्याच्या उद्योगाला लागले.

लॉबकडे आलेल्या पाहुणे मंडळीमध्यें लेडी कॅरोलिन लॅनी ह्या बाई होत्या. या लेडीसाहेब अविवाहित असून इतरांविषयीं तुच्छता दाखविणें हा त्यांच्या वृत्तीचा एक स्थायीभाव होता. दुसऱ्या पाहुणे बाईचें नांव होतें जोआन्ना ट्राऊट. या ट्राऊटबाई एकाकी जीवन कंठत असून त्यांचें प्रेमावर प्रेम जडलेलें होतें.

जोआन्ना आणि मिस्टर पर्डी या उभयतांनीं घरांतल्या सर्वांचा वावर *असलेल्या खोलींत एकमेकांचें चुंबन घेतलें. मेबल पर्डी हिनें बागेंतून उभ्या उभ्या* या उभयतांचें हें कृत्य अचानक बघितलें. मेबल तडक बागेंतून त्या खोलींत आली. तिला पाहून जोआन्नाला आश्चर्य वाटलें. जोआन्नानें तिला विचारलें: " काय ग मेबल, तूं बागेंत काय करत होतीस ? " मेबल उत्तरली: " मी माझं हरवलेलं प्रेम शोधत होत्यें." तिच्या या प्रशांत स्पष्टवक्तेपणामुळें जॅक पर्डी व जोआन्ना यांची सपशेल फजीति झाली. जॅकनें आपलें जोआन्नावर प्रेम असल्याचें कबूल केलें. मेबल म्हणाली: " दैवानं तुम्हां दोघां प्रेमिकांना याच्यापूर्वीच एकत्र आणायला पाहिजे होतं. तसं आतांपर्यंत कां घडलं नाहीं याचंच मला वाईट वाटतंय." आणि ती तिथून निघून गेली.

तेवढ्यांत ॲलिस डर्थ या पाहुणेबाई त्या खोलींत आल्या. त्याबरोबर जोआन्ना मांजरीसारखी तिच्यावरच उलटली. जोआन्नानें तिचें एक रहस्य उघड करून सांगून टाकलें. ही मिसेस ॲलिस डर्थ एका काळीं चित्रकाराचें मॉडेल म्हणून काम करीत होती. इतक्यांत ॲलिसचे यजमान, खुद्द चित्रकार मिस्टर डर्थ हेच तिथें येऊन दाखल झाले. हा डर्थसाहेब दारूच्या व्यसनापायीं आतां अगदीं खलास व्हायच्या बेतांत आलेला होता. त्याच्या या दारुडेपणाबद्दल ॲलिस डर्थ हिला त्याचा आतांशा अगदीं तिरस्कार वाटायला लागलेला होता. आपल्याला मूल नाहीं याचें डर्थसाहेबाला फार वाईट वाटत होतें. आणि पूर्वी

आपल्यावर प्रेम करणाऱ्या एका गृहस्थाशीं आपण लग्न केलें नाहीं याचें ॲलिस डर्थ हिला फार वाईट वाटत होतें.

सगळी पाहुणे मंडळी पुन्हां एकत्र जमल्यावर लॉबनें एक गुप्त गोष्ट उघड करून सांगितली. तो म्हणाला : "ज्याला ज्याला जंगलांत जायचा मोका साधतां येईल त्याला त्याला आयुष्यांत आपल्या मनासारखं करायची आणखी एक संधी मिळेल." तिथें जमलेल्या मंडळीपैकीं जवळ जवळ प्रत्येक व्यक्ति असेंच कांहीं तरी आपल्याला मिळावें म्हणून अगदीं आसुसलेली होती.

डर्थसाहेबानें पडदा बाजूला केला आणि बागेच्या जागीं आतां जंगल दिसूं लागलें. तो त्या जंगलांत शिरला आणि दिसेनासा झाला. त्याच्या पाठोपाठ मेबल पर्डी जंगलांत गेली. मग जॅक पर्डी व जोआन्ना या उभयतांनीं तोच मार्ग सुधारला. नंतर ॲलिस पर्डी, लेडि कॅरोलिन आणि मिस्टर कोएडे यांनींहि अनुक्रमानें जंगलांत प्रवेश केला. शेवटीं लॉबनें घुलवत घुलवत मॅटीलाहि जंगलाच्या कडेपर्यंत आणलें आणि त्याला जंगलांत ढकलून दिलें.

मग त्या ऐन उन्हाळ्यांतल्या रात्रीं स्वच्छ चांदणें पडलेलें असतांना या मंडळींना आयुष्यांतल्या आकांक्षा पूर्ण करून देणारी दुसरी संधि मिळाली. ही दुसरी संधि देणाऱ्या त्या कल्पनारम्य दुनियेंत मॅटी व लेडी कॅरोलिन या दोघांना एक नवाच शोध लागला. आपण उभयतां ग्राम्य जीवन जगणारीं पतिपत्नी आहोंत असें त्यांना आढळून आलें. तिकडे जोआन्ना आपल्या पतीचा शोध करीत हिंडत होती. मिस्टर कोएडे आतां जंगलनिवासी झालेला होता, आणि तो नाचत नाचत शिटी फुंकत तिच्या पुढ्यांत आला. ती त्याला म्हणाली : "मी मिसेस पर्डी. माझे यजमान दुसऱ्याच एका बाईसमवेत याच जंगलांत असावेत असा मला संशय येतोय." मग या दोघांना मेबलच्या संगतींत असलेला पर्डी दिसला. तो झाडांझाडांतून मेबलचा पाठलाग करीत होता. जंगलांत मेबल व जोआन्ना यांच्या भूमिकांची अदलाबदल झालेली होती. आपण एकमेकांना फार उशीरां भेटलों याचें पर्डी व मेबल यांना दुःख झालें.

जंगलाच्या दुसऱ्या एका भागांत चित्रकार विल् डर्थ आणि त्याची तरुण कन्यका मार्गारेट हीं दोघें त्यानें चित्रें काढण्यासाठीं उभा करून ठेवलेल्या लांकडी घोड्याच्या दिशेनें धांवत सुटलीं. डर्थ इथें चांदण्यांतला निसर्गरम्य देखावा रंगवीत होता. मार्गारेटला सुखाच्या अतिरेकामुळें हुरहुर वाटूं लागली.

ती वडिलांना म्हणाली : “ बाबा, मला बाई भीति वाटते. तुम्हांला माझ्यापासून कुणी तरी घेऊन जाईल अशा धास्तींत असत्यें मी.” या दोघांचें एका बाबतींत मतैक्य झालें. विशेषतः चित्रकारांना स्वतःच्या कन्यांची जरूरी असते, आणि कीर्ति म्हणजेच सर्व कांहीं असतें अशांतला प्रकार नसतो, ही उभयतांच्या मतैक्याची बाब ठरली.

या जंगलांत ॲलिस भिकारीण होऊन हिंडत होती. कुठें कांहीं खायला मिळालें तर बघावें म्हणून ती शोध करीत होती. जातां जातां तिला डर्थ व मार्गारेट हा पिता-कन्यकेचा सुखी जोडा दिसला. ती त्यांना उद्देशून म्हणाली : “ मला ओळखलंत का ? लॅाबच्या घरीं मी माझ्या पहिल्या प्रियकराची हकीकत सांगितलेली आठवत असेल तुम्हांला. अहो, ते ऑनरेबल मिस्टर फिंच फॅलो यांची मी पत्नी. एका काळीं मी मोठ्या ऐश्वर्यांत होत्यें. पण आतां बघा माझी काय दशा झाली आहे ती.” त्या भिकारणीसाठीं अन्न आणतां आलें तर बघावें म्हणून डर्थ जवळच असलेल्या एका घराकडे निघाला. पण मार्गारेटला कशाची भीति वाटली कोण जाणे. म्हणून ती डर्थला तिकडे जाण्यापासून परावृत्त करण्याची खटपट करूं लागली.

तोंवर लॅाब आपल्या घरीं परत आला आणि आपले पाहुणे जंगलांतून परत येण्याची वाट बघत राहिला. खिडकीवर टकटक ऐकूं आली, आणि अजून भारलेल्या अवस्थेंत असलेलें जॅक पर्डी व मेबल हें जोडपें आंत आलें. त्यांचें झोंपेंत असलेल्या लॅाबकडे लक्ष गेलें, पण त्यांनीं त्याला ओळखलेंच नाहीं. ऐन उन्हाळ्यांतल्या जादूचा प्रभाव त्यांच्यावर अजून तसाच राहिलेला होता. त्याच्या भरांत मेबलबरोबर पर्डी प्रेमाच्या कानगोष्टी करूं लागला. तेवढ्यांत जोआन्ना तिथें आली आणि तिच्यामुळें त्याच्या या कानगोष्टींमध्यें व्यत्यय आला. जोआन्ना ही ऐन उन्हाळ्यांतल्या जादूमय रात्रींतली त्याची पत्नी होती. या तिघांकडे लॅाब झोंपेंतल्या झोंपेंत मिस्किलपणें डोळे मिचकावून बघत असलेला दिसला.

आणि अचानक हा सगळा जादूचा प्रभाव नाहींसा झाला. त्या त्रिकूटाला आपण कुठें आहोंत याचें भान आलें. त्यांना लॅाबची ओळखहि पटली. वास्तव जीवनाची त्यांना पुरतेपणीं जाणीव पुन्हां आल्यानंतर पर्डीच्या हें ध्यानांत येऊन चुकलें कीं मानवी भवितव्याचा दोष नशिबाकडे, ‘ कर्मा’कडे नसतो. त्याला

आपल्या वागणुकीची शरम वाटली. त्यानें प्रामाणिकपणें कबूल केलें कीं आपण बायकांच्या नादीं लागणारे आहोंत. आणि त्यानें मेबलची क्षमा मागितली.

मग मॅटी घरीं परत आला. त्याच्या बोलण्यांत व पोशाखांत अजून ग्राम्य-पणा जसाचा तसा कायमच होता. तो जो आला तो तिथें हजर असलेल्या सगळ्याच मंडळींना सांगत सुटला कीं : "माझी पत्नी माझ्याबरोबर आलेली आहे." आणि त्यानें लेडी कॅरोलिन मॅटी हिचा सगळ्यांशीं परिचय करून दिला. त्याचें हें बोलणें ऐकून सगळी मंडळी आश्चर्यानें थक्क झाली. तेवढ्यांत त्या दोघांवरचा जादूचा प्रभाव खाडकन् नाहींसा झाला. त्याबरोबर चोखंदळ लेडी कॅरोलिन लॅनी आपल्या आतांपर्यंतच्या भूमिकेमुळें घाबरून गर्भगळित झाली. मॅटीला तर सगळ्यांसमोर तोंड दाखवायचीहि लाज वाटायला लागली.

मग मिस्टर कोएडे आपली शिटी फुंकत फुंकतच परत आले. त्यांनीं मिसेस कोएडे यांना ओळखलें नाहीं; तरी पण त्यांच्या प्रेमळ चेहऱ्याचें कौतुक करणारे उद्गार काढले. आपल्या यजमानांनीं कल्पनेच्या जगांत स्वतःच्या मना-सारखें करायची संधि दुसऱ्यांदां मिळाली असतांना पत्नी म्हणून पुन्हां आपलीच निवड केली याचा मिसेस कॅरोलिन यांना विशेष अभिमान वाटला आणि मग हे म्हातारबुवा देखील जादूच्या जगांतून वास्तव जगामध्यें परत प्रविष्ट झाले.

ॲलिस डर्थ उपाशीतापाशी अवस्थेंत आंत आली आणि तिथल्या फरा-ळाच्या पदार्थांकडे आधाशीपणानें बघूं लागली. मध्येंच केकचा बकाणा भरायचा आणि मध्येंच मिसेस फ्लिन्चे फॅल्लोवे या भूमिकेंत असतांना आपण पूर्वी किती सुस्थितींत होतों याच्या बढाया मारायच्या, असा तिचा धडाका चालू होता. तशांत तिनें आपल्याला एक चित्रकार व त्याची कन्या अशी दुक्कल जंगलांत भेटल्याची हकीकत सांगून इतर पाहुण्यांना दिङ्मूढ करून सोडलें. तेवढ्यांत जंगलाचीं निसर्गदृश्यें चितारणारा सुखी चित्रकार डर्थ स्वतःच आंत आला. मग त्या दोघांवरच्या जादूचा प्रभाव नष्ट झाला. तेव्हां ॲलिसला कळून चुकलें कीं आपल्याला पहिल्यांदों मागणी घालणाऱ्याच्या सहवासांत आपण सुखी झालों नसतों आणि विल डर्थ याच्या सहवासांत आपण आलों नसतों तर तो अधिक सुखी झाला असता. मार्गारेट हातची गेल्यामुळें डर्थची क्षणिक हैराणगत झाली खरी; पण त्यानें लगेच स्वतःला सांवरून घेतलें आणि आपल्याला त्या रात्रीच्या त्या अजब अनुभवाचा लाभ करून दिल्याबद्दल लॉबचे आभार मानले.

या सगळ्या घालमेलींच्या मुदतींत लॅंब एका खुर्चीत मुटकळून बसलेला होता. जादूनें भारल्यागत त्याला झोंप लागलेली दिसली. आपले एकेक पाहुणे वास्तव जगांत परत येत असलेले पाहतां पाहतां तो झोंपेंतल्या झोंपेंत त्यांना मिस्किलपणें डोळ्यांनीं खुणावत होता व गालांतल्या गालांत हंसत होता. तो जागा झाल्यावर परत आपल्या आवडत्या फुलांची निगा राखण्याच्या उद्योगाला लागला. ऐन उन्हाळ्यांतली सायंकाळ संपली. असें-झालें-असतें-पणाचें साम्राज्य विलयाला गेलें.

## अ डॉल्स हाउस : घरकूल

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* हेन्रिक इब्सेन (१८२८-१९०६). *कथानकाचा प्रकार :* सामाजिक टीका. *काळ :* एकोणिसावें शतक. *स्थळ :* नॉर्वे. *पहिला प्रयोग :* १८७९.

*प्रमुख पात्रें :* **टोर्वाल्ड हेल्मर,** बँकेचा मॅनेजर. **नोरा हेल्मर,** त्याची पत्नी. **मिसेस लिन्डे,** नोराची शाळकरी वयापासूनची जुनी मैत्रीण. **क्रॉग्स्टाड,** बँकेंतला कारकून. **डॉ. रँक,** हेल्मर कुटुंबाचा स्नेही.

*समीक्षण :* 'अ डॉल्स हाउस' हें इब्सेनच्या कलाकृतींपैकीं सगळ्यांत अधिक सुप्रसिद्ध व सगळ्यांत जास्त लोकप्रिय नाटक. स्त्रियांचे हक्क या विषयाची या नाट्यकृतींतील अभिजात अभिव्यक्ति पाहून इब्सेनच्या समकालीनांना तर धक्काच बसला. कारण नाटकाच्या शेवटीं नायिका नोरा आपल्या पतीला व मुलांना टाकून घरांतून निघून जाते. डॉ. रँक या पात्राच्या स्वभावचित्रणांत आनुवंशिक संस्कार या विषयाचें थोडेसें आगाऊ दिग्दर्शन आढळतें. याच विषयाचा विकास इब्सेननें पुढें आपल्या 'घोस्ट्स' (भुतें) या नाटकांत करून दाखविला.

*कथानक :* नाताळाचा आदला दिवस. नोरा हेल्मर सणाचा बाजार करण्यांत गढून गेलेली होती. राहिल्या साहिल्या जिनसा शेवटच्या क्षणीं आठवण कर करून ती आणवून घेत होती. कारण लग्नानंतरच्या इतक्या वर्षांमध्यें काट-कसर अजिबात करावी न लागतां हात सढळ सोडून साजरा होणारा तिच्या लेखीं हा पहिलाच नाताळचा सण होता. तिचे यजमान टोर्वाल्ड यांना नुकतीच

बढती मिळालेली होती. त्यांची नेमणूक बँकेच्या मॅनेजरपदावर झालेली होती. नवीन वर्ष सुरू झाल्यानंतर या कुटुंबाच्या मागील पैशाच्या अडचणी दूर होणार होत्या.

म्हणून तिनें एक खिस्तमसचें झाड विकत घेतलें. मुलांच्यासाठीं पुष्कळशीं खेळणीं खरेदी केलीं. इतकेंच नव्हे तर तिनें स्वतःची आवडती मिठाई म्हणजे बदाम व रवा घातलेली गोड केक देखील मोठ्या हौसेनें थोडीशी आणली. मात्र तिचे यजमान टोर्वाल्ड यांना हा तिचा स्वतःच्या बाबतींतला हौशीपणा फारसा पसंत पडला नाहीं. तसें त्यांचें आपल्या पत्नीवर खूपच प्रेम होतें. परंतु तिचे वडील ज्या दृष्टीनें तिजकडे तिच्या लहानपणीं बघत असत त्याच दृष्टीनें तिचे यजमानहि तिच्याकडे बघूं लागले. ते तिला एक मनोरंजक बाहुली समजूं लागले. एक खेळणें समजूं लागले. त्यांच्या प्रेमाची तऱ्हा ही अशी होती.

आतां यजमानांशीं वागतांना ती देखील कधीं कधीं एखाद्या लहान मुलीसारखी वागत होती हेंहि कांहीं अगदींच खोटें नव्हे. मध्येंच ती ओठ पुढें काढायची. मध्येंच ती लाडी गोडी लावून, लुलुपुतू करून आपलें काम साधून घ्यायची. मध्येंच तिचा खूप चिवचिवाट चालायचा. हें सगळें ती करीत असे, कारण तिनें हें सगळें करावें अशी टोर्वाल्ड यांचीहि अपेक्षा असे. या सगळ्या गोष्टी तिनें केल्या नसत्या तर आपल्या बाहुलीवजा पत्नीविषयीं त्यांना प्रेमच वाटलें नसतें.

वस्तुतः नोरा ही बाहुली नव्हती. ती चांगली जाणती सवरती प्रौढ स्त्री होती. स्त्रीसुलभ प्रेमभावना, आशा-आकांक्षा, धास्त्या-काळज्या हे सगळे भलेबुरे स्त्रीचे प्रकृतिभाव तिच्या अंगीं होते. आणि या गोष्टींचा प्रत्यय आणून देणारी घटना एक नव्हे, दोन नव्हे, सात वर्षांपूर्वी, तिचें पहिलें अपत्य जन्माला आल्यानंतर थोड्याच अवधींत घडलेली होती.

त्या वेळीं प्रकार असा झाला. तिचे यजमान टोर्वाल्ड हे आजारी पडले. डॉक्टरांनीं सांगितलें: "पेशंटला जर तावडतोब हवा पालटायला परदेशांत नेण्याची व्यवस्था केली नाहीं तर तो वांचायची आशा नाहीं." नोरा निकरावर आली. या बाबतींत आपल्या यजमानांचा सल्ला घेण्याची सोयच नाहीं हें ती पुरतेपणीं जाणून होती. कारण हे राजेश्री कर्ज काढण्यापेक्षां मरणच बरें असें म्हणणाऱ्यांपैकीं होते. तिला आपल्या वडिलांकडे जाण्यालाहि अनुकूलता नव्हती.

कारण ते स्वतःच बिचारे मरणाच्या पंथाला लागलेले होते. तशा त्या परिस्थितींत जी एकमेव गोष्ट करणें शक्य होतें, तीच तिनें केली. तिनें एक सावकार गांठला. त्याचें नांव क्रॉग्स्टाड. या सावकाराकडून तिनें जरूर असलेले अडीचशें पौंड कर्जाऊ घेतले. प्रॉमिसरी नोटेवर तिनें आपल्या वडिलांची बनावट सही ठोकून दिली. आणि अशा प्रकारें तिनें आपले यजमान टोर्वाल्ड यांना इटलीमध्यें हवा पालटण्यासाठीं जातां येईल अशी व्यवस्था करून टाकली.

क्रॉग्स्टाड हा सावकार भलताच तगादेबाज होता. त्याचे कर्जाचे हप्ते तिनें वेळेवर द्यावेत म्हणून तो तिला एकसारखा सतावूं लागला. हे हप्ते नियमितपणें देण्यासाठीं तिला अनेक युक्त्या प्रयुक्त्या लढवाव्या लागत. यजमानांकडून तिला स्वतःला नवे कपडे घेण्यासाठीं म्हणा, किंवा अशाच अन्य कांहीं कामासाठीं म्हणा, पैसे मिळाले रे मिळाले कीं त्यांतले फार फार तर अर्धे पैसे ती खर्च करायची आणि बाकीच्या अर्ध्या रकमेंतून ती कर्जाचा हप्ता भागवायची. याशिवाय पैसे मिळवायचे इतरहि अनेक मार्ग तिनें शोधून काढले. एका हिंवाळ्यांत तिनें हस्तलिखिताच्या नकला करून देण्याचें काम घेतलें. पण हें सगळें काम आपण कशासाठीं करतों याचा तिनें आपले यजमान टोर्वाल्ड यांना अजिबात थांगपत्ता लागूं दिला नाहीं. कारण त्यांची बिचाऱ्यांची समजूत अशी होती कीं आपल्याला सहकुटुंब हवा पालटायला जाण्यासाठीं लागलेले पैसे आपल्या श्वशुरांकडूनच मिळाले.

आतां टोर्वाल्डसाहेब बँकेचे मॅनेजर झाले. त्याच बँकेंत नोराचा सावकार क्रॉग्स्टाड हा कारकून होता. आपल्याला बढती मिळावी म्हणून या कारकुनानें टोर्वाल्डसाहेबांकडे वशिला लावण्याचा निश्चय केला. परंतु त्या कारकुनाला बघितलें कीं साहेबांचें पित्त भडकून जायचें. कारकुनाला तर बढती हवी होती आणि साहेबांनीं तर त्याला डच्चूच द्यायचा असें ठरविलें होतें.

असा डच्चू देण्याची संधि साहेबांकडे लवकरच आयती चालून आली. नोराची बालपणींची शाळकरी मैत्रीण खिस्टिना लिन्डे हिनें बँकेंत नोकरी मिळविण्यासाठीं टोर्वाल्डसाहेबांकडे अर्ज सादर केला. मग साहेबांनीं असें ठरवूनच टाकलें कीं क्रॉग्स्टाडला नोकरीवरून काढून लावायचें आणि त्याच्या जागीं मिसेस लिन्डे हिची नेमणूक करायची.

आपली नोकरी जाणार याचा पत्ता क्रॉग्स्टाडला लागला. त्यानें लगेच नोराची भेट घेतली. त्यानें तिला सांगितलें: "हें बघा, मला जर का तुमच्या यजमानांनीं काढून टाकलं तर मी तुमचं नि त्यांचं भयंकर नुकसान करीन. तुम्हीं जी प्रॉमिसरी नोट मला आणून दिली आहे, तिच्यावर तुमच्या वडिलांची सही आहे. पण तिच्यावरची तारीख तुमच्या लक्षांत आहे का? तुमच्या वडिलांच्या मृत्यूनंतर तीन दिवसांनीं त्यांच्या सहीची नोट तुम्ही मला आणून दिलीत. याचा अर्थ तुम्हीच काय तो समजून असा."

या धमकीमुळे नोराच्या तोंडचें पाणीच पळालें. एकंदर प्रकाराला असलें वळण मिळेल हें तिच्या ध्यानींमनींहि नव्हतें. तिनें क्रॉग्स्टाडला पुन्हां बँकेंत नोकरीवर ठेवून घेण्याबाबत टोर्वाल्डसाहेबांची खूप मनधरणी केली. पण तिचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. त्याला नोकरीवरून काढल्याचें साहेबांचें अधिकृत पत्र मिळालें. त्याबरोबर त्या पत्राला उत्तरादाखल म्हणून क्रॉग्स्टाडनें एक लांबलचक पत्र टोर्वाल्डसाहेबांकडे धाडून दिलें. त्यांत प्रॉमिसरी नोटेची भानगड, तिच्यावरची नोराची खोटी सही, या सगळ्या गोष्टी त्यानें तपशीलवार लिहून कळविल्या. हेल्मर मंडळींच्या दारावर लटकावलेल्या पत्रांच्या पेटींत त्यानें हें पत्र टाकून दिलें.

इकडे टोर्वाल्डसाहेब नाताळचा सण साजरा करण्याच्या ऐन रंगांत आलेले होते. दुसऱ्या दिवशीं रात्रीं या मंडळींना चित्रविचित्र पोशाख करून नृत्यसमारंभांत भाग घेण्याचें एक खास आमंत्रण आलेलें होतें. या समारंभाला नोरा इटलींतील नेपल्सच्या कोळणीचा पोशाख करून जाणार होती आणि तिथें ती टारान्टेल्ला हें इटालियन धर्तीचें नृत्य करून दाखविणार होती. आपल्या यजमानांचें लक्ष पत्रांच्या पेटीकडे जाऊं नये म्हणून नोरानें घरींच टोर्वाल्डसाहेब व डॉ. रँक हे जुने ऋणानुबंधी स्नेही या दोघांच्या समोर या नृत्याची तालीम करून दाखविली.

काय करावें, कुणाचा सल्ला घ्यावा, या संकटांतून मार्ग कसा काढावा, या विचारानें बिचारी नोरा अगदीं किंकर्तव्यमूढ झाली. प्रथम तिच्या मनांत असा विचार आला कीं मिसेस लिन्डे हिला हा सगळा प्रकार सांगावा. कारण एका काळीं तिच्यावर क्रॉग्स्टाड प्रेम करीत होता. त्याप्रमाणें तिनें मिसेस लिन्डेला भेटून आपली अडचण सांगितली. तेव्हां मिसेस लिन्डे हिनें तिला असें अभिवचन

दिलें कीं क्रॉग्स्टाडला त्याच्या निश्चयापासून परावृत्त करण्यासाठीं आपण प्रयत्नांची पराकाष्ठा करूं.

पण नोराला तेवढ्यावर स्वस्थ बसवेना. तिनें डॉ. रँक यांचाहि सल्ला घेण्याचा विचार केला. पण तिनें त्यांचा विश्वास संपादन करून आपली कहाणी त्यांना सांगायला सुरवात केली असेल नसेल येवढ्यांत खुद्द डॉ. रँक यांनींच तिच्यावरील आपल्या प्रेमाचें उघड उघड प्रदर्शन आरंभलें. डॉ. रँक यांचा हा नवा नूर बघितल्यावर आपलें रहस्य त्यांच्याजवळ उघड करून सांगण्याचें धाडस तिच्या हातून होईना. परंतु तेवढ्यांत टोर्वाल्डसाहेबांनींच तिची एका अर्थी सोडवणूक केली. नृत्यसमारंभ होऊन जाईपर्यंत आपण दाराला लावलेल्या पत्रांच्या पेटीला हात लावणार नाहीं असें त्यांनीं तिला मुळीं वचनच दिलें.

नोराला खरी काळजी वाटत होती ती स्वतःच्या भवितव्याविषयीं नव्हती वाटत. तिला काळजी वाटत होती टोर्वाल्डसाहेबांची. तिनें स्वतःच्या मनाशीं जें कल्पनाचित्र रंगविलें तें असें होतें : खरा प्रकार कळल्यावर टोर्वाल्डसाहेबांना भयंकर दुःख होईल ; मग तिनें केलेल्या साऱ्या गोष्टींचा सगळा दोष ते स्वतःवरच ओढून घेतील ; आणि तिला वांचविण्यासाठीं ते स्वतःची बेअब्रू करून घेतील.

परंतु वस्तुस्थिति मात्र नोरानें रंगविलेल्या या कल्पनाचित्राशीं नीट जुळली नाहीं. तसें म्हटलें तर मिसेस लिन्डे हिनें आपली भूमिका नीट पार पाडली. तिनें क्रॉग्स्टाडला लग्नाचें वचन दिलें ; त्याच्या मुलांचा नीट प्रतिपाळ करण्याचें कबूल केलें. याच्या बदल्यांत हेल्मर मंडळीवरील सगळे आरोप मागें घ्यायला तो आनंदानें कबूल झाला. परंतु गोष्टी येवढ्यावर भागण्याजोग्या नव्हत्या. नोराचें प्रकरण भलत्याच थराला पोंचलें आहे आणि पुढेंमागें केव्हां तरी नोरा व टोर्वाल्ड-साहेब यांनीं एकमेकांशीं समजुतीनें घेतल्याखेरीज पुढचा निभाव नीट लागणार नाहीं हें मिसेस लिन्डेन हिच्या ध्यानांत येऊन चुकलें होतें.

आणि हा निर्वाणीचा क्षण एकदांचा आला. नृत्यसमारंभ आटोपून हेल्मर मंडळी घरीं परत आली. आणि मग टोर्वाल्डसाहेबांनीं पत्रांच्या पेटींतलें क्रॉग्स्टाडचें पत्र काढून वाचलें. तें पत्र वाचल्यावर स्वारी जी कांहीं भडकली आहे म्हणतां ! त्यांनीं नोरावर अनेक भलभलत्या आरोपांचा वर्षाव चालू केला. ते

म्हणाले : “ तूं ढोंगी आहेस. खोटार्डी आहेस. गुन्हेगार आहेस. तुला देवाधर्माची काडीइतकीहि चाड नाहीं. तुला नीति नाहीं. तुला कर्तव्याची जाणीव नाहीं. तूं आपल्या मुलांना लहानाचीं मोठीं करायला सर्वस्वीं नालायक आहेस. मी तुझ्यावर आतां फार तर येवढीच मेहेरबानगी करीन कीं तुला मी माझ्या घरांत राहूं देईन. परंतु अतःपर तूं या घराची मालकीण नाहींस हें लक्षांत ठेव.”

तेवढ्यांत कर्मधर्मसंयोग असा कीं क्रॉग्स्टाडचें दुसरें पत्र येऊन थडकलें. त्यांत त्यानें चक्क कबूल केलें होतें कीं आपण हेल्मर मंडळींच्या विरुद्ध अतःपर कसलाहि कायदेशीर इलाज करूं इच्छीत नाहीं. हें दुसरें पत्र वाचतांक्षणीं टोर्वाल्डसाहेबांनीं एकदम पलटी खाल्ली. त्यांनीं सुटकेचा निःश्वास सोडला. आपण एकदांचे बेअब्रूतून बचावलों असें त्यांनीं मोठ्या प्रौढीनें सांगून टाकलें.

आपल्या पतिराजांचें खरें स्वरूप काय आहे हें या क्षणीं मात्र पहिल्या प्रथमच नोराच्या निदर्शनाला आलें. हा माणूस म्हणजे नंबर एकचा आढ्यताखोर दांभिक प्राणी आहे, या प्रकरणांत स्वतःच्या पत्नीची काय अवस्था झालेली आहे, याची याला काडीचीहि पर्वा नाहीं हें तिला अगदीं चक्क दिसून आलें. मग तिनें त्यांना स्पष्ट शब्दांत सुनावलें : “ पतिराज, कोणत्याहि विवाहाची उभारणी विषमतेच्या पायावर होऊंच शकत नाहीं. तुम्ही अगदीं निर्धास्त असा. तुमचं हें घर मी कायमचं सोडून जाणार आहे.”

आपण हें काय ऐकतों आहोंत याचा टोवाल्डसाहेबांना कांहीं बोधच होईना. स्वतःच्या कानांवर त्यांचा विश्वासच बसेना. तिनें घर सोडून जाऊं नये म्हणून त्यांनीं तिची परोपरीनें समजूत घालून पाहिली. पण तिनें शेवटीं त्यांना निक्षून सांगितलें : “ मी जात्यें. समंजस माणूस म्हणून जगण्याचा मी प्रयत्न करून पाहणार आहे. जग कसं आहे हें मला समजावून घ्यायचं आहे. थोडक्यांत सांगूं ? मला स्त्री व्हायचं आहे. तुमच्या स्वार्थी ऐटबाजपणाची खुशामत करणारी एक बाहुली म्हणून मला तुमच्या घरांत एक क्षणभर सुद्धां राहायची इच्छा नाहीं.”

ती बाहेर पडली. पुन्हां परत यायचें नाहीं या अटळ निर्धारानें ती घरांतून बाहेर पडली ; आणि या निर्धाराचें जणूं काय निदर्शन करण्यासाठीं जातां जातां तिनें आपल्या घरकुलाचें दार धाडकन बंद करून ठेवलें.

# द डचेस ऑफ माल्फी

*वाङ्मयप्रकार* : नाटक. *लेखक* : जॉन वेब्स्टर (१५८०-१६३८). *कथानकाचा प्रकार* : अद्भुतरम्य शोकान्तिका. *काळ* : सोळावें शतक. *स्थळ* : आमाल्फी आणि मिलान, इटली. *पहिला प्रयोग* : १६१३.

*प्रमुख पात्रें* : **जिओव्हान्ना**, आमाल्फीची डचेस (सरदारीण). **ॲन्टोनियो**, तिचा दुसरा पति. **फर्डिनान्ड**, कॅलाब्रियाचा ड्यूक (सरदार); डचेसचा हेवेखोर भाऊ. **द कार्डिनल**, डचेसचा आणखी एक भाऊ. **बोसोला**, डचेसच्या भावांचा हेर आणि शिवाय या भावांनीं नेमलेला मारेकरी.

*समीक्षण* : इंग्लंडचा राजा पहिला जेम्स याच्या राजवटींतील तथा-कथित अधःपतित नाट्यवाङ्मयाचा नमुना म्हणून वेब्स्टरच्या या रक्तलांच्छित शोकांतिकेकडे अंगुलिनिर्देश करतां येईल. त्यांतले प्रवेश प्रक्षोभक असले तरी यामुळें नाटकाच्या सर्वसाधारण उदात्ततेला व शोकरसप्रधानतेला बाध येत नाहीं. या नाटकाचें एक वैशिष्ट्य असें आहे कीं पहिल्या व दुसऱ्या अंकांच्या दरम्यान एक वर्षाचा कालावधि लोटतो आणि दुसऱ्या व तिसऱ्या अंकांच्या दरम्यान आणखी दोन वर्षें लोटतात. हा कालावधि डचेसला झालेल्या मुलांच्या योगानें प्रेक्षकांच्या नजरेस आणलेला आहे. बहुतेक रक्तलांच्छित शोकांतिकांप्रमाणेंच या नाटकाची पार्श्वभूमि देखील एक लॅटिन देश हीच आहे.

*कथानक* : माल्फीची डचेस ही एक तरुण विधवा होती. तिचे दोघे भाऊ म्हणजे एक कार्डिनल व दुसरा कॅलाब्रियाचा ड्यूक फर्डिनान्ड. तिनें पुन्हां लग्न करूं नये म्हणून हे दोघे तिच्यावर अगदीं डोळ्यांत तेल घालून पाळत ठेवत असत. कारण ती लग्न न करतां तशीच विधवा राहिली म्हणजे तिचा इतमाम व तिच्या इस्टेटी आपल्याला वारसा हक्कानें मिळाव्यात असा त्यांचा बेत होता. तिच्यावर लक्ष ठेवण्यासाठीं त्यांनीं आपल्यातर्फे हेरगिरी करण्याची कामगिरी तिच्या वाड्यांतला प्रमुख सैस बोसोला याजकडे सोंपविली.

दोघां भावांनीं अनेक कडक इशारे दिले असतांना देखील अखेर व्हायचें तेंच झालें. डचेस आपला खासगी कारभारी ॲन्टोनियो याच्या प्रेमांत सांपडली आणि त्याच्याशीं तिनें चोरून लग्न केलें.

पुढें तिला एक मुलगा झाला. ही गोष्ट तिनें ॲन्टोनियो व तिची एक दासी कॅरियोला या दोघांखेरीज कुणालाहि ठाऊक होऊं नये अशी तजवीज करून ठेवली. पण दुर्दैवाची गोष्ट अशी कीं मुलाच्या वडिलांनीं खुषींत येऊन फलज्योतिषाच्या नियमांनुसार मुलाची जी जन्मपत्रिका लिहून काढली, तीच त्यांच्या हातून गहाळ झाली. ही पत्रिका बोसोलाच्या हातीं लागली. डचेसला मुलगा झाल्याची बातमी त्याला अशा रीतीनें कळली.

बोसोलानें ताबडतोब रोम शहराला पत्र पाठवून डचेसच्या दोघां भावांना ही बातमी कळवून टाकली. हें पत्र वाचल्यावर ड्यूकच्या संतापाला पारावार राहिला नाहीं. त्यानें अशी शपथ घेतली कीं हिचा खून केला तरच आपला संतापाग्नि शांत होईल. हिचा प्रियकर कोण आहे हें आपल्याला नक्की कळलें पाहिजे. म्हणजे तिचा आपण पुरता नायनाट करूं आणि मगच संतुष्ट होऊं.

अशींच वर्षांमागून वर्षें गेलीं आणि डचेसला ॲन्टोनियोकडून आणखी दोन मुलें झालीं. एक मुलगा नि एक मुलगी. ॲन्टोनियो आपला मित्र डेलियो याला विश्वासांत घेऊन म्हणाला : “ मित्रा, एकंदर लक्षणं कांहीं ठीक दिसत नाहींत. मला भयंकर काळजी वाटते. कारण ड्यूक फर्डिनान्ड या एकंदर प्रकरणीं भलताच गपचीप बसलेला दिसतो. आणि माल्फीच्या लोकांना तर आपल्या डचेसचं लग्न झालेलं आहे हें मुळीं ठाऊकच नाहीं. यामुळं ते तिला एक सामान्य बदचाल बाई म्हणून नांवं ठेवत आहेत. अशा परिस्थितींत काय करावं हेंच कांहीं कळेनासं झालं आहे. ”

इकडे ड्यूक फर्डिनान्ड हा आपल्या बहिणीच्या दरबारीं येऊन हजर झाला. कौंट मालाटेस्टे या सरदाराशीं डचेसनें लग्न करावें असा मनसुबा त्यानें तिला सादर केला. तिनें या गोष्टीला साफ नकार दिला. दरम्यान डचेसच्या मुलांचा जनक पिता कोण, याचा पत्ता काढण्याच्या कामीं बोसोलाला अजूनहि यश आलेलें नव्हतें. आपल्या या हेराच्या चालढकलीचा ड्यूक फर्डिनान्ड याला खूप राग आला. मग ड्यूकनें यापेक्षांहि एक साहसी कार्यक्रम आंखला. त्यानें डचेसच्या खासगी दालनामध्यें शिरकाव करून घेण्याचा निर्धार केला आणि तिथें तिला धाकदपटशा देऊन तिचा जबरदस्तीनें कबुलीजबाब घ्यायचा असें त्यानें ठरविलें.

ही योजना यशस्वी करण्यासाठीं त्या रात्रीं ड्यूकनें तिच्या खासगी दालनाची किल्ली बोसोलाजवळून हस्तगत करून घेतली. या किल्लीचा उपयोग करून ड्यूक थेट तिच्या शयनमंदिरांत हजर झाला. त्याच्या धमकावण्यांना घाबरून बिचाऱ्या डचेसनें आपलें दुसरें लग्न झालें असल्याचें कबूल केलें. परंतु आपला दुसरेपणींचा पति ॲन्टोनियो याचें नांव उघड करून सांगण्यास तिनें साफ नकार दिला.

ड्यूक निघून गेल्यावर तिनें आपला गुप्त पति ॲन्टोनियो व दासी कॅरियोल या दोघांना आपल्या खासगी दालनांत बोलावून घेतलें. ॲन्टोनियो हाच डचेसचा दुसरेपणींचा पति आहे या रहस्याचा सुगावा तिच्या भावांना आतां लागल्या-खेरीज राहणार नव्हता; पण तो सुगावा लागण्यापूर्वीच ॲन्टोनियोनें माल्फीहून पळ काढावा अशी योजना या तिघांनीं मिळून आंखली.

मग डचेसनें बोसोलाला बोलावून घेतलें. ती त्याला म्हणाली: "आपला कारभारी ॲन्टोनियो यानं हिशेबांत कांहीं तरी घोंटाळा करून ठेवलेला आहे.' येवढें सांगून तिनें बोसोलाला जायला सांगितलें आणि तो गेल्यावर तिनें लगेच पुन्हां ॲन्टोनियोला भेटीसाठीं बोलावणें धाडलें. तो आल्यावर ती म्हणाली: "हें बघा, मी तुमच्यावर एक खोटाच आळ घेतलेला आहे. तुमची व माझी दोघां-चीहि अब्रू संभाळण्यासाठीं मला असं करणं भाग पडलं. या खोट्या आरोपाचं निमित्त करून मी तुम्हांला नोकरीवरून हांकलून देणार आहे. मग तुम्ही इथून पळ काढा नि ॲंकोना या गांवीं जाऊन राहा. तिथं मागाहून मी तुम्हांला भेटायला येईन आणि अशा रीतीनं आपलं पुनर्मीलन होईल."

यानंतर तिनें बोसोला व आपल्या गारद्यांचे अधिकारी या सगळ्यांना आपल्यासमोर हजर राहण्यास फर्मावलें; आणि पुन्हां सर्वांच्या देखत तिनें ॲन्टोनियोवर पैसे चोरल्याचा जाहीर आरोप केला. आणि याबद्दल शिक्षा म्हणून तिनें त्याची माल्फी नगरांतून हकालपट्टी केली. शिक्षा ऐकल्यावर ॲन्टोनियो उत्तरला: "सेवकांच्या कर्तबगारीचं चीज करणाऱ्या धन्यांकडून आपल्या खासगी कारभाऱ्यांना अशाच प्रकारची वागवणूक मिळणार." आणि येवढें बोलून मग तो ॲंकोना या गांवाकडे निघून गेला.

हा सगळा प्रकार बघून बोसोला चांगलाच फशीं पडला. त्यानें डचेस-बरोबर वाद घातला आणि या वादांत ॲन्टोनियोची बाजू घेतली. मग डचेसला

असें वाटलें कीं बोसोला हा खरोखरीच इमानी नि विश्वासपात्र नोकर आहे आणि आतां आपल्या लग्नाचें रहस्य याच्याजवळ उघड करून सांगण्यास हरकत नाहीं. आणि खरा प्रकार तिनें बोसोलाला सांगून टाकला. इतकेंच नव्हे तर तिनें त्याच्यावर एक नाजुक कामगिरीहि सोंपविली. ती त्याला म्हणाली: "आतां असं कर. माझे यजमान ॲन्टोनियोसाहेब यांच्याकडे देण्यासाठीं दागिने व पैसे घेऊन तूं अँकोना या गांवीं जा. मागोमाग मी पण तिकडेच येत्यें."

यावर डचेसच्या सुरक्षिततेविषयीं आपल्यालाहि काळजी आहे हें दर्शविण्यासाठीं बोसोला तिला म्हणाला: "बाईसाहेब, आपण आतां असं करावं. आपण इथून थेट अँकोना या गांवीं जाऊं नये असं माझ्या अल्पमतीला वाटतं. आपण प्रथम लॉरेट्टो येथील समाधिक्षेत्राची यात्रा करावी आणि तिथून परस्पर आपण अँकोना या गांवीं जावं. म्हणजे आपण इथून पळून गेलांत असं कुणाला वाटणार नाहीं. त्या ऐवजीं आपण यात्रेला गेलांत अशीच लोकांची समजूत होईल."

येवढें सांगून बोसोला तावडतोब माल्फीहून रोम शहराकडे चालता झाला. तिथें गेल्याबरोबर त्यानें ॲन्टोनियो व डचेस या उभयतांचे गुप्त बेत ड्यूक फर्डिनान्ड व कार्डिनल या तिच्या दोघांहि भावांना सांगितले. त्यांनीं या उभय प्रेमिकांना अँकोना येथून हद्दपार करण्याचा हुकूम मिळविला.

मग बोसोलानें लॉरेट्टो या क्षेत्रानजीक डचेस व ॲन्टोनियो यांची गांठ घेतली. ड्यूक फर्डिनान्ड याचें बरोबर आणलेलें पत्र त्यानें त्यांना दिलें. त्यांत ड्यूकनें लिहिलें होतें: "ॲन्टोनियो हा माझा मेव्हणा झालेला आहे हें आतां मला कळलं. तेव्हां त्यानं तावडतोब माझ्यासमोर येऊन हजर व्हावं." ॲन्टोनियोनें हा आदेश धुडकावून लावला आणि आपल्या सगळ्यांत थोरल्या मुलाला बरोबर घेऊन तो मिलान शहराकडे पळून गेला.

ॲन्टोनियो निघून गेल्यावर ड्यूक फर्डिनान्ड याच्या आदेशानुसार बोसोलानें डचेसला कैद केलें व तिला माल्फी येथील तिच्या राजवाड्यांत परत नेऊन ठेविलें. तिथें ड्यूकनें तिच्या खासगी दालनामध्यें तिची पुन्हां भेट घेतली. ॲन्टोनियो ठार झालेला आहे असें सांगून त्याच्या मृत्यूचा पुरावा म्हणून ड्यूकनें एका मेलेल्या माणसाचा हात तिच्यासमोर आणून ठेवला.

शेवटीं बोसोला त्या दालनांत आला आणि त्यानें डचेसचा गळा दाबून तिचा तिथल्या तिथें प्राण घेतला. दासी कॅरियोला व डचेसचीं दुसरीं दोन लहान मुलें यांचेहि त्यानें असेच गळे दाबून प्राण घेतले. अर्थात् जेवढ्या प्रशांत धीरोदात्तपणें डचेस मृत्यूचें स्वागत करायला तयार झाली तेवढा धीरोदात्तपणा त्या दासीमध्यें व त्या बाळांच्या अंगीं कुठून असणार?

येवढीं कुकर्में केल्यावर क्रूरकर्मा बोसोलानें ड्यूक फर्डिनान्डजवळ आपल्या कर्तबगारीची बक्षिशी मागितली. ही मागणी ऐकून तो दांभिक ड्यूक मोठ्यानें हंसला नि उत्तरला : " अरे, असल्या भयंकर गुन्ह्याबद्दल तुला बक्षीस आणखी कसलं द्यायचं! मीं तुला क्षमा केली, येवढं बक्षीस पुरे नाहीं का झालं?"

तोंवर ॲन्टोनियो मिलान शहरीं दाखल झालेला होता. त्यानें असा बेत केला कीं डचेसच्या दोघां भावांबरोबर दिलजमाई करतां आली तर करून टाकावी. त्यानें रात्रीं कार्डिनलच्या महालावर जाऊन तेथें त्याची भेट घेण्याचें ठरविलें. कार्डिनलची भेट घेण्याखेरीज त्याला आतां गत्यंतरहि राहिलेलें नव्हतें. कारण आपली बहीण डचेस हिचा खून घडवून आणल्यानंतर ड्यूक फर्डिनान्ड याचें डोकेंच बिघडून गेलें.

पण ॲन्टोनियो मिलान शहरीं आलेला आहे हें कार्डिनलला आधींच कळलेलें होतें. त्यानें त्याच सायंकाळीं बोसोलाला फर्माविलें कीं " ॲन्टोनियो कुठें आहे त्याचा पत्ता लाव आणि त्याचा लगेच्या लगेच खून करून टाक." हा हुकूम मिळाल्यावर बोसोला म्हणाला : " कार्डिनलसाहेब, डचेसचा खून घडवून आणण्याचा कट आपणच रचलेला होता. तें काम मीच उरकून आलों आहें. आतां त्या कामगिरीबद्दल आपण मला बक्षीस दिलें पाहिजे. तें बक्षीस मिळाल्यावर मग मी ही नवी कामगिरी उरकून घेतों." कार्डिनलनें देखील त्याला बक्षिस देण्याचें साफ नाकारलें.

मग मात्र बोसोला भानावर आला. त्यानें अशीं शपथ घेतली कीं आतां आपण ॲन्टोनियोला सामील व्हायचें आणि डचेसच्या मृत्यूचा बदला घ्यायचा.

पण त्या रात्रीं सगळेच ठरलेले बेत फिसकटले. ड्यूक फर्डिनान्ड व कार्डिनल यांच्यावर सूड उगविण्यासाठीं ज्या ॲन्टोनियोची मदत घेण्याचें बोसोलानें ठरविलें होतें, त्या ॲन्टोनियोचा खुद्द त्याच्याच हातून चुकून अंधारांत

खून पडला. आपली ही चूक लक्षांत आल्यावर बोसोला बेभान झाला. थोड्याच मिनिटांच्या अवधींत त्यानें कार्डिनलवर हल्ला चढविला आणि त्याच्या छातींत सुरा भोंसकून त्याला जागच्या जागीं ठार केलें. पण तितक्यांत वेडापिसा झालेला ड्यूक फर्डिनान्ड एकदम त्या खोलींत घुसला आणि त्यानें बोसोलावर सुऱ्याचा वार केला. बोसोलानें मरतां मरतां आपली उरली सुरली सगळी शक्ति एकवटून ड्यूकवर सुऱ्याचा हल्ला चढविला. शेवटीं दोघेहि एकमेकांच्या सुरी-हल्ल्याला बळी पडले.

बाहेर पाहऱ्यावर असलेले गारदी हा हाणामारीचा प्रकार ऐकून घाबरले आणि धांवतच आंत आले. त्यांना तिथें हे तिघे मरून पडलेले सांपडले. रक्ताच्या या थारोळ्यांतच दरबारच्या एका मानकऱ्यानें माल्फीच्या डचेसचा अज्ञान मुलगा व ॲन्टोनियो या दोघांना आणून हजर केलें. याच मुलाला ॲन्टोनियोनें आपल्याबरोबर मिलानला नेलेलें होतें. अखेर आपली आई व आपले दोघे मामा यांच्या सगळ्या राज्याचा राजा म्हणून या मुलाच्या नांवानें ग्वाही फिरली.

## द डिनास्ट्स : राजवंश

*वाङ्मयप्रकार :* नाट्यकाव्य. *लेखक :* थॉमस हार्डी ( १८४०-१९२८ ). *कथानकाचा प्रकार :* ऐतिहासिक महाकाव्य. *काळ :* १८०६-१८१५. *स्थळ :* युरोप खंड. *प्रथम प्रकाशन :* १९०३-१९०८.

*प्रमुख पात्रें :* **नेपोलियन बोनापार्ट. जोसेफाइन,** त्याची प्रथम पत्नी. **मारी लुइझे,** त्याची द्वितीय पत्नी. **इंग्लंडचा राजा तिसरा जॉर्ज. रशियाचा झार अलेक्झांडर. ऑस्ट्रियाचा बादशहा फ्रान्सिस. सर विल्यम पिट,** इंग्लंडचा पंत-प्रधान. **काळ-देवता, धरित्री-माता, दया-देवता, अमंगल-देवता, उपरोध-देवता,** इत्यादि रूपकात्मक पात्रें.

*स मी क्ष ण :* निर्विकल्प दैवाच्या सर्वस्वीं आधीन असलेल्या माणसाचें चित्रण करण्याचा थॉमस हार्डीचा सगळ्यांत मोठा खटाटोप म्हणजे 'द डिनास्ट्स' हें प्रचंड महाकाव्यरूप नाट्य. नेपोलियनचें शोकपर्यवसायी चरित्र हा त्याचा विषय. या नाट्यकाव्यामध्यें हार्डीनें विविध प्रकारचे छंद उपयोजिलेले

असून यांतील गद्य देखील काव्यमय भाषेनें नटलेलें आहे. कवीनें या कलाकृती-मध्यें विविध दृश्यांचें दर्शन घडविलेलें आहे. हीं दृश्यें तर पृथ्वीच्या वर असलेल्या अंतराळापासून बादशहांच्या दरबारापर्यंत आणि तिथून खालीं येत येत झोंपडीवाल्याच्या शेकोटीपर्यंत विखुरलेलीं आहेत. त्यांतलें दक्षिण इंग्लंडमधील ग्रामीण लोकांचें दृश्य तर अत्यंत परिणामकारक वठलेलें आहे. १८०५ ते १८१५ या काळांत युरोपमध्यें जी सतत धामधूम चाललेली होती, तिचें भव्य चित्र उभारणाऱ्या या काव्यामध्यें अधूनमधून पात्रांच्या अभिनयाला अनुलक्षून प्रदीर्घ गद्य सूचना दिलेल्या आहेत. या सूचनांच्या द्वारां त्या काळच्या इतिहासाची ठसठशीत पार्श्वभूमि या चित्रामागें कवीनें उभी केलेली आढळते. या नाटकांतील घटना जसजशा घडत जातात तसतशी त्यांवर निरनिराळ्या रूपकात्मक प्रेक्षकांची टीका चाललेली असते. तिच्या जोडीला हार्डीनें निरनिराळे दृष्टिकोन सादर करण्याची क्रृति लढविलेली आहे. या दोहोंमुळें या भूतलावरील मानवी प्राण्यांचे हर्षखेद व त्यांच्या विविध हालचाली या ठळकपणें क्षुद्र वाटूं लागतात.

*कथानक :* सन १८०५ सालीं पश्चिम युरोपांतील माणसांच्या मोठ-मोठ्या हालचालींचें निरीक्षण करण्यासाठीं पृथ्वीच्या वर असलेल्या अंतराळांतील कोणत्या तरी भागामध्यें काळ-देवता, धरित्री-माता, अमंगल-देवता, उपरोध-देवता, दया-देवता इत्यादि सर्व देवता आपापल्या साथीदार गायकवादकांसह एकत्र जमल्या. दैवाच्या मूलभूत प्रेरणेचें दृश्य स्वरूप त्या वेळीं नेपोलियननें इंग्लंडवर स्वारी करण्यासाठीं चालविलेल्या तयारीमध्यें व्यक्त झालें.

या स्वारीचा योग्य रीतीनें मुकाबला कसा करावा याची पक्की तरतूद करण्यासाठीं इंग्लंडमध्यें पंतप्रधान सर विल्यम पिट हा पार्लमेंटांतील अलिप्ततावादी सभासदांशीं हमरीतुमरीवर येऊन वाद करीत होता. त्या दरम्यान नेपोलियन मिलान शहरीं गेला आणि तिथें त्यानें इटलीचा राजा म्हणून स्वतःच्या शिरावर राजमुकुट धारण करण्याचा समारंभ घडवून आणला. या राज्याभिषेकाच्या निमित्तानें ज्या लटपटी चाललेल्या होत्या, जो थाटमाट करण्यांत आला, त्या सगळ्यांची आकाशांतील देवतांनीं खूप थट्टा केली. दया-देवता त्या वेळीं भूतलावर आली आणि तिनें नेपोलियनला चांगलेंच बेचैन केलें. "अरे, तुझा मूळ हेतु स्वातंत्र्याचा

पुरस्कार करण्याचा होता ना? आणि आतां हें तूं काय करून बसलास?" असे प्रश्न विचारून तिनें त्याला भंडावून सोडलें.

समुद्रावर फ्रेंच व स्पॅनिश आरमारांनीं मिळून खूप हानि सोसून इंग्लंडच्या आरमारावर विजय मिळविला खरा, परंतु त्या तसल्या 'पिऱ्हिक'* विजयापायीं एक घोटाळा झाला. इंग्लंडवरील संकल्पित स्वारीसाठीं जें आरमाराचें पाठबळ पाहिजे होतें तें मिळविण्यांत अडथळा आला. इंग्लंडच्या दक्षिण किनाऱ्यावर अफवांच्या भुतांनीं खूपच धमाल उडवून दिली. मच्छीमार जहाजांचा एक काफिला येत होता, तो बघून किनाऱ्यावरील लोकांचा असा चुकीचा समज झाला कीं हा फ्रेंचांचा आरमारी काफिलाच इंग्लंडवर स्वारी करण्यासाठीं येत आहे. आणि डोंगरांच्या कड्यांवर नि टेंकड्यांच्या माथ्यांवर इषाऱ्यांचे जाळ पेटविण्यांत आले. ते बघून किनाऱ्यावरील गांवांतले बिनलष्करी लोक गांवें सोडून पळत सुटले.

आपला दर्यासारंग व्हिलेन्यूव्हे हा स्पेनच्या काडिझ बंदरांत परत आला आहे असें नेपोलियनला कळलें. त्याबरोबर त्यानें इंग्लंडवर स्वारी करण्याची आपली योजना रद्द केली आणि पूर्वेकडे मोहरा फिरविला. तिकडील ऑस्ट्रिया व रशिया या देशांची इंग्लंडशीं गट्टी घडवून आणण्याचें काम पंतप्रधान पिट यानें करून ठेवलें होतें. म्हणून नेपोलियननें ऑस्ट्रिया व रशिया या दोन्ही देशांविरुद्ध मोहिमा चालू केल्या. हें बघून काळ-देवतेनें असा अभिप्राय दिला कीं या आगामी मोहिमांमध्यें जी डावपेंचांची आंखणी होणार आहे ती सर्व काळीं उपयोगी पडणारा आदर्श ठरणार आहे.

उल्म येथील लढाईंत नेपोलियननें ऑस्ट्रियनांचा धुव्वा उडविला. त्या बिचाऱ्यांना उगीचच अशी आशा वाटत होती कीं इंग्लंडचें आरमार उत्तर फ्रान्समध्यें फ्रेंच फौजांना गुंतवून ठेवील. पण तसें कांहींच घडलें नाहीं. लंडन शहरीं संयुक्त मंत्रिमंडळ स्थापन करण्याला राजाची परवानगी मिळविण्याच्या कामीं पंतप्रधान पिट याला यश आलें नाहीं. एकंदर कारभाराच्या भयंकर ओझ्यामुळें बिचाऱ्या पिटची तब्येत ढांसळूं लागलेली उघड उघड दिसूं लागली.

---

* वाजवीपेक्षां जास्त हानि सोसून मिळविलेला विजय. एपिरुसचा राजा पिऱ्हुस यानें रोमनांवर असा विजय ॲस्क्युलम येथें मिळविला. तेव्हांपासून हा शब्द रूढ झाला.

फ्रान्सचा दर्यासारंग व्हिलेन्यूव्हे याला काडिझ बंदरांतून मोर्चा हांकारण्याचा हुकूम मिळाला. नेल्सनच्या नेतृत्वाखालीं ट्राफल्गारजवळ ब्रिटिश आरमारानें फ्रेंच व स्पॅनिश आरमारांचा मुकाबला केला आणि त्यांचा सपशेल पराभव केला. या आरमारी लढाईत नेल्सन ठार झाला. पराभूत व्हिलेन्यूव्हेनें देखील मागाहून रेन्ने येथील एका खाणावळींत आत्महत्या केली.

ऑस्टरलित्झच्या लढाईत नेपोलियननें ऑस्ट्रियन व रशियन फौजांचा पराभव केला. मग त्याला ट्राफल्गारच्या आरमारी लढाईत इंग्रजांचा विजय झाल्याची बातमी कळली. त्याबरोबर त्यानें असा बेत केला कीं आपण युरोप खंडांतील सगळ्या बंदरांमध्यें इंग्रजांच्या जहाजांना येण्याची बंदी करूं. त्यानें ऑस्ट्रियाचा बादशहा फ्रान्सिस याला शांतता-तहाच्या अटी तोंडीं सांगून लिहून घ्यायला लावल्या. एक यःकश्चित माणूस खऱ्याखुऱ्या राजपुरुषाला कारकुनी करायला लावतो हें दृश्य त्या वेळीं हजर असलेले ऑस्ट्रियन अधिकारी वैतागानें बघत उभे होते. जुन्या राजघराण्यांना मुळासकट उपटून फेंकून देऊन नेपोलियन नवीं राजघराणीं स्थापन करीत होता, या प्रकारावर अफवा-देवता पॅरिस शहरीं टीका करूं लागली.

इंग्लंडचा पंतप्रधान पिट मरण पावला. राजा तिसरा जॉर्ज याला वेड लागलें. अशा परिस्थितींत इंग्लंडच्या वतीनें चार्ल्स जेम्स फॉक्स यानें नेपोलियनशीं शांतता-तहाच्या वाटाघाटी केल्या. परंतु नेपोलियन बादशहानें आपले खरे बेत लपविण्यासाठीं एक बुरखा म्हणून या वाटाघाटींचा उपयोग केला. त्यानें प्रशियावर स्वारी केली आणि जेनाच्या लढाईत जर्मनांना धूळ चारली. बर्लिन शहरीं बसून त्यानें असा फतवा काढला कीं युरोपांतील सगळ्या बंदरांमध्यें सगळ्या ब्रिटिश जहाजांना येण्याची संपूर्ण बंदी आहे.

यानंतर नेपोलियन व रशियाचा झार अलेक्झांडर ह्या उभयतांची नियेमेन नदीच्या कांठीं भेट झाली. या भेटीच्या वेळीं उभयतांनीं फ्रँको-रशियन दोस्तीचा तहनामा तयार केला. आपले विविध दोस्तीचे तहनामे रक्ताच्या बंधनांनीं आणखी अधिक दृढ करावेत अशी आपली इच्छा असल्याचें नेपोलियननें या मुलाखतीच्या वेळीं बोलून दाखविलें. यावर काळ-देवता उपरोधिकपणें म्हणाली: "दैवाच्या मूलभूत प्रेरणेचें घटित ज्यांना बांधतां येतें अशा थोड्या लोकांमध्यें नेपोलियनची गणना केली पाहिजे."

पोर्तुगाल देश जिंकण्याच्या कामीं स्पॅनिश लोकांना मदत करण्यासाठीं आलेला एक मित्र म्हणून नेपोलियननें स्पेनवर स्वारी केली. स्पेनच्या बुरबॉन राजघराण्यानें आपला राज्यावरील हक्क सोडून दिला आणि नेपोलियनचा भाऊ जोसेफ याच्या नांवानें स्पेनचा राजा म्हणून ग्वाही फिरली. मग बुरबॉन राजघराण्याच्या वतीनें गनिमी दलें लढूं लागलीं आणि त्यांनीं इंग्रजांची मदत मिळविली. इंग्लंडचें आरमार स्पेनवर स्वारी करण्यासाठीं पोर्तुगालकडे निघालें.

इकडे नेपोलियन पॅरिस शहरीं परत आला. त्यानें आपली पत्नी जोसेफाईन हिला सांगितलें कीं मी तुझ्याशीं काडीमोड घेऊं इच्छितों. जोसेफाइनच्या पोटीं नेपोलियन बादशहाला एकहि मूल झालेलें नव्हतें आणि बादशहाला तर आपण नव्यानेंच स्थापन केलेला राजवंश कायमचा चालू कसा ठेवावा याची फिकीर पडलेली होती.

पण तेवढ्यांत इंग्रजांनीं स्पेनच्या द्वीपकल्पावर स्वारी केली. तेव्हां तिकडच्या मोहिमेचें मार्गदर्शन करण्यासाठीं नेपोलियन बादशहाला स्पेन देशाकडे जाणें भाग पडलें. यानंतर ऑस्ट्रियांत युद्धाची तयारी चालू झालेली आहे अशी बातमी नेपोलियनला कळली. लगोलग त्यानें ऑस्ट्रियावर स्वारी केली आणि वाग्रामच्या रणमैदानावर ऑस्ट्रियन फौजेची दाणादाण उडविली. इंग्रजांनीं मात्र ड्यूक ऑफ वेलिंग्टन याच्या नेतृत्वाखालीं स्पेनमध्यें फ्रेंचांचें कांहीं एक चालू दिलें नाहीं. या क्षणीं अमंगल-देवतेनें उपरोध-देवतेला मुद्दाम बजावलें : “ उगीच नाक वर करून शेखी मिरवूं नकोस. तुझ्यासमोर जें आनंदपर्यवसायी नाटक घडतंय तें दैवाच्या मूलभूत प्रेरणेनं मध्येंच बंद पडेल हें विसरूं नकोस.”

इंग्रजांनीं आपली फौज “ शेल्डट ” च्या मोहिमेवर धाडली. परंतु या फौजेंत दोषी तापाची सांथ पसरून तिची भयंकर हानि झाली. यामुळें इंग्रजांच्या या मोहिमेचा सपशेल फज्जा उडाला.

या वेळीं नेपोलियनला आपला खून होईल कीं काय अशी भयंकर धास्ती वाटूं लागली. परंतु त्याचबरोबर आपला राजवंश कायम टिकविण्यासाठीं त्याची तगमग अजूनहि चालूच होती. त्यानें एकाच वेळीं दोन राजघराण्यांशीं सोयरिकीचीं बोलणीं चालू केलीं. एखादी रशियन राजकन्या हातीं लागते का बघावी म्हणून त्यानें रशियनांशीं वाटाघाटी आरंभल्या. त्याच वेळीं ऑस्ट्रियन राजकन्या मारी लुइझे हिच्याशीं लग्न करण्यासाठीं त्यानें ऑस्ट्रियनांना गळ घातली. रशियाच्या

झारनें नेपोलियनशीं सोयरीक करण्याचें मान्य केलें. पण त्याच्या अगोदरच नेपोलियननें मेट्टरनिच याजमार्फत वशिला लावून ऑस्ट्रियन राजकन्या मारी लुइझे हिच्याशीं आपलें लग्न ठरवूनहि टाकलें होतें. हें लग्न झालें त्या वेळीं अनेक उच्चपदस्थ पुरोहितांची गैरहजेरी ठळकपणें जाणवली. या प्रकारामुळें रशियनांना नेपोलियनचा राग आला. त्यांनीं युद्धाची तयारी केली. दरम्यान इंग्रजांनीं स्पेन-मध्यें ड्यूक ऑफ वेलिंग्टनच्या नेतृत्वाखालीं आल्बुएराच्या लढाईत फ्रेंचांवर निर्णायक विजय मिळविला.

योग्य वेळीं मारी लुइझे प्रसूत होऊन नेपोलियनला वारस एकदांचा मिळाला. स्पेनमध्यें इंग्रजांना विजय मिळाल्यावर इंग्लंडचा वेडा राजा मरण पावला. युरोपच्या मुख्य भूमीवर फ्रान्स व रशिया यांचें युद्ध लवकरच जुंपणार असा रागरंग दिसूं लागला.

पुन्हा नीयेमेन नदीच्याच तीरावर नेपोलियनला अपशकुन झाला. तो घोड्यावरून पडला. दया-देवतेनें असें भाकित केलें कीं नेपोलियनच्या "ग्रँड फ्रेंच फौजेला" रशियावरील मोहिमेंत फार हालअपेष्टा भोगाव्या लागणार. स्पेनमध्यें वेलिंग्टननें सालामांकाच्या रणांगणावर फ्रेंचांना पाणी पाजलें. तिकडे नेपोलियननें बोरोडिनोच्या रणांगणांवर भयंकर हानि सोसून रशियनांवर विजय मिळविला, आणि मग फ्रेंच सेना मॉस्को शहरांत शिरली तेव्हां तिला तें शहर ओसाड पडलेलें असून त्यांत आगीच्या ज्वाळा धडाडत आहेत असें आढळलें.

मग फ्रेंच फौजांची सार्वत्रिक माघार सुरू झाली. रशियांतील स्तेपी ( गवताळ मैदानांच्या ) प्रदेशांत जिकडे तिकडे बर्फच बर्फ पडलेलें होतें आणि थंडीचा कडाका माजलेला होता. अशा प्रतिकूल हवेंत त्या प्रदेशांतून फ्रेंच फौजा लिथुआनियाच्या दिशेनें माघार घेत होत्या. हजारों फ्रेंच सैनिक थंडीनें गारठून मरण पावले. या फौजांच्या दोन्ही बगलांवर रशियन घोडदळाचे एकसारखे हल्ले होत होते. या घोडदळानें हजारों फ्रेंच सैनिकांना कापून काढलें. नेपोलियन आपली उरली सुरली मूठभर फौज तशीच वाटेंत सोडून देऊन झपाट्यानें मजल दर मजल करीत पॅरिस राजधानीकडे चालता झाला. रशियांतील आपल्या वाताहतीची बातमी राजधानींत थडकण्याच्या अगोदर आपण स्वतः तिथें हजर व्हावें असा त्याचा बेत होता. आतां त्याच्यासमोर वाढून ठेवलेली मुख्य कामगिरी म्हणजे आपलें उध्वस्त होऊं लागलेलें साम्राज्य कसेंबसें आटोक्यांत ठेवणें हीच होती.

इंग्रजांनीं स्पेनमध्यें विजयांमागून विजय मिळविण्याचा सपाटा चालविला. ऑस्ट्रिया दोस्तांना येऊन मिळाला. ऑस्ट्रियन व रशियन फौजा एकत्र आल्या आणि रणमैदानावर त्यांच्या हातून नेपोलियनला पराभव पतकरावा लागला. मग दोस्तांनीं खुद्द फ्रान्स देशावरच स्वारी केली. नेपोलियनला आपलें राजसिंहासन सोडून देणें भाग पडलें. भूमध्य समुद्रांतील एका बेटावर त्याला हद्दपार करण्यांत आलें.

नेपोलियनचा वारस, इटलीचा बालराजा आणि राजमाता मारी लुइझे हीं दोघें ऑस्ट्रियांत राहायला गेलीं. फ्रान्सच्या जुन्या बुरबॉन राजघराण्यांतील वारस पुन्हां फ्रान्सच्या सिंहासनावर चढला. युरोपमध्यें सार्वत्रिक शांतता कशी प्रस्थापित करावी याविषयीं चर्चा करण्यासाठीं ऑस्ट्रियाची राजधानी व्हिएन्ना येथें एक कॉंग्रेस भरली.

तेवढ्यांत नेपोलियन एल्बा बेटावरून सटकला. वाटेंत फौज गोळा करीत करीत त्यानें परत पॅरिस शहर गांठलें. दोस्तांनीं नेपोलियनला बंडवाला म्हणून जाहीर केलें आणि त्याचा पुन्हां पाडाव करण्यासाठीं तयारी चालविली.

नेपोलियनची फ्रेंच फौज बेल्जियमच्या सरहद्दीनजीक येत आहे अशी बातमी कळतांच बेल्जियमची राजधानी ब्रुसेल्स या शहरांत चालू असलेला एक खासगी नृत्यसमारंभ तसाच सोडून लोक सैरावैरा पळत सुटले. जवळ जवळ अवघ्या एकाच रात्रींत नेपोलियननें खूप मोठ्या फौजेची संघटना करून तिला रणांगणांवर आणून ठेवलें. परंतु बेल्जियममधील इंग्रज व प्रशियन फौजांच्या दरम्यान पाचर मारून त्यांना अलग करण्यांत तो अपेशी ठरला. आणि वॉटर्लू गांवाच्या दक्षिणेकडील रणभूमीवर त्याची सपशेल दाणादाण उडाली. नेपोलियनच्या नव्या सद्दीचे शंभर दिवस अशा रीतीनें संपून गेले.

मग अंतरिक्षामध्यें सर्व देवतांचें संमेलन भरलें. या संमेलनांत काळ-देवतेनें असें दाखवून दिलें कीं खालीं पृथ्वीतलावर निवास करीत असलेले मानवी प्राणी जणूं काय स्वप्नांत असल्याप्रमाणें वागतात; हे मानवी प्राणी जणूं काय कळसूत्री बाहुल्या आहेत आणि त्यांना बांधलेल्या दोऱ्या दैवाची मूलभूत प्रेरणा कचाकच खेंचून त्यांना जसें नाचवील तशा या बाहुल्या नाचत असतात. याला अनुलक्षून काळ-देवतेनें नेपोलियनच्या पराभवाचें उदाहरण

दिलें. ती म्हणाली: " हा नेपोलियन म्हणजे एखाद्या क्षुद्र कीटकासारखा आहे. युगानुयुगांच्या प्रचंड इतिहासवृक्षावरील आड बाजूच्या कुठें तरी दडून असलेल्या पानावर हा कीटक सरपटत होता इतकेंच काय तें."

यावर दया-देवतेनें विचारलें : " पण काय हो, खालीं पृथ्वीतलावर या ज्या घडामोडी घडत होत्या त्यांचा हेतु काय असावा ? "

तेव्हां उपरोध-देवता उत्तरली : " कसचा हेतु नि कसचं काय घेऊन बसलांत ! मानवी प्राण्यांच्या वर्तनाचं प्रेरक व मार्गदर्शक असं जें गरगरां फिरणारं चाक आहे ना, तें फिरविण्याचं काम केवळ एका मुक्या प्राण्याच्या हातीं आहे."

## एलेक्ट्रा

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* युरिपिडीज ( इ. स. पूर्वी ४८०-४०६ ). *कथानकाचा प्रकार :* अभिजात शोकान्तिका. *काळ :* ट्रॉय शहराच्या पाडावानंतरचा. *स्थळ :* आर्गस. *पहिला प्रयोग :* इ. स. पूर्वी ४१३.

*प्रमुख पात्रें :* **एलेक्ट्रा**, ॲगॅमेम्नॉन याची कन्या. **ओरेस्टेस**, तिचा भाऊ. **क्लिटेम्नेस्ट्रा**, तिची आई. **आयेगिस्थस**, क्लिटेम्नेस्ट्रा हिचा प्रियकर.

*समीक्षण :* एका स्त्रीला आपल्या आईविषयीं व आपल्या सावत्र वडिलांविषयीं वाटणारा सर्वंकष द्वेष, आणि त्याचबरोबर आपल्या ठार मारल्या गेलेल्या वडिलांविषयीं व आपल्या हद्दपार भावाविषयीं तिला वाटणारें प्रेम—यांचा मानसशास्त्रीय अभ्यास म्हणजे युरिपिडीजचें प्रस्तुत ' एलेक्ट्रा ' हें नाटक. एलेक्ट्रा या पात्राचाच एकंदर नाट्यप्रसंगावर प्रभाव पडलेला स्पष्ट दिसतो. कारण ज्यांचा ती द्वेष करते, त्यांना ठार करण्यासाठीं तीच आपल्या भावाला प्रवृत्त करते. एलेक्ट्रा, तिचा भाऊ आणि तिची आई हीं तीन पात्रें युरोपिडीजनें अशीं निर्माण केलेलीं आहेत कीं अथेन्सच्या प्राचीन रंगभूमीवर तीं जितकीं सजीव दिसत होतीं तितकींच आजहि सजीव वाटतात.

*कथानक :* आर्गसचा राजा ॲगॅमेम्नॉन हा ट्रॉयच्या युद्धावरून घरीं परत आला. पुनरागमनाच्या मेजवानीच्या वेळींच त्याची पत्नी क्लिटेम्नेस्ट्रा आणि तिचा प्रियकर आयेगिस्थस या दोघांनीं मिळून त्याचा अत्यंत क्रूरपणें खून केला. मागाहून आयेगिस्थस व क्लिटेम्नेस्ट्रा या खुनी जोडप्यानें

लग्न केलें आणि आयेगिस्थस हा राजा झाला. ॲगॅमेम्नॉन याचा एक लहान मुलगा होता. त्याचें नांव ओरेस्टेस. त्यालाहि आयेगिस्थसनें ठार केलें असतें, परंतु एका नातेवाइकानें अगोदरच त्याची रवानगी फोसिस या गांवीं केली म्हणून तो मुलगा जिवानिशीं वांचला. राहतां राहिली एलेक्ट्रा. ही ॲगॅमेम्नॉनची कन्या. ती कदाचित वडिलांच्या खुनाचा सूड घेण्याइतक्या सामर्थ्यशाली वीर पुरुषाशीं लग्न करील असा धोका होता. तो टाळण्यासाठीं या खुनी जोडप्यानें तिचें एका म्हाताऱ्या शेतकऱ्याशीं लग्न लावून दिलें.

एके दिवशीं एलेक्ट्रा व तिचे शेतकरी यजमान अशीं दोघें रोजचें काम करण्यासाठीं बाहेर गेलेलीं होतीं. तितक्यांत ओरेस्टेस वेषांतर करून आपला विश्वासू मित्र पायलाडेस याच्या समवेत एलेक्ट्राच्या शोधार्थ त्या शेतावर येऊन दाखल झाला. त्या दोघांना ती एक गाणें गात असलेलें ऐकायला मिळालें. या गाण्यांत तिनें आपल्या दुर्दैवाची कहाणी सांगितलेली होती.आपल्या वडिलांच्या मृत्यूला अनुलक्षून तिनें एक विलापिकाहि गाइली.

तिचें हें शोकगीत चालू असतांनाच एक हरकारा तिथें आला. त्यानें अशी बातमी आणली कीं हेरा या देवीच्या प्रीत्यर्थ एक महोत्सव होणार आहे आणि आर्गस-निवासी सर्व तरुणी या उत्सवाला हजर राहणार आहेत. हें ऐकून एलेक्ट्रा म्हणाली : “ मीं तिकडे जाणारच नाहीं. मी आपली माझ्या शेतावरच काम करीत राहीन. आर्गस-निवासी नागरिकांच्या कींव करणाऱ्या नजरा मला बघवणार नाहींत. त्यापेक्षां मी त्यांच्या दृष्टीस न पडलेलीच बरी. ” हरकारा म्हणाला : “ असं नका करूं. देवदेवतांचं दर्शन घ्या, त्यांची सेवाचाकरी करा आणि त्यांची मदत मागून आपली मनकामना पूर्ण करून घ्या. ”

एलेक्ट्राची अशी समजूत झाली कीं ओरेस्टेस व पायलाडेस हे दोघे आपल्या भावाचे जिवाभावाचे मित्र आहेत. म्हणून तिनें त्यांना आपल्यावर ओढवलेल्या दुर्धर प्रसंगाची कहाणी सांगितली. ती ओरेस्टेसला आग्रहपूर्वक म्हणालीः “आमच्या वडिलांच्या खुनाचा, आणि माझ्या भावावर व माझ्यावर हा जो वनवास करण्याचा प्रसंग आलेला आहे त्याचा, बदला घेण्याची कामगिरी तूं पार पाडली पाहिजेस. तूं माझ्या भावाचा मित्र आहेस. मी तुझी धर्माची बहीण आहे. माझी येवढी विनंती तूं मानली पाहिजेस. ” दरम्यान

आयेगिस्थसनें असा जाहीरनामा काढला कीं जो कोणी ओरेस्टेसला ठार करील त्याला चांगल्यापैकीं बक्षीस मिळेल.

एलेक्ट्राचे शेतकरी यजमान आपल्या कामावरून परत आले. त्यांनीं ओरेस्टेस व पायलाडेस यांना आपल्या घरीं पाहुणे म्हणून राहण्याचा आग्रह केला. मग एलेक्ट्रानें आपल्या यजमानांना एका खास कामगिरीवर धाडून दिलें. ज्या नातेवाइकानें ओरेस्टेसला आर्गसहून दुसऱ्या गांवीं नेलें होतें, त्याला बरोबर घेऊन येण्याची ही कामगिरी होती. हा नातेवाईक म्हणजे ओरेस्टेस व एलेक्ट्रा यांचा मानलेला पिताच होता. हा वयोवृद्ध गृहस्थ शेतकऱ्याच्या झोंपडीकडे यायला निघाला. वाटेंत त्यानें ॲगॅमेम्नॉनच्या थडग्याचें दर्शन घेतलें. त्या थडग्यावर कशाचा तरी बळी दिलेला त्याला दिसला. त्याचप्रमाणें त्या थडग्यावर थोडेसे लाल केंसहि विखुरलेले दिसले. यावरून त्यानें असें अनुमान काढलें कीं ओरेस्टेस जवळपासच कुठें तरी असला पाहिजे. हें अनुमान त्यानें एलेक्ट्राजवळ बोलून दाखविलें. पण एलेक्ट्रा उत्तरली कीं तो आर्गस नगरांत हजरें असण्याचा कसलाच संभव नाहीं. तेवढ्यांत ओरेस्टेस झोंपडींतून बाहेर आला त्याबरोबर त्या वृद्ध गृहस्थानें त्याच्या कपाळावरचा वण ओळखला. अशा प्रका बहीणभावंडांची एकमेकांना ओळख पटली.

त्या वृद्ध शेतकऱ्यानें दिलेल्या सल्ल्यानुसार ओरेस्टेसनें असा बेत केला कीं आयेगिसस्थच्या अध्यक्षतेखालीं जी यज्ञाची मेजवानी होणार आहे तिला हजर राहावें. एलेक्ट्रानें आपल्याला मूल झाल्याची बातमी क्लिटेम्नेस्ट्राला कळविण्यासाठीं आपल्या यजमानांची रवानगी तिच्याकडे केली. आपल्या वडिलांच्या खुनाचा बदला घेण्याचें जें महत्कार्य आपण आरंभतों आहोंत त्यामध्यें आपल्याला मदत मिळावी अशी एलेक्ट्रा व ओरेस्टेस या बहीण-भावंडांनीं कुलदेवतांची व ग्रामदेवतांची करुणा भाकली.

मग ओरेस्टेस व पायलाडेस हे दोघे मित्र बागेंतून चालले. वाटेंत त्यांना आयेगिस्थसनें हटकलें. या दोघांनीं त्याला अशी थाप ठोकून दिली कीं "आम्ही दोघे थेसालीचे नागरिक आहोंत आणि झ्यूस देवतेला यज्ञाचा हवि द्यायसाठीं चाललों आहोंत." तेव्हां आयेगिस्थसनें त्यांना अशी बातमी सांगितली कीं "मी इथं अप्सरांना यज्ञाचा हवि द्यायची तयारी करतों आहें.

या धर्मकृत्यांत भाग घेण्यासाठीं तुम्ही दोघे पण इथंच थांबा आणि हें कार्य उरकल्यावर मग पुढं जा. " त्याप्रमाणें ते दोघे तिथें थांबले.

आयेगिस्थसनें अप्सरांसमोर वांसराचा बळी दिला. त्या वांसराचीं आंतडीं तपासण्यामध्यें तो गुंतला आहे ही संधि साधून त्याचीच सुरी ओरेस्टेसनें उचलली व त्याच्या पाठींत खुपसली. मग तिथल्या नोकरांसमोर ओरेस्टेसनें आपलें खरें स्वरूप जाहीर केलें. त्याबरोबर आपल्या दिवंगत धन्याच्या पुत्राचा या नोकरांनीं जयजयकार केला.

ओरेस्टेसनें आयेगिस्थसचा मुडदा उचलला आणि तिथून तो परत शेतकऱ्याच्या झोंपडींत नेला. तिथें एलेक्ट्रानें त्या मुडद्याची भरपूर विटंबना केल्यानंतर बहीणभावंडांनीं त्याच ठिकाणीं तो लपवून ठेवला.

क्लिटेम्नेस्ट्रा शेतकऱ्याच्या झोंपडीकडे आली. तिला बघतांक्षणीं ओरेस्टेस संदेहांत पडला. आईला ठार करण्याचा आपला मूळ बेत पार पाडावा का नाहीं याबद्दल त्याच्या मनांत चलबिचल सुरू झाली. मातृहत्येचें पातक जर आपल्या हातून घडलें तर देवदेवतांचा प्रकोप आपल्यावर ओढवेल असें त्याला वाटूं लागलें. परंतु एलेक्ट्रानें हा सूड घेण्याचा कार्यक्रम पूर्णपणें पार पाडण्याचा निर्धार केलेला होता. ती म्हणाली : " भाऊराया, आपण देवदेवतांना कौल लावून विचारलं होतं आणि त्यांनींच तुला असा आदेश दिला कीं तूं आयेगिस्थस व क्लिटेम्नेस्ट्रा या पापी प्राण्यांना नष्ट करून टाक. या आदेशाचा तुला या घडीला विसर पडलेला दिसतो ! "

यावर एलेक्ट्राला उद्देशून क्लिटेम्नेस्ट्रानें स्वतःचें समर्थन करणारें भाषण केलें. ती म्हणाली : " मुली, तुझे वडील व माझे पति ॲगॅमेम्नॉन यांनीं तुझीच बहीण इफिजीनिया हिचा बळी देवदेवतांना अर्पण केला आणि मगच ते ट्रॉयच्या मोहिमेवर गेले, हें तुला आठवतं का ? आणि ते येवढ्यावरच थांबले नाहींत. ट्रॉयची मोहीम फत्ते करून परत येतांना त्यांनीं ट्रॉयची राजकन्या कॅस्सान्ड्रा हिला आपली रखेली म्हणून आणली हेंहि तूं कशी विसरलीस बरं ? "

एलेक्ट्राच्या मनावर आईच्या या युक्तिवादाचा कांहीं एक परिणाम झाला नाहीं. तिनें तिच्यावर अनेक आरोप शाबीत केले. शेवटीं ती म्हणाली : " तूं आमची आई कसली ? तूं नीच पापी आहेस. मी आणि माझा भाऊराया ओरेस्टेस अशीं दोघं मिळून तुझा खून करतों आहोंत हेंच न्यायाला धरून आहे. "

राणी क्लिटेम्नेस्ट्रा आपली कन्या एलेक्ट्रा हिच्या तथाकथित प्रथम अपत्याप्रीत्यर्थ होमहवन करण्यासाठीं झोंपडींत शिरली. तिथल्या तिथेंच ओरेस्टेसनें तिचा खून पाडला. देवदेवतांनीं आपल्याला हा अत्याचार, रक्तपात नि मातृहत्येचा भयंकर गुन्हा करण्याला कां प्रवृत्त केलें या विचारानें बिचारा ओरेस्टेस अतिशय दुःखी झाला आणि धाय मोकलून रडूं लागला.

क्लिटेम्नेस्ट्राच्या अंगीं अर्धा दैवी अंश होता. तिचा प्राण गेल्यानंतर तिचे दोघे भाऊ म्हणजे झ्यूस या देवाचे जुळे मुलगे डायोस्कुरी हे तिथें प्रगट झाले. एलेक्ट्रा व ओरेस्टेस हीं बहीणभावंडें आपल्या हातून हें जें काय घडलें त्यामुळें शरमिंदीं होऊन बसलेलीं होतीं. द्वेष व प्रेम, अभिमान व नामुष्की, अशा परस्परविरोधी संमिश्र भावनांचें थैमान त्यांच्या मनामध्यें चाललेलें होतें. तिथें प्रगट झालेल्या जुळ्या भावांनीं असा अभिप्राय दिला कीं "हें आततायी कृत्य ॲपोल्लो देवानं दिलेल्या कौलाला अनुसरून तुम्ही केलंत, परंतु असा कौल देणं हें ॲपोल्लो देवाचं कृत्य शहाणपणाचं नव्हतं असं आमचं स्पष्ट मत आहे."

मग या जुळ्या देवांनीं उभय बहीणभावंडांना असा आदेश दिला: "ओरेस्टेसनं आपला मित्र पायलाडेस याच्याशीं आपली बहीण एलेक्ट्रा हिचं लग्न लावून द्यावं. खुद्द ओरेस्टेस याचा सतत पाठलाग फ्यूरीज या देवतांनीं करावा. असा पाठलाग करीत करीत त्या त्याला अथेन्स नगरीमध्यें कोर्टांत हजर व्हायला लावतील. तिथल्या खटल्यांत तो निर्दोषी ठरून सुटेल आणि मग एक स्वतंत्र नागरिक या नात्यानं तो या जगांत वावरूं लागेल."

## फाऊस्ट

*वाङ्मयप्रकार :* नाट्यकाव्य. *लेखक :* योहान्न वूल्फगांग फॉन गटे (१७४९-१८३२). *कथानकाचा प्रकार :* तत्त्वज्ञानात्मक रूपककथा. *काळ :* अनंत. *स्थळ :* विश्व. *प्रथम प्रकाशन :* १७९०-१८३१.

*प्रमुख पात्रें :* **फाऊस्ट**, सगळ्या ज्ञानाचा अभ्यास करणारा एक विद्यार्थी. **ग्रेट्चेन**, एक तरुणी. **मेफिस्टोफेलीस**, सैतान. **वाग्नर**, फाऊस्ट याचा नोकर. ट्रॉयची स्वरूप सुंदरी **हेलन** हें प्राचीन ग्रीसच्या इतिहासांतील पात्र. **होमुन्कुलुस**, एक छायाकृति.

*स मी क्ष ण :* ज्ञानपिपासेपायीं मानवी प्राण्याची अधोगति कशी होते हा तात्त्विक प्रश्न या नाट्यकाव्यामध्यें सादर केलेला आहे. अठरावें शतक हें बुद्धिवादाचें युग म्हणून प्रख्याति पावलें. त्या युगाला प्रतिसाद देत गटेनें असें ठांसून प्रतिपादन केलें कीं मानवी प्राण्याची बुद्धिप्रधानता हेंच जीवनांतलें सर्वंकष सत्य होय. या नाट्यकाव्यामध्यें कांहीं कांहीं वर्णनें अशा योग्यतेचीं आहेत कीं तीं जगांतील सगळया ललित साहित्यांत अत्यंत सुंदर व उदात्त म्हणून उठून दिसतील. आयुष्यांत निदान एक तरी क्षण असा यावा कीं जो चालू राहावा अशी आपल्याला तीव्र इच्छा व्हावी, ही जी उदात्त आर्त आरोळी फाऊस्टनें या नाट्यकाव्यामध्यें ठोकलेली आहे, तिचे पडसाद साऱ्या काळांतील साऱ्या मानवांच्या भावनाविश्वामध्यें युगानुयुगें दुमदुमत राहिलेले आहेत. या नाटकांत सादर केलेली विश्वव्यापी समस्याच अशा प्रकारची आहे कीं नाटकांतील घडामोडींचें स्थळ वा घटनांचा काळ निश्चित करणें केवळ अशक्यच ठरतें. कारण फाऊस्ट हा चिरंजीव व सर्वगामी आहे.

*क था न क :* तीन सर्वश्रेष्ठ देवदूत परमेश्वराच्या थोर थोर कृतींचें गुणगान करीत होते. तेवढ्यांत सैतान मेफिस्टोफेलिस तिथें प्रगट झाला नि म्हणाला : "मला पृथ्वीवरची एकंदर परिस्थिती फारच वाईट असल्याचं आढळून आलं." यावर "माणसाच्या अंगीं दुबळेपणा अनेक प्रकारचा असायचाच" हें परमेश्वरानें मुग्धपणें मान्य केलें. परंतु त्याचबरोबर परमेश्वर मिस्किलपणें सैतानाला उद्देशून म्हणाला : "माझा सेवक फाऊस्ट याला न्यायीपणाच्या, सदाचाराच्या मार्गापासून कुणीहि ढळवूं शकणार नाहीं." तेव्हां मेफिस्टोफेलिसनें परमेश्वराबरोबर अशी पैज मारली कीं फाऊस्ट याला मोहांत पाडून त्याच्या सेवाधर्मापासून त्याला विचलित करतां येईलच येईल. फाऊस्ट याच्या न्यायप्रिय नेकपणावर आपण विसंबून राहूं शकतों हें परमेश्वर जाणून होता. परंतु मेफिस्टोफेलिसला जर का फाऊस्ट याचा आत्मा हस्तगत करतां आला तर मात्र तो फाऊस्ट याला अधःपाताच्या मार्गानें खालीं खेचूं शकेल अशी परमेश्वराची या बाबतींतील धारणा होती. तथापि जें साध्य करतां येणें शक्य नाहीं तें साधायच्या खटपटींत फाऊस्ट गुंतलेला आहे म्हणून तो कदाचित् आपल्या तावडींत सांपडूं शकेल असें मेफिस्टोफेलिसच्या मनानें घेतलें.

आपण जें येवढें सगळें ज्ञान मिळविलें आहे, तेवढ्यावर फाऊस्ट संतुष्ट होईना. माणसाच्या कर्तृत्वाला मर्यादा असतात हें त्याच्या ध्यानांत आलें. या महान विश्वयंत्रणेमध्यें आपण स्वतः म्हणजे एक क्षुद्र जंतु आहोंत हेंहि त्याला दिसलें. अशा मनःस्थितींत असतांनाच तो आपला नोकर वाग्नर याला बरोबर घेऊन फिरायला निघाला. तात्विक स्वरूपाच्या विचारांचा ज्यांच्या मनाला अजिबात त्रास होत नाहीं अशा लोकांमध्यें मिळून मिसळून गप्पासप्पा कराव्यात असा त्याचा बेत होता. अशा उत्तेजक वातावरणामध्यें फाऊस्टला अगदीं कसें छान मोकळें मोकळें वाटूं लागलें आणि त्याला निःसंदिग्धपणें विचार करतां येऊं लागला.

या वेळीं वाग्नरला उद्देशून फाऊस्ट म्हणाला : "माझ्या शरीरांत दोन आत्मे वास्तव्य करीत आहेत. त्यांतला एक आत्मा या भूतलावरील सुखोपभोगांवर लुब्ध झालेला आहे; आणि दुसरा आत्मा असा आहे कीं इंद्रियगम्य सुखांच्या पलीकडे असलेल्या गोष्टी प्राप्त करून घेण्याची खटपट त्यानें चालविलेली आहे. परंतु जोंपर्यंत हा दुसरा आत्मा माझ्या रक्तामांसाच्या शरीरांतच अधिवास करून राहिलेला आहे, तोंपर्यंत त्याची ही आकांक्षा कधींहि सफल होणें शक्य नाहीं." आपला दैनंदिन जीवनक्रम हा अगदींच मर्यादित स्वरूपाचा आहे अशी सतत टोंचणी फाऊस्टला लागलेली होती. जेणेंकरून आपल्याला नव्या धर्तीच्या जीवनाचा लाभ होईल अशी कोणतीहि गोष्ट स्वीकारायला फाऊस्टची तयारी होती.

आतां फाऊस्टची मनोभूमिका आपली मात्रा लागू पडायला अनुकूल अशी झालेली आहे हें मेफिस्टोफेलिसच्या ध्यानांत आलें. मग मेफिस्टोफेलिसनें एका कुत्र्याचें रूप धारण केलें. जीवनाचा अर्थ काय असावा याचें चिंतन पुन्हां चालू करण्यासाठीं फाऊस्ट जेव्हां आपल्या घराकडे परतला तेव्हां हा कुत्रा त्याच्या मागोमाग चालूं लागला. घरीं गेल्यावर फाऊस्टनें बायबलाचा अभ्यास केला. त्यांतून त्यानें असा निष्कर्ष काढला कीं कांहीं तरी उपयुक्त वस्तु निर्माण करण्यासाठीं माणसाच्या शक्तीचा उपयोग झाला पाहिजे. फाऊस्ट आपल्या विचारांशीं झगडत असल्याचें पाहून कुत्रा पुढें सरसावला आणि मेफिस्टोफेलिस आपल्या खऱ्या स्वरूपांत प्रगट झाला. परंतु मेफिस्टोफेलिसच्या युक्तिवादांचा फाऊस्टवर कांहीं एक परिणाम झाला नाहीं.

मेफिस्टोफेलिस जेव्हां दुसऱ्यांदां फाऊस्टला भेटायला आला तेव्हां ही स्वारी आपल्या जाळ्यांत अडकायला किती तरी अधिक अनुकूल झालेली आहे असें त्याला आढळून आलें. या वेळीं फाऊस्टनें आपला निर्णय त्याला सांगून टाकला. फाऊस्ट म्हणाला : " माझे लढे जरी दैविक स्वरूपाचे असले तरी त्यांतून दाखविण्याजोगं फळ असं मी कसलंच निर्माण केलेलं नाहीं. तसं म्हटलं तर या भूतलावरील जीवनांतच माझं लक्ष गुंतलेलं आहे."

यावर मेफिस्टोफेलिसनें सूचना केली : " मग तुम्ही आतां असं करा. इंद्रियोपभोगांचं जीवन तुम्हांला जगतां येईल का ? तेंच जीवन तुम्हीं निवांतपणीं जगून बघा कसे." तेव्हां फाऊस्ट उच्च स्वरांत म्हणाला : " मी जर का कधीं काळीं स्वतःला आळशीपणांत गुरफटून घेऊन स्वस्थ पडून राहिलों, किंवा तूं जर मला आपल्या खुशामतखोरीच्या जोरावर आपल्या कह्यांत घेतलंस आणि मला आत्मसंतुष्ट करून ठेवलंस, तर मात्र मीं म्हणेन कीं फाऊस्टचा अवतार नक्कीच संपला."

परंतु फाऊस्टच्या बाबतींत एक विचित्र प्रकार असा होता कीं बहुतेक लोकांना ज्या गोष्टींमुळें जीवन जगण्यामध्यें पुरुषार्थ वाटतो, अशा गोष्टींवर फाऊस्टनें खुशाल पाणी सोडलेलें होतें. म्हणून मग त्यानें मेफिस्टोफेलिसबरोबर आणखी एक नवा करार केला. या कराराला अनुसरून फाऊस्ट म्हणाला : " जी अनुभूति टिकून राहावी अशी मला तीव्र इच्छा होईल अशा अत्यंत सखोल उदात्त अनुभूतीचा जर कधीं काळीं मला पत्ता लागला तर मी माझं अस्तित्व संपवून टाकीन. अर्थात् ही एक पैज आहे असं तूं समज. या कराराच्या योगानं मी माझा आत्मा विक्रीला काढला आहे असं मात्र तूं बिलकुल समजूं नकोस."

मग फाऊस्ट सवंग बदफैलीपणाच्या मोहांत सांपडतो का बघावें म्हणून मेफिस्टोफेलिसनें त्याची दोनदां चांचणी घेतली. परंतु दोन्ही प्रसंगीं मेफिस्टोफेलिसला अपयशच पदरांत घ्यावें लागलें. याच्या पुढची पायरी म्हणून त्यानें फाऊस्टला स्त्रीचें प्रेम देऊं केलें. यासाठीं प्रथम त्यानें फाऊस्टला चेटकिणीच्या स्वयंपाकघरांत नेलें. तिथें त्यानें त्याचा कायाकल्प घडवून आणला आणि त्याचें तारुण्य त्याला परत प्राप्त करून दिलें. यानंतर त्यानें ग्रेट्चेन ही अक्षुण्ण युवती फाऊस्टला अर्पण केली. परंतु त्या निरागस कुमारिकेच्या घरीं गेल्यावर त्यानें

तिच्यासमोरच शपथ घेतली कीं "मीं तुला कसलाहि अपाय करणार नाहीं. तूं अगदीं निर्धास्त ऐस."

मग मेफिस्टोफेलिसनें एक वेगळीच युक्ति केली. त्यानें या तरुणीला परस्पर भेट म्हणून रत्नखचित दागिने धाडून दिले. तिची बिचारीची अशी समजूत झाली कीं हे बहुमोल दागिने फाऊस्टनेंच आपल्या प्रेमाची खूण म्हणून आपल्याला दिले आहेत. फाऊस्टला तिचा मोह आवरेना. तो तिच्याकडे पुन्हां जाऊं लागला. तीहि त्याला वश झाली. त्याच्याशीं घडलेल्या या मीलनामध्यें आपल्या विशुद्ध प्रेमाची परिपूर्ति झाल्याचें समाधान तिला लाभलें.

पण ग्रेट्चेनच्या भावानें निराळीच भूमिका घेतली. "समाजाच्या दृष्टीनं तुझं हें कृत्य लाजिरवाणं आहे." अशी त्यानें तिची खातरजमा केली. यामुळें ग्रेट्चेन फारच दुःखीकष्टी झाली. तिच्या या मनःस्थितीचा फाऊस्टला फारच त्रास झाला; आणि शेवटीं रागाच्या भरांत त्यानें तिच्या भावाला ठार करून टाकलें. आपल्या शिरावर पापाचें केवढें प्रचंड ओझें आहे हें शेवटीं ग्रेट्चेन हिला जाणवलें.

इकडे मेफिस्टोफेलिसनें बदफैलीपणाचे आणखी कांहीं देखावे फाऊस्ट-समोर सादर केले. परंतु ग्रेट्चेनविषयींच्या प्रेमचिंतनानें फाऊस्टच्या भावनांचें उदात्तीकरण झालेलें होतें, आणि त्यामुळें त्याला सैतानाच्या दुष्ट प्रभावावर मात करतां आली. आपल्या प्रणयपूर्तीचा क्षण तसाच चिरंतन टिकून राहावा अशी फाऊस्टला इच्छा होईल या कल्पनेंत मेफिस्टोफेलिस मश्गुल झालेला होता. परंतु चिरंतन मानवी प्रेम आपल्या तळमळीचें समाधान करण्यास असमर्थ आहे ही गोष्ट फाऊस्ट जाणून होता. त्याला ग्रेट्चेनच्या दुःखी मनःस्थितीबद्दल मनापासून वाईट वाटलें आणि म्हणून तिचें सांत्वन करण्यासाठीं तो परत तिच्याकडे गेला; परंतु तेवढ्यांतच तिनें स्वतःचें मूल मारून टाकलेलें होतें. आणि आपल्याला झालेल्या प्राणदंडाच्या शिक्षेंतून वांचविण्याची खटपट आपल्या प्रियकराला करूं द्यायला ती अजिबात तयार झाली नाहीं.

यानंतर फाऊस्टला बरोबर घेऊन मेफिस्टोफेलिस बादशहाच्या दरबारांत दाखल झाला. बादशहानें फाऊस्टवर एक खास कामगिरी सोंपविली. तो म्हणाला: "माझं एक काम करा. या पृथ्वीतलावर आतांपर्यंत अस्तित्वांत असलेल्या मानवी प्राण्यांमध्यें सगळ्यांत जास्त सुंदर असा पुरुष व अशी स्त्री

मला तुम्ही दाखवून द्या. पुराण काळांत होऊन गेलेला पॅरिस व ग्रीसमधील ट्रॉय नगरांतली हेलन या दोघांचा असा लौकिक आहे. त्यांचंच दर्शन मला तुम्ही घडवा." फाऊस्टनें त्याप्रमाणें या दोन पौराणिक पात्रांच्या मूर्ति आपल्या कल्पनाशक्तीनें निर्माण करून बादशहाला सादर केल्या.

परंतु हेलनला बघतांक्षणीं तिची प्राप्ति करून घेण्याची त्याला येवढी भयंकर प्रबळ इच्छा झाली कीं तो तिथल्या तिथें झीट येऊन पडला. आणि मेफिस्टोफेलिस त्याला त्या तशा बेशुद्ध अवस्थेंतच उचलून आपल्या स्वतःच्या प्रयोगशाळेंत घेऊन गेला. हेलन म्हणजे आदर्श सौंदर्याचें प्रातिनिधिक रूप. तिच्याविषयीं फाऊस्टला येवढें विलक्षण आकर्षण कां वाटलें याचें मेफिस्टोफेलिसला कांहीं केल्या आकलन होईना.

पुढें फाऊस्टचा नोकर वाग्नर याची मदत घेऊन मेफिस्टोफेलिसनें ज्ञानदेवतेचा एक निराकार अवतार निर्माण केला. या अवताराला त्यानें होमुन्कुलुस असें नांव दिलें. फाउस्टच्या मनांत काय चाललें आहे हें पाहण्याचें सामर्थ्य या होमुन्कुलुसच्या अंगीं होतें. मग होमुन्कुलुस, मेफिस्टोफेलिस व फाऊस्ट असे तिघे मिळून ग्रीस देशाच्या दौऱ्यावर गेले. तिथें मेफिस्टोफेलिसनें अभिजात पुराणांतील अद्भुत कल्पनारम्य मूर्तींमधून एका विलक्षण आकृतीचें रूप उसनें घेतलें. मेफिस्टोफेलिसच्या मध्यस्थीनें एका सजीव हेलनला आणून फाऊस्टच्या स्वाधीन करण्यांत आलें. हेलनच्या सौंदर्याचा हा परमावधीचा आनंद लाभल्या-वर आतां तरी हा आनंदाचा क्षण चिरकाल टिकून राहावा म्हणून फाऊस्ट आक्रोश करील असें दिसत होतें. परंतु या क्षणभंगुर सौंदर्याचा उपभोग हा आपल्या इतर अनुभवांपेक्षां अधिक टिकणारा मुळींच नाहीं हें त्याच्या लवकरच ध्यानांत आलें.

स्वतःविषयींचें नवें ज्ञान प्राप्त करून घेऊन फाऊस्ट आपल्या मातृभूमीला परत आला. कांहीं तरी पुरुषार्थ करून दाखविणें हें आतां त्यानें आपलें ध्येय ठरविलें. मानवाला उपयोगी पडणारें असें कांहीं तरी निर्माण करण्याच्या कामीं आपल्या शक्तीचा वापर व्हावा या आपल्या अगोदरच्या प्रतिज्ञेचा त्यानें पुन-रुच्चार केला. एका काळीं त्याच्या अंगीं बाणलेलीं गूढरहस्यमय व जादुगिरी करणारीं जीं सामर्थ्यें एकवटलेलीं होतीं, त्या सगळ्यांची आतां हकालपट्टी झाली आणि आतां त्याला एकट्याला निसर्गाला सामोरा जातां येऊं लागलें. त्यानें

दलदल असलेली एक खूप मोठी जमीन हस्तगत केली आणि तिच्यांतील दलदलीचा निचरा करून तिच्यांत पिकें काढतां येतील अशी सुधारणा घडवून आणली.

अशीं कित्येक वर्षे गेलीं. आतां फाऊस्ट म्हातारा झाला. त्याची दृष्टि जाऊन त्याला आंधळेपणा आला. तेव्हां त्याला या गोष्टीची जाणीव आली कीं आपण एक खूप मोठा भूप्रदेश निर्माण केलेला आहे, त्या भूमीचा लोकांनीं ताबा घेतलेला आहे, हे लोक सतत क्रियाशील झालेले आहेत, आणि स्वतःच्या उपयोगीं पडेल असें कांहीं तरी करण्याच्या कामीं ते या क्रियाशीलतेचा वापर करीत आहेत. अशा स्वतंत्र व क्रियाशील लोकांच्या समुदायापुढें उभा असलेला एक माणूस या दृष्टीनें फाऊस्ट स्वतःकडे बघूं लागला, आपण त्यांच्याचपैकीं एक आहोंत याचा त्याला आत्मप्रत्यय आला.

आपण काय निर्माण केलें याची जाणीव त्याला ज्या क्षणीं आली तो हा क्षण आपल्याला किती तरी आनंददायक ठरलेला आहे आणि म्हणून हा क्षण असाच टिकून राहावा यासाठीं त्यानें आर्त आरोळी ठोकली. आपला स्वयंकेंद्रित आत्मनिष्ठपणा नष्ट झाला असून आपल्या स्वभावांत संपूर्ण परिवर्तन झालेलें आहे, आपण आतां निर्मितिक्षम समाजाचा एक घटक या नात्यानें आपल्या स्वतःच्या कृतींकडे बघणारा एक माणूस झालों आहोंत याचा साक्षात्कार या वेळीं फाऊस्टला झाला.

जीवन हें जगण्यायोग्य असूं शकतें हें आतां त्याच्या ध्यानांत आलें; पण ही जाणीव होण्याच्या क्षणींच तो मेफिस्टोफेलिसबरोबर लावलेल्या पैजेंत हरला. आतां सैतानानें फाऊस्टचा आत्मा स्वतःच्या ताब्यांत घेतला. परंतु वस्तुतः सैतानहि आपली पैज हरलेला होता. सर्वशक्तिमान परमेश्वराचें म्हणणें खरें ठरलें. फाऊस्टनें आपल्या आयुष्यांत जरी अनेक चुका केलेल्या असल्या तरी चांगुलपणा व सत्यता यांची जाणीव त्यानें सतत कायम ठेवलेली होती.

आपला स्वतःचा पराभव झालेला बघून मेफिस्टोफेलिस चिडला. त्यानें फाऊस्टच्या आत्म्याला परमेश्वरस्वरूपीं विलीन होण्याच्या कामीं अटकाव केला. परंतु या वेळीं देवदूत फाऊस्टला मदत करण्यासाठीं अवतीर्ण झाले. ते त्याला स्वर्गामध्यें अशा ठिकाणीं घेऊन गेले कीं तिथें जिकडेतिकडे क्रियाशील निर्मितीचेंच काम चाललेलें होतें. मरणोत्तर ज्या प्रकारचें जीवन खुद्द फाऊस्टनें पसंत केलें असतें, नेमकें तशाच प्रकारचें हें जीवन होतें.

# द फ्रॉग्ज : बेडूक

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* ॲरिस्टोफेनीस (इ. स. पूर्वी ४४८-३८५). *कथानकाचा प्रकार :* विनोदी उपहासिका. *काळ :* इ. स. पूर्वी पांचवें शतक. *स्थळ :* पाताळ लोक. *पहिला प्रयोग :* इ. स. पूर्वी ४०५.

*प्रमुख पात्रें :* **बॅकस**, दारूबाजी आणि चैनबाजी यांचा अधिष्ठाता देव. **झांथियास**, त्याचा गुलाम. **हर्क्युलीस**, पुराणांतील एक वीरपुरुष. **चारोन**, हेडीज येथील नावाडी. **युरिपिडीज**, एक प्रख्यात ग्रीक नाटककार. **एस्किलस**, दुसरा एक ग्रीक नाटककार.

*समीक्षण :* ॲरिस्टोफेनीसची प्रतिभा येवढी तडफदार होती कीं आज अस्तित्वांत असलेल्या त्याच्या आनंदपर्यवसायी नाटकांमध्यें त्यांचा मूळचा जोम जशाचा तसा कायम आहे. त्यांत केलेली मानवी स्वभावावरील टीका अजूनहि तितकीच बोंचक व मर्मभेदक असल्याचें जाणवतें. ॲरिस्टोफेनीसचें वाङ्मय समजून घेण्यासाठीं व त्याविषयीं आपुलकी वाटण्यासाठीं आपल्याला विद्वान पंडित होण्याची मुळींच जरुरी नाहीं. हा सगळ्या युगांमध्यें सारखाच प्रभावी ठरणारा वक्रोक्तिनिपुण लेखक आहे. मानवी स्वभावांतील सनातन उणीवांचें व मूर्खपणाचें जाहीर प्रदर्शन करण्यासाठींच त्यानें लेखनकार्य केलें.

*कथानक :* दारूबाजी व चैनबाजी यांचा अधिष्ठाता देव बॅकस यानें पाताळ लोकाची सफर करण्याचा बेत केला. यासाठीं तो आपला गुलाम झांथियास याला बरोबर घेऊन हर्क्युलीसला भेटायला गेला. पाताळ लोकाची सफर करण्यासाठीं जरूर तें मार्गदर्शन व सूचना आपल्याला हर्क्युलीसकडून मिळतील अशी बॅकस देवाची मनीषा होती. वाटेनें जातांना झांथियासची कुरकुर व विव्हळणें चालू झालें. आपल्याला अनेक ओझीं बरोबर न्यावीं लागत आहेत अशी तक्रार करून झांथियास कुरकुरत व विव्हळत होता. खरें सांगायचें म्हणजे स्वतः झांथियास एका गाढवावर स्वार झालेला होता. तरी देखील त्याचें हें 'आय् ओय्' मोठमोठ्यानें चालूच होतें. शेवटीं बॅकस देवाला देखील हें सहन करणें अशक्य झालें. म्हणून बॅकसनें सुचविलें : "अरे झांथियास, आतां तूं असंच कर. तूं या गाढवालाच खांद्यावर घेऊन थोडा वेळ चाल बघूं. म्हणजे तरी तुझी कुरकुर बंद होते का पाहूं या."

ही जोडगोळी एकदांची हर्क्युलीसपर्यंत जाऊन पोंचली. त्यांनीं हर्क्युलीसचा सल्ला विचारला. तेव्हां हर्क्युलीस म्हणाला : "बॅकस देवा, तुम्ही कुणाकडून तरी स्वतःला ठार मारून घ्या. म्हणजे मग आपसूखच तुम्ही मृतांच्या प्रदेशांत म्हणजेच पाताळ लोकांत दाखल व्हाल." परंतु बॅकस देवाला तर तिथें जिवंतपणींच जायला हवें होतें. कारण तिथल्या मोठमोठ्या नाटककारांना भेटून त्यांच्याशीं गप्पा मारायला तो फारच उत्सुक झालेला होता. आणि टीकाकारांनीं तर त्याला सांगूनच ठेवलें होतें कीं जे जे कोणी चांगले नाटककार होते ते ते सगळे मरून गेलेले आहेत.

त्यांतल्या त्यांत युरिपिडीज या नाटककाराला भेटण्याची तर त्याला अनिवार इच्छा झालेली होती. यावर हर्क्युलीसनें त्याला सल्ला दिला : "अहो बॅकस देवा, तुम्ही जे नाटककार अजून हयात आहेत त्यांच्यावरच समाधान मानून घ्या कीं !" पण बॅकसनें युक्तिवाद केला : "तें खरं रे. त्यांच्यांतला एक जरी आवडला असता तरी मी कबूल झालों असतों. मला हवा तसा नाटककार एक देखील ह्यांत नाहीं बघ." आणि मग, हर्क्युलीसकडून जरूर तें सगळें मार्गदर्शन घेतल्यावर तो पाताळ लोकाकडे चालता झाला. त्याच्याबरोबर झांथियास होताच. आणि आपल्याला ओझीं फार वाहावीं लागत आहेत म्हणून त्याची किरकिर तशीच चालू होती.

हे दोघे प्रवासी ॲचेरॉन नदीच्या कांठावर येऊन पोंचले. तिथें त्यांना चारोन हा नावाडी भेटला. त्यानें त्यांना होडींत बसवून पैलतीरावर नेऊन सोडलें. परंतु त्यांत सुद्धां एक गोम होती. होडीवाला भयंकर उग्र चेहऱ्याचा माणूस होता. त्यानें असा हट्ट धरला कीं वल्हीं मारण्याचें काम उतारूंनींच केलें पाहिजे. बिचारा बॅकस वल्हीं मारायला कबूल झाला. झांथियासनें आपल्या डोळ्यांमध्यें खुपऱ्या झाल्या आहेत या सबबीवर हें काम नाकारण्याचा प्रयत्न केला. परंतु चारोननें त्याचें बिलकुल ऐकून घेतलें नाहीं. त्यानें हा आरमारी पराक्रम स्वखुषीनें करण्याचें नाकारून स्वतःची बेइज्जत करून घेतली म्हणून चारोननें झांथियासला प्रवाहाच्या कडेकडेनें लांबचा बळसा घेऊन चालत चालतच नदीपार व्हायला भाग पाडलें.

इकडे बॅकस व झांथियास यांचें चारोनबरोबर बोलणें चाललें असतांना बेडकांच्या एका सबंध ताफ्यानें घोगऱ्या आवाजांत 'डरांव डरांव' असें सत्र-

संगीत जोरांत चालू केलें. रंगमंदिरामधील पिटांतले प्रेक्षक ज्या अर्थशून्य आरोळ्या मारतात त्यांचीच नक्कल या बेडकांनीं आरंभिली. वल्हीं मारतां मारतां बॅक्सच्या पाठींत उसण भरली आणि तो कण्हूं लागला. त्याचें हें कण्हणें बेडकांना खूपच मनोरंजक वाटलें.

अखेर एकदांचा सुरक्षितपणें पैलतीरावर पोंचल्यानंतर बॅक्सनें होडीवाल्याचें भाडें चुकतें केलें आणि आपल्या गुलामाला गांठून पुढील यात्रा चालू केली. वाटेंत या दुकलीला एक राक्षस भेटला. बॅक्सनें त्याला टाळून पुढें जाण्याची सक्त खबरदारी घेतली. तेवढ्यांत त्या राक्षसानें एका सुंदर स्त्रीचें रूप धारण केलें. मोठ्या मुष्किलीनें हे दोघे वाटचाल करीत करीत एकदांचे पाताळ लोकचा राजा प्लूटो याच्या वेशीपाशीं जाऊन थडकले.

हेडीज म्हणजे पाताळ लोक. त्या हेडीजच्या प्रवेशद्वाराजवळ आल्यानंतर बॅक्सला मूर्खपणा करण्याची हुक्की आली. आपण हर्क्युलीस आहोंत अशी त्यानें बतावणी केली. वास्तविक त्यानें असें करणें ही चूकच होती. कारण देवडीवाला आयाकस यानें तेवढ्यांत हांकाटी आरंभिली कीं आपला रखवालदार कुत्रा सेर्बेरस कुणी तरी चोरून नेला. या चोरीचा आळ बॅक्सवर घेऊन आयाकसनें त्याला भलभलत्या शिक्षा देण्याच्या धमकावण्यांचा सपाटा चालविला. तेव्हां मात्र बॅक्सनें आपली खरी ओळख त्याला दिली. यावर झांथियासनें बॅक्सवर भेकडपणाचा आरोप केला. परंतु बॅक्सनें आपल्यावर हा आरोप मुळींच लागू होऊं शकत नाहीं असें ठांसून सांगितलें.

मग बॅक्स व झांथियास यांनीं आपसांत असें ठरविलें कीं आपण एक-मेकांच्या भूमिकांची अदलाबदल करूं या. झांथियासनें स्वतःच हर्क्युलीस असल्याची बतावणी केली आणि बॅक्स त्याचा गुलाम झाला व गुलामाचीं ओझीं त्यानें स्वतःच्या खांद्यावर घेतलीं. पण तेवढ्यांत प्रॉसरपाइनचे नोकर आंत आले आणि त्यांनीं झांथियासची उत्कृष्ट करमणूक करण्याची तयारी दर्शविली. तेव्हां बॅक्सनें आपला मूळ मनसुबा फिरविला आणि आपल्या अस्सल स्वरूपांत पुन्हां प्रगट होण्याचा आग्रह धरला.

तोंवर आयाकस परत आला. कुणाला तरी शिक्षा करावी यासाठीं तो अगदीं आंसुसलेला होता. तेव्हां झांथियासनें त्याला सांगितलें : "या बॅक्सला

खुशाल ठोकून काढ. माझी तुला परवानगी आहे. " बॅकस म्हणाला : " अरे, मी तर देवता आहे. मला तुम्हीं मारहाण करतां कामा नये. " झांथियासनें त्याचा हा युक्तिवाद खोडून काढतांना सांगितलें : " बॅकस जर देवता असेल तर तो अमर असला पाहिजे. मग त्यानं आपल्याला मार बसला तर तो मनावर घेण्याची कांहींच जरुरी नाहीं. " शेवटीं आयाकसनें असें ठरविलें कीं या दोघांनाहि सपाटून ठोकून काढलें पाहिजे.

हो ना करतां करतां त्यांच्यापैकीं खरोखरी देवतास्वरूप कोण आहे याचा पत्ता लावण्यासाठीं त्या दोघांनाहि प्लूटो व प्रॉसरपाइन यांजकडे घेऊन जावें असें आयाकसनें ठरवून टाकलें. आयाकस म्हणाला : " निदान दिसायला तरी बॅकस सभ्य गृहस्थ दिसतोय. " झांथियासनें आपण या विधानाशीं अगदीं मनःपूर्वक सहमत असल्याचा निर्णय देतां देतां सांगितलें : " त्याचं असं आहे. दारू पिणं आणि चंगीभंगीपणा करणं या दोन गोष्टींखेरीज बॅकस कांहीं करीतच नाहीं. मग तो सभ्य गृहस्थ न दिसायला काय झालें ? "

शोधतां शोधतां प्लूटोच्या राज्यांत या दोघांना दोन मयत नाटककार सांपडले. त्यांतला एक होता एस्किलस आणि दुसरा होता युरिपिडीज. हे दोघेहि मयत नाटककार प्लूटोची मर्जी संपादन करण्यासाठीं आपसांत लढत होते. हेडीजमधला नियम असा होता कीं कोणत्याहि कलेंतल्या व कारागिरींतल्या सगळ्यांत जास्त प्रख्यात माणसाला प्लूटोच्या पंक्तीला जेवायला बसण्याचा मान हक्कानें मिळावा. त्याच्या क्षेत्रांतला त्याच्याहून प्रतिभासंपन्न माणूस मरून हेडीजमध्यें दाखल होईपर्यंत हा मान अबाधित राहत असे. आतांपर्यंत एस्किलस या मानाचा हक्कदार होता. आतां युरिपिडीज या मानाच्या पानावर हक्क सांगूं लागला.

आयाकस म्हणाला : " अहो, या नाटककारांनीं आपल्यापैकीं अधिक श्रेष्ठ कारागीर कोण आहे हें ठरविण्यासाठीं आपापल्या नाटकांतली ओळन् ओळ फूटपट्टीनं नि कंपासानं मापून घ्यायचा बेत केलेला आहे. " दोघेहि नाटककार खूप वादावादी करूं लागले. एकमेकांच्या चुकांचा एकमेकांवर आरोप करूं लागले. एस्किलस म्हणाला : " या वादांत माझी बाजू मुळांतच लंगडी पडते. कारण युरिपिडीजचीं नाटकं त्याच्याबरोबर मरून गेलीं आणि तीं इथं पाताळ लोकांत त्याच्या मदतीला हजर आहेत. याच्या उलट माझीं नाटकं अजून पृथ्वीतलावर जिवंत आहेत. तीं मेलीं नसल्यामुळें माझ्याबरोबर इथं आलेलीं नाहींत. "

या दोघां नाटककारांना योग्य न्याय देण्यासाठीं बॅकसनें न्यायाधीश होण्याची तयारी दर्शविली. मग त्याच्यासमोर एकेक नाटककार आपापली बाजू मांडूं लागला. त्यांचा असा हा भयंकर तंटा चालू असतांनाच पाताळ-लोकचा राजा प्लूटो तिथें हजर झाला. बॅकसनें दोघां नाटककारांना फर्मावलें : " तुम्ही दोघे आळीपाळीनं आपापल्या नाटककृतींतले कांहीं भाग मला तोंडपाठ म्हणून दाखवा." या स्पर्धेमध्यें युरिपिडीजचें तेज अजिबात पडेना असें दिसून आलें.

परंतु बॅकसनें मोठा शहाणपणा केला. त्यानें आपला निवाडा देण्याचें साफ नाकारलें. कारण दोघांपैकीं कोणत्याहि एका नाटककाराचा रोष आपल्यावर ओढवून घ्यायला तो तयार नव्हता.

शेवटीं या वादावादीला प्लूटो कंटाळला. त्यानें बॅकसला बजावलें : "तें कांहीं नाहीं. या दोघांपैकीं अधिक श्रेष्ठ नाटककार कोण आहे हें तूं ठरवलंच पाहिजेस आणि तुझ्या पसंतीला जो उतरेल त्या विजयी नाटककाराला घेऊन तूं परत पृथ्वीतलावर निघून जा. म्हणजे इथं हेडीजमध्यें ( पाताळ लोकांत ) चाललेली ही निरर्थक स्पर्धा एकदांची बंद पडेल."

शेवटीं बॅकसनें एकदांचा निर्णय दिला. त्यानें एस्किलसला अधिक श्रेष्ठ नाटककार ठरविलें. या निर्णयाविरुद्ध युरिपिडीजनें तक्रार केली. परंतु मग प्लूटोनें याची समजूत घातली. तो म्हणाला : " हें बघ, युरिपिडीज, तुला निदान पाताळ लोकांत चांगलं सुग्रास जेवण मिळायची तरी शाश्वती आहे. याच्या उलट एस्किलसची केवढी केविलवाणी अवस्था आहे पाहा बरं. त्याला बिचाऱ्याला पोटासाठीं वरच्या भूतलावरील मूर्खपणा व पापी प्रवृत्ति नष्ट करण्याचा मार्गानं मनुष्यजातीची सुधारणा करण्याचे प्रयत्न करीत राहावं लागेल. या कामगिरीचं ओझं बिचाऱ्याच्या डोक्यावर कायमचं बसेल."

## घोस्ट्स : भुतें

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* हेन्रिक इब्सेन ( १८२८-१९०६ ). *कथानकाचा प्रकार :* सामाजिक टीका. *काळ :* एकोणिसावें शतक. *स्थळ :* रोझेनवोल्ड, नॉर्वे. *पहिला प्रयोग :* १८८१.

*प्रमुख पात्रें :* **मिसेस हेलन आल्विंग**, एक विधवा. **ओस्वाल्ड आल्विंग**, तिचा पुत्र; हा चित्रकार असतो. **मॅन्डर्स**, गांवांतल्या चर्चचा प्रमुख पुरोहित.

जेकब एन्गस्ट्रान्ड, एक सुतार. रेजिना एन्गस्ट्रान्ड, त्याची कन्या; ही मिसेस आल्विंगकडे नोकरीला असते.

*समीक्षण :* ग्रीक तत्त्वज्ञानांतील दैववादाच्या विचाराऐवजीं आनुवंशिक संस्कारांची आधुनिक शास्त्रीय विचारसरणी प्रचारांत आणण्याचा इब्सेनचा प्रयत्न म्हणजे हें त्याचें 'घोस्ट्स' नाटक. परंतु आनुवंशिकतेमुळें माणूस कसा अधोगतीला लागतो या एकाच विषयाचा तेवढा अभ्यास या नाटकांत इब्सेननें सादर केला आहे असें नाहीं म्हणतां येत. त्यानें याहूनहि अधिक मोठा आशय या नाटकांत भरलेला आढळतो. समाजावर व समाजानें आपल्या जीवनासाठीं जे दंडक घालून घेतलेले आहेत त्यांच्यावर या नाटकांत इब्सेननें मर्मभेदक हल्ला चढविलेला आहे. या दंडकांपायींच मिसेस आल्विंगच्या जीवनाची शोकान्तिका झाली असें नाटककारानें स्पष्टपणें म्हटलेलें आहे. या स्पष्टोक्तीच्या रूपानें त्यानें आपल्या समकालीन रूढ विचारसरणीवर, किंबहुना उदारमतवादी विचारसरणीवर देखील एक बॉंबगोळाच फेंकला असें म्हणावें लागतें. अलीकडे 'सेमॅन्टिक्स' (शब्दार्थांचें शास्त्र) या नांवानें ओळखलें जाणारें जें शास्त्र प्रचारांत आलेलें आहे, त्याच्या अभ्यासाचा एक भाग म्हणून हें नाटक अजूनहि वाचनीय ठरतें. समाजामध्यें शब्द म्हणा किंवा मूळ कल्पना म्हणा, यांची जर त्यांच्या वास्तविक अभिप्रेत आशयापासून फारकत झाली, तर त्यांचा केवढा विघातक परिणाम होतो याची चर्चा या शास्त्रामध्यें केलेली असते. म्हणून त्या शास्त्राच्या दृष्टीनें हें नाटक अजूनहि अभ्यासण्याजोगें आहे.

*कथानक :* मिसेस आल्विंग यांच्या पतीचा दहावा श्राद्धदिन. त्यांचें स्मारक म्हणून एका अनाथालयाचें उद्घाटन करण्याचें ठरलें. त्या संबंधांतल्या कांहीं तपशिलांची चर्चा करण्यासाठीं मुख्य पुरोहित मॅंडर्स या उद्घाटन-समारंभाच्या आदल्या सायंकाळीं मिसेस आल्विंग यांना भेटायला आला. या वेळीं मिसेस आल्विंग अत्यंत खुषींत आहेत असें पुरोहिताला दिसून आलें. कारण त्यांचा चित्रकार पुत्र ओस्वाल्ड हा आपल्या वडिलांच्या स्मारकाच्या उद्घाटनसमारंभाला हजर राहण्यासाठीं मुद्दाम पॅरिसहून आला होता. त्याचें वय आतां सव्वीस वर्षांचें झालें तरी तो सात वर्षांचा असल्यापासूनच आईवडिलांपासून दूर राहिलेला होता. आणि आपला मुलगा आतां सारा हिंवाळाभर आपल्याच जवळ राहणार या विचारानें मिसेस आल्विंग यांना खूप आनंद झालेला होता.

ओस्वाल्ड आपल्या वडिलांना एक आदर्श गृहस्थ समजत होता. कारण आई त्याला जीं पत्रें लिहीत असे, त्यांमध्यें त्याचे वडील कॅप्टन आल्विंग यांचें वर्णन ती एखाद्या वीर पुरुषाला साजेसें करी. तिनें आपल्या पत्रांतून त्यांचें चित्र सतत अशाच प्रकारें रेखाटलेलें असे. त्याला स्वतःला वडिलांच्या ज्या आठवणी होत्या त्या त्याच्या लहानपणीं घडलेल्या केवळ एकाच प्रसंगाशीं निगडित झालेल्या होत्या. तो प्रसंग असा : त्याच्या वडिलांनीं त्याला आपल्या मांडीवर घेतलें आणि एक मोठी तंबाकूची चिलीम भरून त्याच्या हातीं दिली. ही चिलीम ओढायला त्यांनीं त्याला प्रवृत्त केलें. या जुन्या प्रसंगाची आठवण ओस्वाल्डच्या मनांत घर करून राहिली. म्हणून तो घरीं परत आल्यावर त्यानें आपल्या वडिलांची जुनी चिलीम शिलगावली आणि ती मोठ्या दिमाखानें तोंडांत धरून ती आपल्या आईसमोर व पुरोहित मँडर्स यांजसमोर मिरवूं लागला.

मँडर्सला धूम्रपान मुळींच आवडत नसे. खरें म्हटलें म्हणजे जी जी गोष्ट ‘पाप’ या सदराखालीं, अगदीं मोघमपणें का होईना, येऊं शकेल, अशी कोणतीच गोष्ट त्याला आवडत नसे. पॅरिस शहरीं ओस्वाल्ड जें ख्यालीखुशालीचें जीवन जगत होता तें मँडर्सला मुळींच पसंत नव्हतें. आणि मुलाच्या आचार-विचारांकडे आई असें दुर्लक्ष करते याबद्दल त्यानें मिसेस आल्विंगला दोष दिला. त्यानें तिला एका गोष्टीची आठवण करून दिली. तो म्हणाला : “तुम्हांला आठवतं ? तुमच्या लग्नाला त्या वेळीं एक वर्ष देखील झालेलं नव्हतं. तुम्ही माझ्याकडे आलांत आणि मला सांगितलंत कीं आपण आपल्या पतीबरोबर नांदायला तयार नाहीं, आपण काडीमोड घेणार. त्या वेळीं मी तुम्हांला या मार्गापासून परावृत्त केलं. तुमचं पत्नीचं कर्तव्य बजावण्यासाठीं तुम्हांला मींच परत तुमच्या पतीकडे धाडून दिलं. माझं हें कृत्य म्हणजे माझ्या आयुष्यांतला सगळ्यांत मोठा नैतिक विजय होता असं मला वाटतं.”

आपल्या दिवंगत पतीविषयींची सत्य परिस्थिति मँडर्सला सांगून टाकायला आतां हरकत नाहीं असें मिसेस आल्विंगच्या मनानें घेतलें. तसें म्हटलें तर कित्येक वर्षांपूर्वी ज्या वेळीं त्यानें तिला कॅप्टन आल्विंगकडे नांदायसाठीं परत धाडून दिलें त्या वेळीं देखील कॅप्टन हा बदफैली माणूस असल्याचें मँडर्सला ठाऊक होतेंच. परंतु ती त्याच्याकडे कर्तव्यबुद्धीनें परत नांदायला गेल्यानंतर देखील त्याचा बद-फैलीपणा तसाच चालू राहिला ही गोष्ट मात्र त्या बिचाऱ्याला कळलेली नव्हती.

आपल्या पतीशीं त्याच्या सबंध आयुष्यभर तिचें नातें कशा प्रकारचें होतें? पतिराज दारूबाजीच्या मैफलींतून बेहोष होऊन परत आले म्हणजे त्यांना अंथरुणांत झोंपी जायला मदत करायची हा तर तिचा जवळ जवळ नित्यक्रमच असायचा. पत्नी या नात्यानें तिच्याकडे अन्य कामगिरी बहुधा नसायचीच. एका प्रसंगीं तर पतिराजांची स्वारी घरांतल्या तिच्या मोलकरणीशीं चोरटा प्रेमसंबंध करीत असतांना तिनें त्यांना अचानक पकडलें.

परंतु हें कांहींच नव्हे. तिच्या सांसारिक परिस्थितींतील सगळ्यांत भयंकर शिसारी आणणारी गोष्ट जर कोणती असेल तर ती म्हणजे ही कीं लग्नानंतर लवकरच तिला आपले पतिराज गुप्त रोगानें पछाडलेले असल्याचा पत्ता लागला. आपल्या मुलाला आपल्या वडिलांच्या या पापकर्माचा शाप कायमचा शिरावर घेऊनच स्वतःचें आयुष्य जगावें लागणार या गोष्टीचें तिला भयंकर वैषम्य वाटत होतें.

आतां तर असें दिसूं लागले कीं वडिलांच्या आनुवंशिक संस्काराचे नैतिक परिणाम मुलाच्या आयुष्यावर आपला प्रभाव गाजवायला जणुं लागलेलेच होते. इकडे मिसेस आल्विंग व पुरोहित मँडर्स यांचें बोलणें चालू होतें आणि त्याच वेळीं शेजारच्या जेवायच्या दालनांत घरांतली तरुण मोलकरीण रेजिना हिच्याशीं ओस्वाल्ड प्रेमाचे चाळे करीत होता. वस्तुतः रेजिना ही ओस्वाल्डची सावत्र बहीण होती. या प्रकाराच्या रूपानें आपल्या सुखविहीन वैवाहिक जीवनाचें भूतच आपल्यासमोर वावरूं लागलें आहे असें मिसेस आल्विंगला वाटूं लागलें. कारण रेजिना ही केवळ बाह्यात्कारींच जेकब एन्गस्ट्रान्ड या दारुड्या सुताराची कन्या होती. खरें म्हटलें म्हणजे कॅप्टन आल्विंगनें आपल्या मोलकरणीशीं जो चोरटा प्रेमसंबंध केला त्याचेंच ही मुलगी हें फळ होतें. आणि हा प्रेमसंबंध उघडकीस आल्याबरोबरच मिसेस आल्विंगनें वैतागाच्या भरांत मँडर्सकडे धांव घेतलेली होती आणि त्याच्याकडून तरी कांहीं सांत्वना व मदत मिळते का बघावें हा तिचा त्या वेळचा विचार होता.

पुढें रेजिनाच्या शिक्षणाची व जेवणाखाण्याची नीट सोय व्हावी म्हणून एन्गस्ट्रान्डनें तिला स्वखुषीनें मिसेस आल्विंगच्या हवालीं केलें. परंतु आतां मात्र या मुलीच्या भवितव्याविषयीं त्याच्या मनांत निराळेच विचार घोळूं लागले. त्यानें एक नाविकांचें वसतिगृह चालू करायचा बेत केला होता आणि या

कामीं त्याला तिची मदत हवी होती. तथापि रेजिनानें स्वत:साठीं वेगळीच योजना आंखलेली होती. एका श्रीमंत कुळाचा वंशाचा दिवा स्वतःच्या पोटीं जन्माला घालण्याची संधि आलेली असतांना ती संधि सोडून कवडी किंमतीच्या बेजबाबदार नाविकांच्या प्रीत्यर्थ आपली कोमल काया व्यर्थ दवडण्याचें तिला कांहीं एक कारण नव्हतें.

खुद्द ओस्वाल्डला आपल्या प्रेयसीशीं आपलें रक्ताचें नातें आहे याचा कसलाच थांगपत्ता नव्हता आणि रेजिनाशीं सरळ लग्न करावें असाच विचार त्याच्या मनांत होता. मग त्यानें आईला स्वत:विषयींचें एक गुपित सांगून टाकलें. तो म्हणाला : "मी पॅरिसहून इकडे यायच्या अगोदर मला जरा कसंसंच वाटूं लागलं. माझी चित्रकलेंत प्रगति करायची महत्त्वाकांक्षाच विलयाला जाऊं लागली. म्हणून मी माझी प्रकृति पॅरिसच्या एका डॉक्टराला दाखवली. तेव्हां डॉक्टरानं मला चक्क सांगून टाकलं कीं 'वडिलांच्या बदफैलीपणाचा दुष्परिणाम म्हणून तुला या आनुवंशिक गुप्त रोगानं ग्रासलंय.' हें ऐकून मी डॉक्टरावर भयंकर संतापलों. कारण तुझ्या पत्रांतून बाबांच्या शुद्ध चारित्र्याची मला अगोदरच खातरजमा झालेली होती. हें दुखणं म्हणजे माझा मीच अध:पात घडवून आणला असला पाहिजे असं मी धरून चाललों. आतां माझं जें कांहीं उरलं सुरलं आयुष्य राहिलंय तें तरी सुखांत घालवावं म्हणून मला रेजिनाशीं लग्न करायचंय."

हें ऐकल्यावर मात्र मिसेस आल्विंगचा निरुपायच झाला. ओस्वाल्ड व रेजिना या दोघांना खरा प्रकार एकदांचा सांगून मोकळें व्हावें असें तिनें ठरविलें. परंतु हा खुलासा करायची तिला संधि मिळायच्या अगोदरच एक भयंकर बातमी येऊन थडकली. कॅप्टन आल्विंगचें स्मारक म्हणून ज्या जागेंत अनाथालय सुरू होणार होतें त्या इमारतीलाच एकाएकीं आग लागली.

ही आग लागली त्या वेळीं शेजारच्या सुतारकामाच्या कारखान्यांत मॅंडर्स व एन्गस्ट्रान्ड हे दोघे जातीनें हजर होते. आगींत सगळी इमारत भस्मसात झाल्यावर एन्गस्ट्रान्डनें पुरोहित मॅंडर्सवर असा चक्क आरोप केला कीं "गुरुजी, तुमच्या मेणबत्तीची एक जळत असलेली वात लांकडाच्या भुशांत पडली आणि तिच्यामुळेंच ही आग लागली." वस्तुतः यांत मॅंडर्सचा गुन्हा असा कसलाच नव्हता. परंतु समाजांतील आपल्या इभ्रतीला या आरोपानें

धक्का पोंचेल अशी त्याला धास्ती वाटायला लागली. म्हणून एन्गास्ट्रान्डनें त्याच्या या नाजुक परिस्थितीचा फायदा घेऊन त्याच्याकडून पैसा उकळण्याचें ठरविलें. तो म्हणाला : "गुरुजी, कांहीं हरकत नाहीं. मी या आगीचा सगळा दोष माझ्या शिरावर घेतों. परंतु तुम्ही याच्या मोबदल्यांत एक गोष्ट कबूल केली पाहिजे. कॅप्टन आल्विंगची जी उरली सुरली इस्टेट आहे तिच्यांतून तुम्हीं माझं नाविकांचं वसतिगृह बांधायला पुरेसे पैसे मिळवून दिले पाहिजेत." बिचाऱ्या मँडर्सचें मन त्याचें त्यालाच खात होतें. त्यानें या व्यवहारांत एन्गास्ट्रान्डला मदत करण्याचें अभिवचन मुकाट्यानें देऊन टाकलें.

मग मिसेस आल्विंगनें आपला मुलगा ओस्वाल्ड व त्याची सावत्र बहीण रेजिना या उभयतांना त्यांच्या दिवंगत वडिलांची खरीखुरी हकीकत सांगून टाकली. कॅप्टन आल्विंगचा सर्वनाश सुरवातीपासूनच कसा अटळ होता हें समजावून सांगण्याचा तिनें प्रयत्न केला. आपण खरोखरी कॅप्टन आल्विंगची कन्या आहोंत हें रहस्य जेव्हां रेजिनाला कळलें तेव्हां ती खूपच चिडली. आपल्याला मोलकरीण म्हणून वाढविलें, आपलें शिक्षणहि मोलकरीण म्हणून झालें. वस्तुतः आपल्याला मोठ्या घरची मुलगी म्हणून लहानपणापासून शिक्षण मिळायला पाहिजे होतें, तशाच धर्तीवर आपलें लालनपालन व्हायला पाहिजे होतें, असें तिच्या मनानें घेतलें. म्हणून तिनें रागारागानें या कुटुंबाचा आश्रय सोडून द्यायचें ठरविलें आणि ती एन्गास्ट्रान्डच्या घरीं निघून गेली.

ओस्वाल्ड एकटाच आपल्या आईजवळ राहिला. त्यानें आपल्या प्रकृतीची भयानक अवस्था तिला उघड करून सांगितली. आनुवंशिक गुप्त रोगानें त्याच्या मेंदूवर अगोदरच हल्ला चढविलेला होता. त्यापायीं त्याच्या तारुण्याचा नाश होऊन त्याची मनोवृत्ति एखाद्या लहान मुलासारखी होऊं लागलेली होती. तशाहि परिस्थितींत मिसेस आल्विंगनें त्याला धीर दिला. ती म्हणाली : "बाळ, तूं कांहीं काळजी करूं नकोस. तूं असशील तसा मी तुझा कायमचा सांभाळ करीन." यावर ओस्वाल्ड म्हणाला : "आई, तशीच जरूर पडली, तर तूं मला मारून टाक." आणि त्यानें आपल्याबरोबर आणलेल्या अफूच्या गोळ्या तिला दाखविल्या. त्या बघून तिला धक्काच बसला. तिनें त्याला मारून टाकण्यास साफ नकार दिला. तांबडें फुटेपर्यंत मायलेंकरें तशींच बोलत बसलीं होतीं. मिसेस आल्विंगनें फुंकर घालून दिवा मालवून टाकला. तेवढ्यांत ओस्वाल्ड "मला

दिवसाचा उजेड पाहिजे" म्हणून भोकाड पसरून लहान मुलासारखा रडत बसला. तें दृश्य पाहून मिसेस आल्विंगच्या अंगावर शहारे आले. ती दिङ्मूढ होऊन तशीच बघत उभी राहिली.

## हॅम्लेट

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* विल्यम शेक्स्पियर (१५६४-१६१६). *कथानकाचा प्रकार :* अद्भुतरम्य शोकान्तिका. *काळ :* इ. स. १२००. *स्थळ :* डेन्मार्क. *पहिला प्रयोग :* इ. स. १६०२.

*प्रमुख पात्रें :* **हॅम्लेट,** डेन्मार्कचा राजपुत्र. **भूत,** हॅम्लेटचे वडील म्हणजे डेन्मार्कचा माजी राजा. **क्लॉडियस,** डेन्मार्कचा विद्यमान राजा. **गर्टूड,** हॅम्लेटची आई. **पोलोनियस,** डेन्मार्कचा प्रधान. **ऑफेलिया,** त्याची कन्या. **लार्टस,** त्याचा पुत्र.

*समीक्षण :* 'हॅम्लेट' ही ललितकृति समजा, तत्त्वचिंतनपर साहित्य समजा किंवा साधी नाट्यकृति समजा,— या नाटकाची महान् गुणवत्ता सर्वसाधारणपणें सर्वमान्य झालेली आहे. परंतु या नाटकाच्या उत्कृष्टपणाचा खुलासा थोडक्या शब्दांत कारणांसह करायचा म्हटला तर ती अशक्य कोटींतली कामगिरी ठरेल. या नाटकाची काव्यात्मता अत्यंत हृद्य आहे. यांतलें तत्वचिंतन हें मुळांत सर्वस्वीं शेक्स्पियरचें नसलें तरी त्याच्या मांडणीची कलापूर्णता अनन्यसाधारण आहे. त्याचें सर्वव्यापी आकर्षण हें बहुतांशीं खुद्द हॅम्लेट या पात्राच्या स्वभावदर्शनावर आधारलेलें आहे. आपल्या वडिलांच्या खुनाचा सूड घेण्याची कामगिरी पार पाडण्यासाठीं पुढें सरसावलेल्या या नायकाला कर्तव्य, न्याय्यता आणि नीतिशास्त्र यांच्या संबंधांतील अशा प्रश्नांना तोंड द्यावें लागलें, कीं जे प्रश्न युगानुयुगें मानवाला सतत भंडावत राहिले आहेत. साऱ्या मानवजातीच्या आशाआकांक्षा व धास्त्या, भ्रमनिरासाच्या व नैराश्याच्या भावना ह्या खुद्द हॅम्लेटच्या स्वभावचित्रामध्यें प्रतिबिंबित झालेल्या आढळतात.

*कथानक :* एल्सिनोर किल्ल्याच्या तटावरून डेन्मार्कच्या मृत राजाच्या भुतानें तीनदां फेरफटका केला. चौथ्या रात्रीं हें भूत असेंच फेरफटका करायला निघालें असतांना दोन महिन्यांपूर्वी निधन पावलेल्या आपल्या वडिलांचें हें भूत बघायला तरुण राजपुत्र हॅम्लेट याला त्याचा मित्र होरेशियो आपल्याबरोबर

घेऊन आला. वडिलांच्या अकालीं निधनामुळें हॅम्लेटवर दुःखाचा डोंगर कोसळलेला होता आणि त्याची मनःस्थिति अत्यंत उद्विग्न झालेली होती. ज्या रहस्यमय परिस्थितींत आपल्या वडिलांना मृत्यु आला, तिच्यामुळें तो बुचकळ्यांत पडला होता. त्यांत पुन्हा भरीला भर म्हणजे त्याच्या आईनें आपला दीर म्हणजे मृत राजाचा भाऊ क्लॉडियस याच्याशीं भलत्याच घिसाडघाईनें लग्न केलें होतें. ही गोष्ट हॅम्लेटच्या औचित्यविषयक भावनेला मुळींच मानवण्याजोगी नव्हती.

त्या रात्रीं हॅम्लेट आपल्या वडिलांच्या भुताला भेटला आणि त्या भुताचें जें काय सांगणें होतें तें ऐकून घेतल्यावर तर त्याच्या अंगावर शहारेच आले. त्याला असें कळलें कीं लोक समजतात त्याप्रमाणें आपल्या वडिलांना सर्पदंशानें मृत्यु आलेला नाहीं; खरी गोष्ट ही आहे कीं सध्यांचा राजा क्लॉडियस यानें म्हणजे साक्षात त्यांच्याच भावानें त्यांचा खून केला. मग भूत त्याला म्हणालें: " क्लॉडियसनं नुसता खुनाचा गुन्हा केलेला आहे असं नव्हे. त्यानं गोत्रगमन व परस्त्रीसंग हेहि गुन्हे केलेले आहेत. " परंतु त्याचबरोबर त्या भुतानें हॅम्लेटला असा इशाराहि देऊन ठेवला : " तूं तुझी आई गर्ट्रूड हिच्या वाटेला जाऊं नकोस. परमेश्वर तिला जी शिक्षा करील तेवढी तिला पुरे आहे. "

भुतानें येवढा सगळा गौप्यस्फोट केल्यानंतर क्लॉडियसचा खून केला पाहिजे याबद्दल हॅम्लेटच्या मनांत संशयाला कसलीहि जागा राहण्याचें कांहीं एक कारण नव्हतें. परंतु हा राजपुत्र अंतर्मुख वृत्तीचा होता. हें भूत आपल्या वडिलांचेंच आहे का नाहीं याबद्दल त्याला पक्की खात्री वाटेना. नाहीं तर असें व्हायचें कीं आपला छळवाद मांडण्यासाठीं आपल्याकडे रवाना झालेला सैतानच जर या भुताचें रूप घेऊन आलेला असेल तर सगळाच घोटाळा व्हायचा. भुताचा आदेश अंमलांत आणावा का नाहीं या प्रश्नावर स्वतःच्या मनाशीं भवति न भवति करतां करतांच हॅम्लेटनें होरॅशियोसकट आपल्या सगळ्या मित्रांकडून शपथ घेवविली कीं आपल्याला हें भूत दिसल्याचें आपण कोणालाहि सांगणार नाहीं, आणि त्यानें बजावलें : " गड्यांनो, या क्षणापासून मी जर विक्षिप्तपणा करायला लागलों तर मला वेडा नका हं समजूं. मी आतां मुद्दाम तऱ्हेवाईकपणानं वागायचं ठरवलंय. "

इकडे राजा क्लॉडियसला अनेक चिंता लागून राहिलेल्या होत्या. नॉर्वेशीं

युद्ध होण्याचा संभव होता आणि त्या युद्धाला तोंड देण्याची तयारी कशी करावी हा त्याच्यापुढें प्रश्न होता. याच्याहूनहि भयंकर चिंता म्हणजे त्याची सदसद्विवेकबुद्धि त्याला एकसारखी आंतून टोंचत होती. आपण गर्ट्रूडशीं घाई-घाईनें लग्न केल्यापासून आपल्याला ही टोंचणी फारच त्रासदायक झालेली आहे हें त्याला जाणवत होतें. याच्या जोडीला राजपुत्र हॅम्लेट याची उद्विग्न मनःस्थिति. आपण घाईघाईनें लग्न केल्याबद्दल राजपुत्राला आपला भयंकर राग आलेला आहे हें क्लॉडियस जाणून होता. परंतु तेवढ्यासाठीं राजपुत्रानें एकसारखें उदास-वाणें राहावें हें त्याला मुळींच आवडत नव्हतें. हॅम्लेट आपली राजगादी तर आपल्याकडून हिसकून घेणार नाहीं ना, अशीहि भीति अधून मधून त्याच्या मनांत डोकावत होती. राजपुत्राचें विलक्षण वागणें पाहून व बेफाट बोलणें ऐकून राजाला वाटूं लागलें : "याला वेडबीड तर नाहीं ना लागलं ?" परंतु याबद्दल त्याला पक्की खात्री वाटत नव्हती.

हॅम्लेटच्या या एकंदर वागण्याचें मूळ कारण काय आहे, तो वेडा आहे का महत्त्वाकांक्षेनें भारावलेला आहे, याचा छडा लावण्यासाठीं हॅम्लेटचे दोघे मित्र रॉझेन्क्रॅन्ट्स आणि गिल्डेन्स्टर्न यांना त्याच्यावर हेरगिरी करण्याच्या कामगिरीवर क्लॉडियसनें नेमलें. परंतु हे दोघे हेर अगदींच बावळट होते आणि त्यांचा कावा हॅम्लेटनें चटकन ओळखला. त्यांच्या प्रश्नांना वेडींवांकडीं उत्तरें देऊन त्यानें त्यांच्या मनांत आणखीच गोंधळ उडवून दिला.

राजाचा वृद्ध व बडबड्या खासगी कारभारी पोलोनियस याची एक निराळीच धारणा होती. आपली कन्या ऑफेलिया हिच्याविषयींच्या प्रेमापायींच हॅम्लेट असा विचित्र वागत असावा अशी त्याची पक्की समजूत झाली. इकडे हॅम्लेटचा खिन्नपणा आणखीच वाढूं लागला. रॉझेन्क्रॅन्ट्स, गिल्डेन्स्टर्न आणि खुद्द पोलोनियस असे तिघे त्याच्यावर सतत पाळत ठेवूं लागले. त्यांत पुन्हां हॅम्लेटला असें वाटूं लागलें कीं ऑफेलिया देखील आपल्या विरुद्ध उलटली असावी. चुलत्याचा धडधडीत खून करण्याची कल्पना त्याला कशीशीच वाटत होती. त्यांत पुन्हा आपल्याला भेटलेलें भूत चांगलें असेल का वाईट असेल याविषयींच्या अनिश्चिततेमुळें त्याच्या मनाला सतत त्रास होत होता. तेवढ्यांत एक नाटक कंपनी एल्सिनोर येथें आली. क्लॉडियस खरोखरी गुन्हेगार आहे का नाहीं याचा छडा लावण्याची संधि या नाटक मंडळीमुळें आपल्याला मिळेल असें

हॅम्लेटच्या मनानें घेतलें. भुताच्या सांगण्याप्रमाणें आपल्या वडिलांचा खून झालेल्या दिवशीं जो प्रकार घडला, तशाच प्रकारचा एक नाट्यप्रवेश या नाटक-कंपनीनें राजासमोर भरदरबारांत करून दाखवावा असा डाव हॅम्लेटनें रचला. हा नाट्यप्रवेश चालू असतांना क्लॉडियसच्या मनावर त्याचा काय परिणाम होतो याचें आपण बारकाईनें निरीक्षण करूं आणि त्यावरून तो गुन्हेगार आहे का नाहीं याविषयीं नक्की निष्कर्ष काढूं असें त्यानें ठरविलें.

आणि त्याची ही मात्रा बरोबर लागू पडली. नाट्यप्रवेश चालू असतांना क्लॉडियस इतका भयंकर बैचेन झाला कीं प्रवेश पुरा व्हायच्या अगोदरच तो दरबारांतून निघून गेला. राजाच्या या वागण्यावरून हॅम्लेटची अशी बालंबाल खात्री पटली कीं भुताचें म्हणणें शंभर टक्के खरें आहे. यानंतर आपल्या दिवंगत वडिलांची इच्छा पूर्ण करायला दिरंगाई लावण्याचें हॅम्लेटला वस्तुतः कांहींच कारण नव्हतें. असें असूनहि नाट्यप्रवेश उरकल्याबरोबर क्लॉडियसला ठार करण्याची पहिली नामी संधि साधायच्या बाबतींत हॅम्लेटच्या हातून कुचराई झाली. राजा प्रार्थना करण्यासाठीं गुडघे टेंकून उभा होता. अशा वेळीं त्याच्या पाठींत खंजीर भोंसकून त्याला ठार करणें सहज शक्य होतें. परंतु त्या वेळीं हॅम्लेटनें त्याच्यावर वार केला नाहीं. कारण देवाचें नांव घेत असतांना राजाला जर मरण आलें तर त्याला सद्गति मिळेल अशी शक्यता होती आणि हेंच हॅम्लेटला नको होतें.

राणीनें हॅम्लेटला आपल्या महालांत बोलावलें. क्लॉडियसशीं उद्धटपणाचें वर्तन केल्याबद्दल ती हॅम्लेटची कानउघाडणी करूं लागली. परंतु भुतानें आपल्याला काय सांगितलें याची हॅम्लेटला आठवण होती. त्याला अनुसरून हॅम्लेटनें आपल्या आईवर टीकेचा येवढा भयंकर हल्ला चढविला कीं "धांवा! धांवा!!" म्हणून ती किंचाळूं लागली. तिच्या किंकाळ्यांपाठोपाठ पडद्याआड कसला तरी आवाज झाला. यावरून हॅम्लेटला असा संशय आला कीं क्लॉडियस पडद्यामागें उभा असून आपलें बोलणें चोरून ऐकत आहे. म्हणून त्यानें आपली तरवार पडद्यांतून आरपार खुपसली. परंतु या वारानें पडद्याआड उभा असलेला म्हातारा पोलोनियस हकनाक ठार झाला.

राजा क्लॉडियस याला आतां खुद्द आपल्या स्वतःच्याच जिवावर बेतणार अशी भीति वाटूं लागली. ती निवारण्यासाठीं त्यानें घाईघाईनें हॅम्लेटची

इंग्लंडला रवानगी केली. त्याच्याबरोबर त्यानें रॉझेन्क्रॅन्ट्झ व गिल्डेन्स्टर्न या दोघांना सोबतीला म्हणून दिलें. परंतु वस्तुतः हॅम्लेटला तिकडच्या तिकडे ठार मारण्याचा गुप्त हुकूम या दोघांजवळ राजानें देऊन ठेवलेला होता. तथापि राजपुत्र हॅम्लेटनें या हुकुमाचा पत्ता लावून तो हस्तगत केला आणि त्यांत असा बदल केला कीं हा हुकूम आणणाऱ्या त्या दोघांनाच इंग्लंडमध्यें दाखल होतांक्षणीं ठार करण्यांत यावें. मग हॅम्लेट इंग्लंडहून डेन्मार्कला परत आला.

दरम्यान त्याच्या गैरहजेरींत त्या दुर्दैवी देशामध्यें बऱ्याच घडामोडी झालेल्या होत्या. बिचाऱ्या ऑफेलियाला तिचा पूर्वीचा प्रियकर हॅम्लेट यानें झिडकारलें होतें, म्हणून ती प्रेमभंगानें वेडीपिशी झाली आणि मागाहून ती बुडून मेली. दिवंगत पोलोनियसचा तापट मुलगा लायर्टस फ्रान्सहून परत आला आणि त्यानें आपल्या वडिलांच्या खुनाचा बदला घेण्यासाठीं कांहीं असंतुष्ट लोकांची एक टोळी जमा केली. त्याची अशी समजूत होती कीं क्लॉडियसनेंच आपल्या वडिलांचा खून केला. परंतु राजा क्लॉडियसनें त्याला सांगून टाकलें कीं हॅम्लेटनेंच हा खून केला. इतकेंच नव्हे तर राजपुत्र हॅम्लेट याचा खून करण्याच्या कटांत भाग घेण्यासाठीं त्यानें लायर्टसचें मन वळविलें.

मग क्लॉडियसनें असा डाव रचला कीं हॅम्लेट व लायर्टस या दोघांचें द्वंद्व युद्ध व्हावें. आपल्या दुष्ट हेतूचा कुणाला संशय येऊं नये म्हणून राजानें हॅम्लेटच्या बाजूनें पैज मारली. तसा हॅम्लेट उत्कृष्ट तरवारबहाद्दर होताच. तेव्हां लोकांना साहजिकच असें वाटलें कीं चुलत्याला पुतण्याचें कौतुक आहे म्हणूनच त्यानें त्याच्या बाजूनें पैज मारली असावी. त्याचबरोबर त्यानें आणखी एक बदमाषगिरी करून ठेविली. लायर्टसच्या तरवारीच्या टोंकाला त्यानें चोरून विषारी पाणी पाजवून घेतलें आणि द्वंद्व युद्ध चालू असतांना जर यदाकदाचित् हॅम्लेटला तहान लागली तर त्याच्या हाताशीं राहील अशा बेतानें त्यानें विषयुक्त पाण्याचा पेला तयार करवून ठेवविला.

पण दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, क्लॉडियसच्या कारस्थानाचा गर्ट्रूडला कांहींच थांगपत्ता नव्हता, आणि तिनेंच चुकून हा विषाचा पेला पिऊन टाकला आणि ती मरून गेली. इकडे द्वंद्व युद्ध सुरू झालेंच होतें. हाणाहाणींत तरवारीच्या विषारी टोंकानें हॅम्लेटला जखम झाली आणि त्याचें मरण अटळ झालें. परंतु उभय योध्यांच्या झटापटींत एकमेकांच्या तरवारींची अदलाबदल

होऊन खुद्द लायर्टसला देखील प्राणघातक जखम झाली. मरतां मरतां लायर्टसला कृतकर्माचा पश्चात्ताप वाटूं लागला आणि त्यानें हॅम्लेटला खरा प्रकार सांगून टाकला. तरवारीच्या टोंकाला विषारी पाणी पाजविण्याचें नीच कृत्य क्लॉडियसचेंच आहे हें त्याच्याकडून हॅम्लेटला कळलें. मग मात्र हॅम्लेटनें आढेवेढे बिलकुल न घेतां सूड घेण्याची संधि साधली आणि ताबडतोब राजाच्या छातींत खंजीर भोंसकून त्याला ठार केलें. नंतर स्वतः हॅम्लेटला मरण आलें. परंतु तत्पूर्वी भुताच्या सांगण्याप्रमाणें त्याच्या वडिलांच्या खुनाचा बदला घेण्याची कामगिरी त्याच्या हातून एकदांची यशस्वी रीतीनें पार पडली.

## हेड्डा गॅब्लर

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* हेन्रिक इब्सेन ( १८२८-१९०६ ). *कथानकाचा प्रकार :* सामाजिक टीका. *काळ :* एकोणिसाव्या शतकाचा उत्तरार्ध. *स्थळ :* नॉर्वे. *पहिला प्रयोग :* १८००.

*प्रमुख पात्रें :* **जॉर्ज टेस्मन**, एक विद्वान् पंडित. **हेड्डा टेस्मन**, त्याची पत्नी. **मिस ज्युलिआना टेस्मन**, त्याची आत्या. **मिसेस एल्व्हस्टेड**, हेड्डाची लहानपणापासूनची शाळकरी मैत्रीण. **जज्ज ( न्यायमूर्ति ) ब्रॅक**, टेस्मन कुटुंबाचा एक ऋणानुबंधी स्नेही. **आयलर्ट लव्हबर्ग**, हेड्डाला लग्नापूर्वी मागणी घालणारा एक गृहस्थ.

*समीक्षण :* एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धामध्यें जे लोकप्रिय फ्रेंच नाटककार झाले, त्यांच्याजवळून इब्सेननें चांगल्या नाट्याचीं मूलतत्त्वें मोठ्या परिश्रमानें शिकून घेतलीं. या मूलतत्त्वांचा बहुतांश भाग ‘ हेड्डा गॅब्लर ’ या नाटकामध्यें समाविष्ट असलेला आढळतो. हेड्डाच्या रूपानें त्यानें अशा एका स्त्रीचें चित्र निर्माण केलेलें आहे, कीं जिच्या अंगीं नांव घेण्याजोगा व तिच्या जमेच्या बाजूला मांडण्याजोगा एकहि सद्गुण नाहीं. आपल्या भोंवतालची परिस्थिति तिला जितकी भकास वाटते तितकीच ती स्वतः आत्मिक दृष्ट्या भकास आहे. गेल्या अर्धशतकांतील जवळ जवळ प्रत्येक नामवंत नटीनें हेड्डाची भूमिका वठविलेली आहे आणि तिच्या सामर्थ्यशाली परंतु निर्घृण व्यक्तित्त्वानें प्रेक्षकांना सतत आकर्षित करून घेतलेलें आहे.

*कथानक :* परलोकवासी जनरल गॅब्लर यांची कन्या राजविलासी

हेड्डा गॅब्लर हिनें डॉक्टर जॉर्ज टेस्मन यांच्याशीं लग्न करण्यास संमति दिली. हेड्डाच्या या कृतीमुळें तिच्या वर्तुळांतील प्रत्येक व्यक्ति आश्चर्यचकित झाली आणि सगळ्यांनाच यामुळें जरासा धक्काहि बसला. तसें पाहिलें तर जॉर्ज हा उदयोन्मुख तरुण विद्वान पंडित होता, आणि लवकरच विद्यापीठामध्यें त्याची नेमणूक प्राध्यापक म्हणून होणार होती. परंतु हेड्डा ज्याच्याशीं लग्न करायला तयार होईल, तशा प्रकारचा माणूस तो मुळींच नाहीं असेंच सगळ्यांना वाटत होतें. तो अगदींच सुस्त व शुष्क माणूस. मळकट जाडजूड ग्रंथ व हस्तलिखितें यांच्यामध्यें स्वारी बहुतेक सगळा वेळ गढून गेलेली असायची.

याच्या उलट हेड्डा ही आपल्या वडिलांची स्वरूपसुंदर व लाडावल्यामुळें शेफारलेली लाडकी लेक. तिच्या भोंवतालीं जमा झालेल्या सगळ्या पुरुषांची वृत्ति देखील अशीच. परंतु हेड्डा आतां एकोणतीस वर्षांची झालेली होती. तसे तिचें कौतुक करणारे व तिच्याशीं लग्न करायला तयार झालेले अनेक पुरुष होते. परंतु लग्नाबरोबर एका दिवंगत मंत्र्याच्या विधवा पत्नीचा बंगला तिला राहायला मिळवून देणारा जॉर्जखेरीज दुसरा कुणीच नव्हता. म्हणूनच तिनें त्याच्याशीं लग्न केलें.

वास्तविक हा बंगला घेणें कांहीं अंशीं जॉर्जच्या आवांक्याबाहेरचेंच काम होतें. परंतु त्याला लवकरच प्राध्यापकाची जागा मिळण्याचा संभव होता ही एक गोष्ट; आणि त्याची आत्या ज्युलिआना हिनें दिलेली मदत ही दुसरी गोष्ट. अशा प्रकारें हा बंगला त्यानें कसाबसा खरेदी करून टाकला. कारण ? कारण हेड्डाला तर तो पाहिजेच होता. मग त्यानें विवाहानंतर मधुचंद्राप्रीत्यर्थ जवळ जवळ सहा महिन्यांचा लांबलचक दौरा आंखला. हें देखील त्यानें हेड्डाच्या हौसेखातरच केलें. या मधुचंद्राच्या मुदतीमध्यें जॉर्जनें आपला बहुतेक वेळ ग्रंथालयें धुंडाळण्यांतच घालविला. मानवी संस्कृतीचा इतिहास हा त्याचा खास विषय. या विषयावरील साहित्य जमा करण्याचा त्याचा सपाटा चाललेला होता. ऐन मधुचंद्राच्या काळांतील त्याच्या या छांदिष्टपणामुळें हेड्डाला त्याचा अगदीं कंटाळा आला. तिला जॉर्जविषयीं भयंकर चीड वाटूं लागली. अशा मनःस्थितींतच ती आपल्या बंगल्यावर परत आली.

मग एकंदर लक्षणें अशीं दिसूं लागलीं कीं जॉर्जला प्राध्यापकाची जागा मिळणारहि नाहीं. तसें झालें तर आपला मोतद्दार, रपेट करण्यासाठीं आपण

ठेवलेला घोडा, आणि आपण ज्यांच्यासाठीं जीव टाकतों आहोंत अशा या व इतरहि कांहीं चैनीच्या गोष्टींवर पाणी सोडावें लागणार, असें भावी काळाचें चित्र हेड्डासमोर उभें राहिलें. प्राध्यापकाच्या या जागेसाठीं जॉर्जचा प्रतिस्पर्धी म्हणजे आयलर्ट लव्हबर्ग ही व्यक्ति होती. हा अत्यंत बुद्धिमान परंतु तऱ्हेवाईक असा प्रतिभाशाली माणूस होता. त्यानें खुद्द जॉर्जच्या खास अभ्यासक्षेत्रांतील विषयावरच एक ग्रंथ लिहिलेला होता. आणि या विषयावरचा एक अत्युत्कृष्ट ग्रंथ म्हणून त्याची सर्वत्र प्रशंसा चाललेली होती. हेड्डाला आलेला कंटाळा आणि एकंदर परिस्थितीचा तिला आलेला वीट, यांची आतां अगदीं हद्द झाली. मनाला उत्तेजना देणारें एकच साधन आतां तिच्याजवळ शिल्लक राहिलें. तें म्हणजे जनरल गॅब्लर यांची पिस्तुलांची जोडी. वडिलांनीं आपल्यामागें तिच्यासाठीं येवढीच वारसाहक्काची दौलत शिल्लक ठेवलेली होती. या पिस्तुलांनीं नेमबाजी करणें, येवढीच काय ती तिची करमणूक.

आयलर्टनें आणखीहि एक ग्रंथ लिहिलेला आहे आणि तो आधींच्या ग्रंथापेक्षांहि अधिक प्रतिभाशाली व महत्त्वाचा आहे याचा जॉर्जला पत्ता लागला. आयलर्टनें हा ग्रंथ मिसेस एल्व्हस्टेड हिच्या मदतीनें व तिच्यापासूनच स्फूर्ति घेऊन लिहिलेला होता. त्या विक्षिप्त प्रतिभावंताविषयीं तिनें जी निष्ठा प्रदर्शित केली तिच्यामुळेंच तो सुधारला. या ग्रंथाचें हस्तलिखित घेऊन लव्हबर्गची स्वारी एके दिवशीं सायंकाळीं टेस्मन मंडळींच्या बंगल्यावर आली. तेव्हां या परिस्थितीचा जास्तींत जास्त फायदा घेण्याचें हेड्डानें ठरविलें.

पहिली गोष्ट म्हणजे थिया एल्व्हस्टेड ही हेड्डाची लहानपणींची शाळकरी मैत्रीण असली तरी त्या वेळेपासूनच तिला थियाविषयीं तिरस्कार वाटत असे. त्यांत पुन्हां लग्नापूर्वी तिच्या यजमानांची थिया ही प्रियतमा होती. असली ही उंदीर-तोंडी बया आयलर्ट लव्हबर्गची स्फूर्तिदायिनी व त्याला यश मिळवून देणारी नि सरळ मार्गावर आणणारी देवता ठरावी, हें एकंदर प्रकरणच हेड्डाला अगदीं असह्य झालें. कारण आयलर्ट लव्हबर्गचा जीव तर हेड्डाच्या भोंवतालीं सतत घोंटाळत होता आणि ही गोष्ट हेड्डाला ठाऊक होती. फार फार पूर्वी त्यानें आपल्या जीवितनौकेंतील सहचरी होण्याची तिला खूप गळ घातलेली होती. आणि तिला त्याच्या या मागणीला होकार देण्याचा मोह देखील झालेला होता. परंतु त्या वेळीं त्याचें भवितव्य अनिश्चित होतें, म्हणून तिनें त्याची मागणी

नाकारलेली होती.

परंतु आतां ? ज्याला आपल्या मुठींत धरून ठेवण्याचें धैर्य आपल्याला झालें नाहीं त्यालाच दुसऱ्या स्त्रीनें स्वतःच्या कह्यांत घेतलें. या गोष्टीमुळें हेड्डाच्या मनाला उद्वेग खुपूं लागला. त्यांतच त्या दुसऱ्या स्त्रीविषयींच्या संतापाचें मिश्रण झालें. तिच्या मनाची काहिली झाली.

या सगळ्या प्रकारांतून तिला एकच प्रेरणा मिळाली. ती म्हणजे विध्वंस करण्याची. आणि परिस्थिती देखील जणुं काय तिच्या हातांतल्या खेळण्यासारखी तिच्या या उद्देशाला अनुकूल झाली. टेस्मन मंडळींच्या बंगल्यावर लव्हबर्ग जेव्हां आपलें हस्तलिखित घेऊन हजर झाला, त्याच वेळीं जॉर्ज आपला मित्र जज्ज ब्रॅक याच्यासमवेत पुरुषमंडळींच्या एका खास मैफलींत भाग घेण्यासाठीं घरांतून निघायच्या अगदीं बेतांत होता. या दोघांनीं लव्हबर्गला आपल्याबरोबर येण्याचें निमंत्रण दिलें. परंतु लव्हबर्गनें त्यांना नकार दिला. मिसेस एल्व्हस्टेड व हेड्डा यांच्या संगतींत बंगल्यावरच थांबणें त्यानें अधिक पसंत केलें. परंतु हेड्डानें तर आपल्या प्रतिस्पर्धी स्त्रीच्या कर्तबगारीचा विध्वंस करण्याचा विडा उचललेला होता. म्हणून तिनें जाणूनबुजून लव्हबर्गला आग्रहपूर्वक त्या मैफलींत सामील व्हायला धाडून दिलें.

हे तिघेजण ती मैफल आटपून केव्हां परत येतात याची वाट बघत हेड्डा व मिसेस एल्व्हस्टेड या दोघींनीं ती सारी रात्र जागून काढली. शेवटीं सगळ्यांच्या अगोदर जॉर्ज परत आला. आदल्या रात्रीं तिथें काय काय घडलें याची सगळी हकीकत त्यानें या दोघींना निवेदन केली.

मैफल भयंकरच रंगली. शेवटीं सगळे पुरुष दारू पिऊन पिऊन बेहोष झाले. कोणाचा पायपोस कोणच्या पायांत राहिला नाहीं. या गोंधळांतच ते तिघे घरीं परत यायला निघाले. वाटेंत लव्हबर्गचें हस्तलिखित त्याच्या हातून गहाळ झालें. जॉर्जनें तें शोधून काढून जेमतेम आपल्याबरोबर घरीं आणलें. आपलें हस्तलिखित हरवलें या समजुतीनें लव्हबर्ग हताश झाला. त्या निराशेच्या भरांत त्यानें उरलेली रात्र मादेमोसील डायना या बाईच्या बिऱ्हाडींच मुक्काम ठोकला. शेवटीं तो दुसऱ्या दिवशीं जेव्हां एकदांचा बंगल्यावर परत आला, तेव्हां जॉर्ज अगोदरच बाहेर निघून गेलेला होता.

आपलें हस्तलिखित आपण नष्ट करून टाकलें अशी मिसेस एल्व्हस्टेड-

जवळ थाप ठोकून लव्हबर्ग मोकळा झाला. परंतु मागाहून त्यानें हेड्डाजवळ कबूल केलें कीं तें आपल्या हातूनच हरवलें. याचा परिणाम म्हणून आपण जीव देण्याचें ठरविलें आहे असेंहि त्यानें हेड्डाला सांगितलें. वस्तुतः त्या क्षणीं तें हस्तलिखित हेड्डाच्या ताब्यांत होतें. परंतु तिनें या गोष्टीचा कांहीं एक थांगपत्ता लागूं दिला नाहीं. इतकेंच नव्हे तर ती त्याला आग्रहपूर्वक म्हणाली, "जीवच द्यायचा असला तर तो सुंदर रीतीनं द्यावा." म्हणून तिनें आपले वडील जनरल गॅब्लर यांच्या पिस्तुलांच्या जोडीपैकीं एक पिस्तुल आपल्या पूर्वीच्या प्रेमाची खूण म्हणून त्याला बक्षीस देऊन टाकलें. याच पिस्तुलानें तिनें एका काळीं लव्हबर्गचा मुडदा पाडायची धमकी दिलेली होती.

लव्हबर्ग पिस्तुल घेऊन सुंदर रीतीनें जीव देण्यासाठीं म्हणून निघून गेला. मग हेड्डानें निर्घृणपणें व जाणून बुजून त्याचें हस्तलिखित शेकोटीच्या भट्टींत खुपसून जाळून टाकलें. जॉर्ज परत आल्यावर त्याला लव्हबर्गच्या हस्तलिखिताची काय वासलात लागली याची हकीकत खुद्द हेड्डाच्या तोंडूनच ऐकायला मिळाली. त्याला हा प्रकार ऐकून येवढा भयंकर हादरा बसला कीं त्याच्या तोंडून एक शब्दहि निघेना. परंतु त्याचबरोबर तिनें हा हस्तलिखिताचा होम आपल्यासाठींच केला असावा अशी त्याची अर्धवट समजूत झाली. यामुळें हिच्या लेखीं आपणहि कुणी तरी आहोंत अशा समजुतीनें त्याला स्वत:विषयीं अभिमान वाटूं लागला. म्हणून या बाबतींत कुणाजवळ एक अवाक्षर देखील काढायचें नाहीं असा त्यानें निर्धार केला, आणि मिसेस एल्व्हस्टेड हिच्या टिपणांच्या आधारें हा सगळा ग्रंथ पुन्हा लिहून काढण्याच्या कार्याला आपलें आयुष्य अर्पण करायचें त्यानें ठरवून टाकलें.

हेड्डा या सगळ्या गफलतींतून सहीसलामत सुटली असती, पण दोन गोष्टी तिच्या मार्गांत आडव्या आल्या. पहिली गोष्ट म्हणजे लव्हबर्गला ज्या प्रकारें मृत्यु आला तो प्रकार. तो हेड्डाचा निरोप घेऊन निघाला आणि थेट मादेमोसील डायना हिच्या बिन्हाडीं परत दाखल झाला. तिथें, हेड्डानें योजून ठेवल्याप्रमाणें, सुंदर रीतीनें मरण्याऐवजीं, तो एका मारामारींत सांपडला. आणि या मारामारींत त्याला अपघाती मृत्यु आला. दुसरी गोष्ट म्हणजे जज्ज ब्रॅक याचा स्वभाव. हा पक्का निढावलेला व्यवहारी माणूस. हेड्डा तिच्या परी जितकी निर्घृण, तितकाच हा आपल्या परी निर्घृण. हेड्डाच्या निर्विकार, भावनाशून्य सौंदर्याचा तो फार पूर्वी-

पासूनचा चाहता. त्याच्या मनांत हेड्डाला आपली रखेली करण्याचा विचार होता.

आयलर्ट लव्हबर्ग याला ज्या विशिष्ट परिस्थितींत मृत्यु आला, त्या परिस्थितीचें भांडवल करण्याची संधि जज्ज ब्रॅक याच्यापुढें आयती चालून आली. ज्या पिस्तुलामुळें लव्हबर्गला मरण आलें तें हेड्डाच्या मालकीच्या पिस्तुलांच्या जोडीपैकींच एक आहे ही गोष्ट त्याला कळली होती. जर सत्य उघडकीला आलें, तर पोलिस तपास चालू होणार आणि या सगळ्याच प्रकरणाचा बोभाटा होऊन त्यांत हेड्डा गुरफटली जाणार. तिला आपल्या अशा जाहीर बदनामीला तोंड देण्याचीहि हिंमत नव्हती, किंवा जज्ज ब्रॅक याच्या मागणीनुसार त्याची रखेली होण्याची खासगी नामुष्की पतकरण्याचीहि तिची तयारी नव्हती.

म्हणून, इकडे तिचे यजमान व मिसेस एल्व्हस्टेड या दोघांनीं मृत लव्हबर्गच्या हस्तलिखिताची पुनर्रचना करण्याचा प्रदीर्घ उद्योग आरंभला, आणि त्या वेळीं तिकडे हेड्डा शांतपणें आपल्या छोट्याशा खासगी खोलींत गेली. तिनें आपलें उरलेलें पिस्तुल बाहेर काढलें; आणि सुंदर रीतीनें मरण पतकरलें. तिनें लव्हबर्गला ज्या प्रकारचें मरण पतकरायला आग्रहानें सांगितलें होतें, त्याच प्रकारचें मरण स्वतः पतकरलें. म्हणजे पिस्तुलाची गोळी आपल्या कपाळावर झाडून घेऊन तिनें मृत्यूला कवटाळलें.

## हेन्री द फिफ्थ : पांचवा हेन्री

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* विल्यम शेक्स्पियर (१५६४-१६१६). *कथानकाचा प्रकार :* ऐतिहासिक अद्भुतरम्यता. *काळ :* पंधराव्या शतकाची सुरवात. *स्थळ :* इंग्लंड आणि फ्रान्स. *पहिला प्रयोग :* इ. स. १६००.

*प्रमुख पात्रें :* **हेन्री द फिफ्थ** (पांचवा हेन्री), इंग्लंडचा राजा. **चार्ल्स द सिक्स्थ** (सहावा चार्ल्स), फ्रान्सचा राजा. **राजकन्या कॅथरीन**, त्याची कन्या. **द डॉफिन**, त्याचा पुत्र. **मॉंट जॉय**, एक फ्रेंच भाट.

*समीक्षण :* इंग्लंड व इंग्रज लोक यांचें यशोगान करण्याचा प्रयत्न म्हणून शेक्स्पियरनें 'द लाइफ ऑफ हेन्री द फिफ्थ' (पांचव्या हेन्रीचें चरित्र) या आपल्या नाटकामध्यें काव्य, राजवैभव आणि इतिहास यांचें कौशल्यपूर्ण संमिश्रण केलें. खुद्द राजा हेन्री हा इंग्लंडच्या राजघराण्यांतील सगळ्या उत्तमोत्तम गुणांचा प्रातिनिधिक अवतार आहे. असें असूनहि ॲजिन-

कोर्टच्या लढाईच्या आदल्या रात्रीं हेन्रीच्या हें ध्यानांत येतें कीं आपणहि इतर सगळ्या माणसांसारखाच एक माणूस आहोंत. मोठ्या माणसाच्या मोठेपणांत आणखी भर घालणारा जो नम्रतेचा सद्गुण, तो अंगीं असलेल्या इंग्रजाचें दर्शन आपल्याला शेक्स्पियरनें राजाच्या या जाणिवेच्या रूपानें घडविलें आहे. इंग्लंडविषयीं व इंग्रजांच्या सगळ्या गोष्टींविषयीं शेक्स्पियरला केवढा जबरदस्त अभिमान होता, त्याचें निदान क्षणभरापुरतें का होईना अंशभाक् झाल्याखेरीज हें नाटक पाहणारे वा वाचणारे लोक क्वचितच आढळतील. अँग्लो-सॅक्सन परंपरेचा एक अविभाज्य भाग अशी तडफ व असा ध्येयवाद ज्यांना हें नाटक पाहतांना व वाचतांना क्षणोक्षणीं जाणवणार नाहीं असे लोक क्वचितच सांपडतील.

*कथानक :* फाल्स्टाफच्या बरोबरीनें हॉटेलांतल्या मारामाऱ्यांमध्यें व पिण्यामध्यें एका काळीं अग्रगण्य असलेला राजपुत्र हा पांचवा हेन्री म्हणून वेस्टमिन्स्टर येथें विधिपूर्वक राजा झाला. त्यानें आपला करडा परंतु न्यायनिष्ठ अंमल आपल्या राज्यावर चालू केला. फ्रान्सच्या राजमुकुटावर आपला वंश-परंपरागत हक्क कसा प्रस्थापित करायचा हा प्रश्न त्याच्यापुढें उपस्थित झाला. फ्रेंच राजदूतांच्या आगमनापूर्वी या तरुण राजानें कँटरबरीचे आर्चबिशप (प्रमुख राजगुरु) यांचा कायदेशीर सल्ला विचारला. राजाला असें वाटत होतें कीं राजा तिसरा एडवर्ड याच्या द्वारां आपण फ्रान्सच्या राजसिंहासनाचे कायदेशीर वारस ठरतों. तिसरा एडवर्ड हा फ्रेंच गादीचा वारस होता का नाहीं असा फार तर प्रश्न उपस्थित करतां आला असता. परंतु त्याच्या मार्फत त्या गादीवरचा आपला वारसा निर्विवाद आहे. कँटरबरीच्या आर्चबिशपसाहेबांनीं हेन्रीची अशी खातरजमा करून दिली कीं "राजेसाहेब, फ्रेंच राजाचा फ्रान्सच्या गादीवर जेवढा हक्क आहे, तेवढाच आपलाहि त्या गादीवर हक्क आहे." या निर्णयाचा परिणाम म्हणून आर्चबिशपसाहेब व ईलायचे बिशपसाहेब या दोघांनींहि असा आग्रह धरला कीं हेन्रीनें फ्रेंचांवर आपला हक्क बजावलाच पाहिजे.

फ्रान्सचे राजदूत आले. पण ते फ्रान्सचा राजा चार्ल्स याच्या वतीनें न येतां त्यांचा उन्मत्त युवराज द डॉफिन याच्या वतीनेंच आले. ते राजदूत सांगूं लागले : "महाराज, आमच्या डॉफिनसाहेबांना असं वाटतं कीं राजसिंहासनावर चढण्यापूर्वी आपण जसे गरम डोक्याचे बेजबाबदार तरुण होतां तसेच आतां

इंग्लंडचे राजे झाल्यावरहि आहांत. आपण राज्य करायला नालायक आहांत व आपल्या मागण्या हास्यास्पद आहेत हें स्वतःचं मत आपल्यासमोर सक्रिय मांडण्यासाठीं डॉफिनसाहेबांनीं आपणांला हे टेनिस खेळायचे चेंडू भेट म्हणून पाठविले आहेत. त्यांचा स्वीकार व्हावा. "

या अपमानामुळें हेन्रीच्या संतापाला सीमा राहिली नाहीं. तो त्या फ्रेंच राजदूतांना म्हणाला : "तुमच्या धन्याला माझा हा इशारा कळवा. त्याला म्हणावं कीं या टेनिस खेळायच्या चेंडूंचं रूपांतर आम्ही तोफेच्या गोळ्यांमध्यें करूं आणि त्यांचा वापर आम्ही फ्रेंचांवर तोफा डागण्यासाठीं करूं. "

इंग्रजांनीं युद्धाची तयारी केली. डॉफिनच्या मनांतली हेन्रीविषयींची तुच्छता-बुद्धि तशीच कायम राहिली. परंतु ज्यांनीं हेन्रीचा संताप प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलेला होता, ते फ्रेंच राजदूत व त्यांच्या समवेत आलेला फ्रेंच लष्कराचा प्रतिनिधि व परिवारांतील इतर फ्रेंच लोक यांचा मात्र तेवढा आत्म-विश्वास टिकून राहिला नाहीं.

हेन्रीचें लष्कर फ्रान्सच्या किनाऱ्यावर उतरलें आणि त्यानें हारफ़्लर या शहराला वेढा घातला. राजा हेन्रीनें शहराच्या गव्हर्नरला निरोप धाडला कीं बऱ्या बोलानं शरण या, नाहीं तर आपल्या सगळ्या नागरिकांसकट हें सगळं शहर मी उध्वस्त करून टाकीन." बिचाऱ्या फ्रेंच गव्हर्नरला शरणागति पतकरणें भाग पडलें. कारण डॉफिननें जी कुमक त्याला पाठवायचें वचन दिलें होतें, ती कुमक त्याच्यापर्यंत मुळीं आलीच नाहीं.

इंग्रजांचें सैन्य फ्रान्स देशांतून झपाट्यानें मजल दरमजल करीत पुढें चाललें. त्याचा धडाका बघून एकटा फ्रान्सचा राजा चार्ल्स याच्याखेरीज बाकीचे सगळे फ्रेंच लोक घाबरले. फ्रान्सच्या राजाला मात्र आपल्या विजयाची येवढी बालंबाल खात्री होती कीं त्यानें आपला भाट मॉंट जॉय याच्या हातीं इंग्लंडच्या राजा हेन्री याजकडे निरोप धाडला. या निरोपाच्या द्वारां अशी मागणी केलेली होती कीं इंग्लंडच्या राजानें फ्रेंचांना दंड म्हणून मोठी रक्कम द्यावी, स्वतः फ्रेंचांच्या स्वाधीन व्हावें, आणि आपलें लष्कर फ्रान्समधून काढून घ्यावें. या धाडसी मागणीला हेन्रीनें मुळींच दाद दिली नाहीं. याच्या उलट त्यानें असा जबाब दिला कीं "राजा चार्ल्स याला मी जर कैद करून हवा असेन तर मला पकडण्यासाठीं त्यानं स्वतः यावं."

शेवटीं ॲजिनकोर्टच्या निर्णायक लढाईचा समय येऊन ठेपला. लढाईच्या आदल्या सायंकाळचा समय. इंग्रजांना आपल्या पांचपट फ्रेंच फौजेशीं सामना करण्याचा हा प्रसंग होता. हेन्रीचें लष्कर परक्यांच्या भूप्रदेशांत होतें. लष्करांत रोगराईचा फैलाव झालेला होता. आपल्या सैनिकांना उत्तेजन देण्यासाठीं आणि त्यांचें मनोधैर्य कितपत टिकून आहे याचाहि अजमाव घेण्यासाठीं राजा हेन्रीनें एका साध्या सैनिकाचा ओव्हरकोट उसना घेतला आणि तो अंगावर चढवून अशा पालटलेल्या वेषांत त्यानें आपल्या छावणींतून पायीं फेरफटका आरंभला. प्रत्येक चौकीचौकीवर व तंबू-तंबूंतून त्यानें फेरी मारली. आपल्या सैनिकांशीं गप्पा मारतांना तो म्हणाला : "गड्यांनो, राजा म्हणजे इतर सगळ्या माणसांसारखा एक माणूसच असतो. आणि तो जर राजा असेल तर त्याला रणांगणावर आपल्या सैनिकांसमवेतच असावंसं वाटेल. अन्यत्र कुठंहि त्याला चैनच पडणार नाहीं."

राजा हेन्री मग स्वतःशींच विचार करूं लागला. राजेपणाच्या केवढ्या काळज्या व जबाबदाऱ्या आपल्या शिरावर आहेत याचा विचार त्याच्या मनांत आला. पुन्हां त्यानें आपण अगदीं एक साधा माणूस आहोंत अशी कल्पना स्वतःच्या मनांत आणली. तसें पाहिलें तर केवळ राजोपचाराखेरीज आपल्यांत व सामान्य माणसांत कांहींच फरक नाहीं; आणि राजोपचार म्हणजे तरी पोकळ डामडौलाखेरीज दुसरें काय आहे ?

त्या महान लढाईच्या आदल्या रात्रीं हेन्रीच्या मनांत असे समंजस विचार चाललेले होते. या लढाईत इंग्रजांना आपलें खूपच रक्त सांडावें लागणार या विचारानें तो अगदीं बेचैन झाला. याच्या उलट फ्रेंचांचे विचार अगदींच वेगळे होते. इंग्रजांचा पराभव करण्यास आपण संपूर्ण-पणें समर्थ आहोंत अशी भलतीच घमेंड त्याच्या डोक्यांत शिरलेली होती. म्हणून लढाईला तोंड लागायच्या अगोदर इंग्रजांना शरणागतीची शेवटची संधि देण्यासाठीं मॉंट जॉय पुन्हां राजा हेन्रीसमोर हजर झाला. हेन्रीनें त्याच्या दमदाटीला पुन्हां धुडकावून लावलें. आपल्या सैन्याचें संख्याबळ कमी असल्या-बद्दल तो मुळींच नाउमेद झाला नाहीं कारण त्यानें आपल्या एका लष्करी अधिकाऱ्याबरोबर असा युक्तिवाद केला कीं "इंग्रजांच्या सैन्याचं संख्याबळ जितकं कमी असेल तितका त्यांचा विजय जास्त उठावदार ठरेल. कमी फौज

असतांना त्यांनीं विजय मिळविला तर त्यांचा मान अधिकच वाढेल."

दुसऱ्या दिवशीं लढाईला तोंड लागलें. राजा हेन्रीच्या कुशल नेतृत्वाखालीं इंग्रजांनीं आपली बाजू भक्कम करून ठेवली. लढाईच्या ऐन आणीबाणीच्या क्षणीं फ्रेंचांची जादा कुमक रणांगणावर येऊन ठेपली. तेंव्हां राजा हेन्रीनें आपल्या सेनेला असा हुकुम फर्मावला कीं "शत्रूचे जेवढे सैनिक आपण कैद करून ठेवलेले आहेत, त्या सगळ्यांची कत्तल करून टाका. म्हणजे आपल्या इंग्रज सेनेची सगळी शक्ति समोरच्या शत्रूचा मुकाबला करण्याच्या कामीं लावतां येईल. आपल्या मागं काय चाललंय त्याचा बंदोबस्त ठेवण्यांत आपली सेना उगाच गुंतून राहायला नको."

लवकरच विजयाचें पारडें इंग्रजांच्या बाजूनें झुकलें. आतां मॉंट जॉय दांतीं तृण धरून हेन्रीकडे आला आणि फ्रेंच सैनिकांचीं प्रेतें पुरण्यासाठीं अवसर मिळावा म्हणून युद्धतहकुबीची याचना करूं लागला. हेन्रीनें त्याची ही विनंति उदार मनानें मान्य केली आणि त्याच वेळीं त्याला मॉंट जॉयनें सांगून टाकलें कीं फ्रेंचांनीं आपला पराभव झाल्याचें कबूल केलें आहे. दहा हजार फ्रेंच सैनिक या लढाईत ठार झाले आणि इंग्रजांचे अवघे एकोणतीस सैनिक धासतीथीं पतन पावले.

लढाई संपल्यावर फ्रेंच राजाबरोबर तहाच्या अटींच्या वाटाघाटी करण्याखेरीज हेन्रीला दुसरें कांहीं कामच राहिलें नाहीं. चार्ल्सची स्वरूपसुंदर राजकन्या कॅथरीन हिली मागणी घालणें ही हेन्रीची मुख्य अट होती. म्हणून त्याचे दुय्यम अधिकारी फ्रेंचांबरोबर शरणागतीच्या अटींचे तपशील ठरविण्यांत गुंतलेले असतांना हेन्री या राजकन्येचा अनुनय करूं लागला आणि त्यानें तिला आपल्याशीं लग्न करायला पाचारण केलें. कॅथरीनला इंग्रजी भाषेचें ज्ञान अगदींच अल्प होतें. आणि हेन्रीलाहि फ्रेंच भाषेचें ज्ञान तितकेंच अल्प होतें. तरी देखील *उभयतांना प्रेमाची विश्वव्यापी भाषा चांगलीच अवगत होती.* फ्रेंच कॅथरीननें इंग्लिश केट व्हायला संमति दिली आणि तिनें हेन्रीची वधू व्हायला अर्थातच होकार दिला.

# एच्. एम्. एस्. पिनाफोर

*वाङ्मयप्रकार :* विनोदी हास्यरसप्रधान संगीतिका. *लेखक :* डब्ल्यू. एस्. गिल्बर्ट (१८३६-१९११). *कथानकाचा प्रकार :* विनोदी उपहासिका. *काळ :* एकोणिसाव्या शतकाचा उत्तरार्ध. *स्थळ :* पोर्ट्स्माऊथ बंदर, इंग्लंड. *पहिला प्रयोग :* १८७८.

*प्रमुख पात्रें :* **जोसेफाइन**, कप्तानाची कन्यका. **राल्फ**, जोसेफाइनवर प्रेम करणारा कनिष्ठ दर्जाचा नाविक. **सर जोसेफ पोर्टर**, फर्स्ट लॉर्ड ऑफ द अॅडमिरल्टी (आरमार खात्याचा प्रमुख) आणि जोसेफाइनला मागणी घालणारा भावी वर. **कप्तान**, जोसेफाइनचे वडील. **लिट्ल बटरकप**, कप्तानावर प्रेम करणारी महिला.

*स मी क्ष ण :* या संगीतिकेच्या रचनेचे मानकरी दोघे आहेत : डब्ल्यू. एस्. गिल्बर्ट आणि त्याचा संगीत-नियोजक सहकारी आर्थर सुलिव्हन. 'एच्. एम्. एस्. पिनाफोर' ऊर्फ 'नाविकाची प्रेमिका झालेली ललना' या संगीतिकेची रचना रंगभूमीवर साभिनय गाऊन दाखविण्यासाठीं करण्यांत आली. ती जशीच्या तशी छापून प्रकाशित होऊन वाचली जावी या उद्देशानें तिची रचना केलेली नाहीं. 'ग्रँड ऑपेरा' या नाट्यप्रकारांतील अतिरंजितपणा आणि विशेषतः त्यांतलीं असंभाव्य कथानकें यांची या संगीतिकेच्या द्वारां गिल्बर्ट आणि सुलिव्हन यांनीं उघड उघड थट्टा केलेली आहे. 'पिनाफोर' या संगीतिकेमध्यें काळवेळेचें अवधान सपशेल धाब्यावर बसविलेलें असून हास्यरसनिर्मिती व उपहास या दोन रसांचा परिपोष तींत यशस्वी रीतीनें साधलेला आहे. तींतलें प्रत्येक गाणें व प्रत्येक प्रवेश महामिस्किल व ढंगदार यमकप्रासमुक्त काव्यपंक्तींनीं ओतप्रोत भरलेला आहे. संवादांतील सहजता व कल्पकता तर शब्दाशब्दागणीक जाणवते.

*कथा न क :* 'पिनाफोर' हें आरमारी जहाज पोर्ट्स्माऊथ बंदरांत नांगर टाकून उभें होतें. त्याच्यावर काम करणाऱ्या सगळ्या लोकांची एकच धांवपळ चाललेली होती. कारण फर्स्ट लॉर्ड ऑफ द अॅडमिरल्टी, आरमार खात्याचे प्रमुख, सर जोसेफ पोर्टर, के. सी. बी. (ब्रिटिश साम्राज्याचे सेनासाहेब सुभे), यांनीं त्या जहाजाला भेट देण्याचा आपला मनोदय जाहीर केलेला होता. नाविकांनीं डेक धुवून पुसून स्वच्छ केलें. कॅप्टननें त्यांची तपासणी केली. नाविकांची कामगिरी बघून कॅप्टन खूष झाला. नाविकहि कॅप्टनचें देखरेख कौशल्य बघून तितकेच खूष

झाले. एका नाविकाचें मात्र काय बिघडलें होतें कोण जाणे. त्याचें नांव राल्फ. पुढच्या डोलकाठीवरचा हा कनिष्ठ नाविक. उद्विग्नता व नैराश्य या भावनांनीं त्याला सपशेल घेरलेलें दिसलें. जहाजाच्या कप्तानाची कन्यका जोसेफाइन हिच्यावर त्याचें प्रेम होतें. परंतु त्याचा दर्जा होता कनिष्ठ. या कारणास्तव तिनें त्याच्या अनुनयाचा प्रतिकार केला आणि त्याची प्रेमयाचना झिडकारून टाकली.

सर जोसेफ यांच्या आगमनापूर्वी लिट्ल बटरकप ही फेरीवाली जहाजावर येऊन दाखल झाली. रिबिनी, लेस, कात्र्या, सुऱ्या, काकवीचा राब आणि टॉफी अशा वस्तूंचा विक्रा तिनें धूमधडाक्यानें चालविला. कप्तानाशीं बोलतां बोलतां तिनें ' दिसतं तसं कधीं कधीं नसतं आणि म्हणून माणूस अनेकदां फसतं ' असे सूचक उद्गार काढले. लिट्ल बटरकप हिच्या देहाची ठेवण आकर्षक असून ती आपल्याला अगदींच आवडत नाहीं असें नाहीं हें कप्तानाच्या नजरेस आलें.

तेवढ्यांत सर जोसेफ यांचा तराफा जहाजाच्या नजीक आला. फर्स्ट लॉर्डसाहेब लवकरच जहाजावर चढून आले. त्यांच्यासमवेत त्यांच्या सख्ख्या बहिणी, चुलतबहिणी, मावसबहिणी, आतेबहिणी, मामेबहिणी, चुलत्या, आत्या, मावशा व मामी असा परिवार आलेला होता. लॉर्डसाहेबांनीं नाविकांची तपासणी केली. नंतर त्यांनीं त्यांना विजय कसा मिळवावा याविषयीं सूचना दिल्या. या बाबतींतला त्यांचा स्वतःचा फॉर्म्युला अगदींच साधा आणि सरळ होता. त्यांच्या टेबलाला घट्ट बसविलेल्या दरवाजाच्या मुठी होत्या. आणि त्या घांसूनपुसून अगदीं चकचकीत ठेवलेल्या असत. तसें पाहिलें तर त्यांनीं समुद्रावरची सफर कधींच केलेली नव्हती. आणि सगळ्या वस्तु घांसूनपुसून चकचकीत करून ठेवल्या कीं यश हमखास मिळालेंच म्हणून समजावें असा त्यांचा दंडक होता. येवढें सांगितल्यानंतर मग सर जोसेफ यांनीं आपल्या भेटीचा उद्देश साध्य करण्याकडे लक्ष पुरविण्यास सुरवात केली. जोसेफाइनला लग्नाची मागणी घालण्यासाठीं ते या वेळीं मुद्दाम या जहाजाला भेट द्यायला आलेले होते.

परंतु सर जोसेफ यांजबरोबर लग्न करण्याचा जोसेफाइनचा मुळींच विचार नव्हता. तिला ते अगदीं नापसंत होते. परंतु येवढ्या मोठ्या अधिकारपदावर असलेल्या महापुरुषाला एकदम सपशेल नकार कसा द्यायचा ? या अडचणींतून मार्ग काढण्यासाठीं ती त्यांना म्हणाली, " मी केवळ एका यःकश्चित् कप्तानाची कन्या. अशा परिस्थितींत आपणांसारख्या उच्चपदस्थ अधिकाऱ्याशीं माझं लग्न

होणं कसं शक्य आहे ? म्हणून हें कांहीं जमणारसं दिसत नाहीं." सर जोसेफ यांनीं तिच्या नम्रतेचें कौतुक केलें. परंतु त्याचबरोबर तिचा आक्षेप त्यांनीं एकदम बाजूला ढकलून दिला. ते तिला आश्वासनपूर्वक म्हणाले, "हे कप्तान कन्यके, माणसाचा दर्जा हा प्रेमाच्या बाबतींत अडसर म्हणून मुळींच येतां कामा नये. कारण प्रेम ही गोष्ट अशी आहे कीं ती सगळ्या दर्जांना एकाच समान पातळीवर आणून ठेवते." जोसेफाइननें लॉर्डसाहेबांचें हें विधान तत्काळ मान्य केलें. त्याबरोबर सगळ्या मंडळींचा ताबडतोब असा समज झाला कीं लॉर्डसाहेब व जोसेफाइन यांच्या लग्नाचा बार लवकरच उडणार.

इकडे जोसेफाइनची प्राप्ति होण्याची सगळी आशा संपली अशा समजुतीनें राल्फ वेडापिसा झाला आणि त्यानें आपल्या कपाळासमोर पिस्तुलाची नळी रोंखून त्याचा चाप ओढण्याची जय्यत तयारी केली. त्या क्षणीं जोसेफाइन धांवतच त्याच्या दालनांत आली आणि म्हणाली : "माझ्या राजा रे, तूं असा स्वतःचा नाश करून घेऊं नकोस. तुझ्यावर माझं अमर प्रेम आहे." एकंदर प्रकाराला ही अशी कलाटणी मिळाल्याबरोबर राल्फच्या नाविक सवंगड्यांनीं हर्षभरानें जल्लोष आरंभला. त्याला फक्त एकच अपवाद निघाला. डिक डेड-आय हा नीरस वृत्तीचा नावाडी तेवढा या आनंदोत्सवापासून अलिप्त राहिला.

दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं चोरून किनाऱ्यावर जायचें आणि लग्न करून परत यायचें असा जोसेफाइन व राल्फ या प्रणयी युगुलानें बेत आंखला. एकदां आपला लग्नसमारंभ उरकून घेतल्यावर मग त्या बाबतींत कुणालाच कांहीं एक करतां येणार नाहीं अशी या दोघांची या बाबतींतली धारणा होती. परंतु डिक डेड-आय सरळ कप्तानसाहेबांकडे गेला. त्यानें या जोडप्याची ही सगळी योजना त्यांना आगाऊच सांगून टाकली. तेव्हां कप्तानसाहेबांनीं त्यांच्यावर सक्त नजर ठेवली. हे दोघे प्रेमी जीव व त्यांचे साथीदार बिलकुल आवाज न करतां चोरपावलांनीं जहाजावरून बाहेर सटकणार येवढ्यांत कप्तानसाहेब त्या ठिकाणीं हजर झाले. राल्फच्या आगाऊपणाचा त्यांना भयंकर संताप आला. आपली कन्या जोसेफाइन ही असल्या कनिष्ठ दर्जाच्या लोकांच्या संगतींत असलेली बघून त्यांना तिची खूपच चीड आली. कप्तानसाहेबांनीं ताबडतोब राल्फला जहाजावरून दोन शिडांच्या गलबतांत डांबून ठेवविलें.

कप्तानसाहेबांची जोरजोरांत शिवीगाळ चाललेली होती. तिच्याकडे सर

जोसेफ यांचें लक्ष वेधलें. काय प्रकार घडला आहे तो बघण्यासाठीं ते लगबगीनें अगदीं ऐन मोक्याच्या वेळेलाच जहाजावर येऊन पोंचले. सगळा प्रकार ऐकल्यावर लॉर्डसाहेबांच्या सख्ख्या बहिणी, चुलतबहिणी, मावसबहिणी, आतेबहिणी, मामेबहिणी, चुलत्या, आत्या, मावशा व मामी या सगळ्या जणींना भयंकर जबरदस्त धक्का बसला. सर जोसेफ यांना देखील तेवढाच जबरदस्त धक्का बसला. त्यांना येवढा धक्का बसला कीं त्याच्या भरांत त्यांनीं कप्तानसाहेबांना भयंकर कडक भाषेंत झाडून काढलें.

त्यांची ही वादावादी चालू असतांनाच लिट्ल बटरकप ही फेरीवाली तिथें येऊन पोंचली. तिनें तिथल्या तिथें एका रहस्याचा स्फोट करून जमलेल्या सगळ्या मंडळींना आश्चर्यचकित करून सोडलें. ती म्हणाली : " ऐका साहेबांनो, अनेक वर्षे झालीं त्या गोष्टीला. त्या वेळीं मी फेरीवालीचा धंदा नव्हत्यें करीत. मी त्या वेळीं एक बालसंगोपनगृह चालवीत होत्यें. त्या काळांत दोन तान्हीं अर्भकं माझ्याकडे राखुळीला आलीं. त्यांतलं एक होतं कनिष्ठ कुळांतलं, आणि दुसरं होतं वरिष्ठ कुळांतलं. त्यांतलं एक मला फार फार आवडलं. म्हणून मी त्या कनिष्ठ कुळांतल्या अर्भकाची अदलाबदल केली आणि तें दिलं वरिष्ठ कुळांतल्या कुटुंबाकडे धाडून आणि वरिष्ठ कुळांतल्या अर्भकाची रवानगी केली कनिष्ठ कुळांतल्या कुटुंबाकडे. आतां खरं सांगायचं म्हणजे हे कप्तानसाहेब कनिष्ठ कुळांतले आहेत आणि मीच त्यांना वरिष्ठ कुळांतले बनवले. आणि हा नाविक राल्फ मात्र खरोखरीच वरिष्ठ कुळांतला आहे. पण मला त्या वेळीं तो आवडला नाहीं. म्हणून त्याला मी त्याच वेळीं दिला होता कनिष्ठ कुळांत धाडून."

या विस्मयकारक रहस्यस्फोटानें जी कांहीं विलक्षण परिस्थिति निर्माण करून ठेवली म्हणतां, कीं कांहीं विचारायची सोयच नव्हती. तरी पण तिच्यांतून देखील चटकन आणि सगळ्यांच्या एकोप्यानें मार्ग हा निघालाच. कप्तानसाहेबांनीं आपली जागा राल्फला देऊन टाकली. आतां खुद्द राल्फच त्या जहाजाचा कप्तान झाला. सर जोसेफ यांनीं तिथल्या तिथें जाहीर करून टाकलें कीं "मला जोसेफाइनशीं लग्न करतां येणं शक्य नाहीं. कारण ती केवळ एका अगदीं साध्यासुध्या नाविकाची कन्या आहे." म्हणून मग जोसेफाइननें लग्न केलें नवा कप्तान राल्फ याच्याशीं. आणि मूळच्या कप्तानसाहेबांनीं लग्न केलें लिट्ल बटरकप हिच्याशीं. सर जोसेफ यांच्या वांटणीला लग्न करायला आतां

नवरीच शिल्लक राहिली नाहीं. त्यांनीं मग एका उच्च कुळांतल्या चुलत-बहिणीशीं का आतेबहिणीशीं का मामेबहिणीशीं — अशा सख्खी बहीण सोडून इतर कुणा तरी बहिणीशींच आपलें लग्न उरकून घेतलें.

## द हाउस ऑफ ॲट्रियस

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* एस्किलस (इ. स. पूर्वी ५२५-४५६). *कथानकाचा प्रकार :* अभिजात शोकान्तिका. *काळ :* ट्रॉय नगरीच्या पाडावा-नंतरचा. *स्थळ :* आर्गास. *पहिला प्रयोग :* इ. स. पूर्वी ४५८.

*प्रमुख पात्रें :* **ॲगॅमेम्नॉन**, राजा. **क्लिटेम्नेस्ट्रा**, त्याची राणी. **कॅस्सान्ड्रा**, ट्रॉयच्या लढाईत पकडून आणलेली एक कैदी स्त्री. **आयेगिस्थस**, क्लिटेम्नेस्ट्राचा प्रियकर. **ओरेस्टेस**, ॲगॅमेम्नॉनचा पुत्र. **एलेक्ट्रा**, ओरेस्टेसची बहीण.

*समीक्षण :* पुरातन अथेन्स शहरांतील दिवाणी, फौजदारी व धर्मसंबंधीं कामावर देखरेख करणाऱ्या नऊ मुख्य अधिकाऱ्यांपैकीं पहिल्या दर्जाचा अधिकारी फिलोक्लीस याच्या कारकीर्दीत इ. स. पूर्वी ४५८ सालीं 'द हाउस ऑफ ॲट्रियस' ही नाट्यत्रयी सादर करून एस्किलसनें पहिलें बक्षीस मिळविलें. क्रूरकर्मा व रक्त-पिपासू ॲट्रियस याच्या शापित वंशजांच्या या कथेची गणना अभिजात साहित्यांतील महान कथांमध्यें केली जाते. अटळ नियति व सूड या विषयांवर आपल्या नाट-कांची उभारणी करतांना एस्किलसला ग्रीक राज्यसंस्थेतील नैतिक अधिष्ठानाचा सखोल विचार करावा लागला. याच कारणास्तव त्याच्या नाटकांतील नैतिक प्रश्न स्पष्ट व अविचलित स्वरूपांत मांडलेले असतात; त्यांचा मूळ हेतु साध्यासुध्या पण भेदक स्वरूपांत सादर केलेला असतो; त्यांतल्या त्यांत ओरेस्टेस या पात्राच्या सदसद्विवेकबुद्धीचे बारकावे वर्णन करतांना त्याच्या या गुणविशेषांचा प्रकर्षानें प्रत्यय येतो. 'ॲगॅमेम्नॉन', 'द लिबेशन-बेअरर्स' आणि 'द फ्यूरीज' अशा अलग अलग तीन नाटकांची मिळून ही नाट्यत्रयी बनलेली आहे.

*कथानक :* ॲट्रियसच्या घराण्याला एक शाप कायमचा बाधलेला होता. कारण आर्गास येथील भव्य राजवाड्यामध्यें जुलमशहा ॲट्रियस यानें थायेस्टेस याचीं मुलें ठार केलीं आणि एका राजेशाही मेजवानीचे प्रसंगीं या मुलांचें मांस त्यांचाच पिता थायेस्टेस याला खाऊं घातलें. ॲगॅमेम्नॉन व मेनेलॉस हे दोघे

ॲट्रियसचे पुत्र होते. मेनेलॉसची पत्नी हेलेन हिला पॅरिसनें पळविलें आणि तो तिला ट्रॉय शहरीं घेऊन गेला. तिला सोडवून आणण्यासाठीं मेनेलॉसनें ट्रॉय-निवासी ट्रोजन लोकांवर स्वारी केली. त्याच्याबरोबर लढाईवर गेलेल्या ग्रीक वीरांसमवेत त्याचा भाऊ ॲगॅमेम्नॉन हाहि होता. परंतु ट्रॉय नगरीवर चालून जातां जातां वाटेंत औलिस या बंदरांत ॲगॅमेम्नॉनचें आरमार उगीचच थांबून राहिलेलें होतें. त्या वेळीं लोकांनीं ॲगमेम्नॉनला अशी गळ घातली कीं " तूं तुझी कन्या इफिजीनिया हिला देवदेवतांसमोर बळी दे. " त्याप्रमाणें त्यानें इफिजीनियाचा बळी दिला. या कृत्याची बातमी ऐकून त्याची पत्नी राणी क्लिटेम्नेस्ट्रा हिला भयंकर संताप आला आणि तिनें आपल्या लेकीच्या या हत्येचा सूड घेण्याची प्रतिज्ञा केली. तिनें आपला पुत्र ओरेस्टेस याला फोसिसच्या राजाकडे संभाळणुकीसाठीं धाडून दिलें आणि ती स्वतः सूडाच्या भावनेनें पेटलेल्या अवस्थेंत आपल्या अंधाऱ्या राजवाड्यांत मुक्काम करून योग्य संधीची वाट बघत राहिली.

तिच्या या सूड घेण्याच्या विचाराला साथ देणाराहि एक जण तिला भेटला. त्याचें नांव आयेगिस्थस. हा थायेस्टेसचा शिल्लक राहिलेला मुलगा. बरींच वर्षें अज्ञातवासांत काढून तो नुकताच परत आलेला होता. ॲट्रियसच्या भयंकर पापाचा बदला त्याला घ्यायचाच होता. द्वेषाच्या समान भूमिकेवर राणी क्लिटेम्नेस्ट्रा व आयेगिस्थस हीं दोघें एकत्र आलीं. पुढें त्यांचें एकमेकांवर प्रेमहि जडलें. आतां दोघांनीं मिळून सूड घेण्याचा कट रचायला सुरवात केली.

ट्रॉयची लढाई जिंकून परत येतांना मेनेलॉसचें जहाज वादळांत सांपडून मागें राहिलें. ॲगॅमेम्नॉन एकटाच पुढें निघून आला. त्याच्या जहाजावरचे दिवे दूर समुद्रांत एका पहारेवाल्याच्या दृष्टीस पडले. त्याबरोबर राजा येत असल्याची वर्दी त्यानें आपली राणी क्लिटेम्नेस्ट्रा हिला दिली. ॲगॅमेम्नॉन आपल्या सैनिकांना गांवांत मुक्कामाला सोडून देऊन एकटाच आपल्या रथांतून राजवाड्याकडे आला. रथांत आपल्या शेजारीं त्यानें कॅस्सान्ड्रा हिला बसवून घेतलें होतें. ही ट्रॉयच्या राजाची कैद करून आणलेली कन्या. लुटीच्या वांटणींत ही ॲगॅमेम्नॉनच्या वांट्याला आली. पुढें येणाऱ्या सर्व संकटांचें भविष्य ही धडाधड सांगत सुटली. " तुझ्यावर कसली तरी आपत्ति लवकरच कोसळणार आहे "— असा इशारा तिनें राजा ॲगॅमेम्नॉनला अगोदरच देऊन ठेवलेला होता.

तथापि ॲगॅमेम्नॉन याला आपल्या घरीं परत येण्याच्या संदर्भात संकटाचा कसलाहि संशय आलेला नव्हता. राजवाड्याच्या दरवाज्याशीं क्लिटेम्नेस्ट्रा त्याचें स्वागत करण्यासाठीं आली. तिच्या भोंवतालीं तिच्या सशस्त्र हुजऱ्यांचा ताफा होता. ट्रॉयच्या विजेत्याच्या सन्मानार्थ उंची गालिचे उलगडून ठेवलेले होते आणि या पायघड्यांवरून त्यानें चालत यावयाचें अशी व्यवस्था केलेली होती. आपलें येवढें मोठें थाटामाटाचें स्वागत उगाच कशाला केलें म्हणून ॲगॅमेम्नॉन राणी-वर रागावला. येवढ्या लांबच्या प्रवासावरून आल्यानंतर तो ताजातवाना होण्यासाठीं राजवाड्यांत विश्रांति घ्यायला गेला. आंत जातांना त्यानें क्लिटेम्नेस्ट्राला सांगून ठेवलें कीं "या कॅस्सान्ड्राचंहि स्वागत कर. मी कैद करून आणलेल्या या स्त्रीला नीट वागव."

ॲगॅमेम्नॉन विश्रांति घ्यायला गेल्यानंतर क्लिटेम्नेस्ट्रा परत वाड्याच्या दरवाज्याशीं आली. तोंवर कॅस्सान्ड्रा तशीच रथांत बसून होती. तिनें रथ सोडून वाड्यांत प्रवेश करायला साफ नकार दिलेला होता. क्लिटेम्नेस्ट्रा आल्यावर देखील तिनें आपला हट्ट तसाच ठेवलेला पाहिल्यावर राणी मोठ्यानें म्हणाली: "ही एक अगदींच सामान्य गुलाम स्त्री आहे आणि हिला वेड लागलेलं दिसतंय. हिच्या तोंडाला लागायचा कमीपणा मी मुळींच पतकरणार नाहीं."

आणि राणी फणकाऱ्यानें परत वाड्यांत चालती झाली. इकडे कॅस्सा-न्ड्रानें आकाशाकडे नजर लावली आणि ती उच्च स्वरानें ॲपोल्लो देवाला विचारूं लागली: "हे देवा, या शापित घराकडे मला कुणी यायला लावलं नि कां यायला लावलं? सांग ना रे देवा, आतां तूं असा गप्प कां रे?" आणि मग ती वाड्यासमोर जमलेल्या नागरिकांना उद्देशून म्हणाली: "ऐका हो ऐका! तुमची ही क्लिटेम्नेस्ट्रा राणी तुमचा राजा ॲगॅमेम्नॉन याचा खून करणार आहे. माझ्या ट्रॉय नगरीचा पाडाव करून या ॲगॅमेम्नॉनला काय मिळालं? हाय हाय! या ॲगॅमेम्नॉनचा बाप राजा ॲट्रियस हा निव्वळ खाटिक होता हो! त्यानंच थायेस्टेसच्या कोवळ्या मुलांचीं खांडोळीं केलीं आणि त्या राक्षसानं त्या अर्भकांचं मांस खुद्द थायेस्टेसला खाऊं घातलं. ॲट्रियसच्या या पापाचं फळ त्याच्या घराण्याला आतां भोगावं लागतंय. त्या अर्भकाच्या बाबतींतील भयानक कृत्याचा शाप या घराण्याला बाधलेला आहे. म्हणून मी हें भविष्य अगोदरच सांगून ठेवत्यें कीं तुमची राणी तुमच्या ॲगॅमेम्नॉनचा नक्कीच खून

करणार आहे." येवढें बोलून कॅस्सान्ड्रा वाड्यांत प्रवेश करते न करते इतक्यांत बाहेरच्या लोकांना आंतून ॲगॅमेम्नॉनची मरणकाळची किंकाळी ऐकूं आली.

क्षणभऱ्यानें क्लिटेम्नेस्ट्रा वाड्याच्या दरवाज्यांत आली. तिच्या हातांत आयेगिस्थसची रक्तानें माखलेली तरवार होती. तिच्या मागच्या अंगाला राजाचें प्रेत उंची गालिच्यामध्यें गुरफटून पडलेलें होतें. क्लिटेम्नेस्ट्रानें आपल्या कृत्याचें समर्थन नागरिकांसमोर ठेवलें. ती म्हणाली : "राजानं आमची मुलगी इफिजीनिया हिचा खून केला आणि म्हणून मी राजाला ठार केलं. मी कॅस्सान्ड्रालाहि ठार केलं. कां म्हणून विचाराल. या बाईपायीं राजा ॲगॅमेम्नॉननं माझ्या इज्जतीला बट्टा लावला होता, आणि म्हणून मी तिलाहि ठार केलं." शेवटीं तिनें नागरिकांना आव्हानपूर्वक सांगितलें : "माझ्या या कृत्यामुळं ॲट्रियस घराण्याच्या रक्तपिपासूपणाचा माझ्या हातून शेवट झाला असं तुम्ही समजा."

मग तिनें थायेस्टेसचा पुत्र आयेगिस्थस याची नागरिकांना ओळख करून देण्यासाठीं त्याला नागरिकांसमोर उभा केला. आयेगिस्थस म्हणाला : "मी जो सूड घेतला तो न्यायाला धरूनच होता. मी आतां ॲगॅमेम्नॉनच्या राजवाड्यांत राहून हें राज्य चालविणार आहें." हें ऐकून तिथें जमलेल्या नागरिकांनीं या गुन्हेगार जोडप्याचा धिक्कार केला. कुणी तरी उच्च स्वरांत ओरडून त्या दोघांना बजावलें : "अरे पाप्यांनो ! राजपुत्र ओरेस्टेस जिवंत आहे. तो आपल्या वडिलांच्या खुनाचा बदला घेतल्याखेरीज राहणार नाहीं !"

निषेधाच्या ह्या आरोळ्या ऐकून आयेगिस्थस व क्लिटेम्नेस्ट्रा या दोघां गुन्हेगारांना भीति वाटली आणि त्याच बरोबर संतापहि आला. त्या संतापाच्या भरांत त्यांनीं मोठमोठ्यानें गर्जून स्वतःच्या गुन्ह्याचें समर्थन केलें आणि खुद्द देवदेवतांनाच आव्हानपूर्वक बजावलें कीं "छाती असेल तर आम्ही बळकावलेल्या राजसत्तेवरून आम्हांला खेंचून काढा !"

ओरेस्टेस वयांत आल्याबरोबर फोस्सिस नगराहून स्वगृहीं परतला. बघतो तों आपल्या आईनें व आयेगिस्थसनें मिळून आपल्या वडिलांचा खून केल्याचें त्याला कळून आलें. वडिलांच्या मृत्यूबद्दल त्यानें खूप शोक केला आणि देवांच्या राजाकडे मागणें मागितलें कीं "हे देवांच्या राजा ! या गुन्हेगार जोडप्याचा सूड घेण्याची कर्तबगारी मला मिळवून दे." ॲगॅमेम्नॉनची कन्या एलेक्ट्रा हिनेंहि वडिलांच्या मृत्यूबद्दल शोक केला आणि त्यांच्या मारेकऱ्यांना

शाप दिला. तिचा भाऊ तिला भेटायला आला. पण प्रथम तिनें त्याला ओळखलेंच नाहीं, कारण तो वेष पालटून आला होता आणि हरकारा होऊन त्यानें स्वतःच्या मृत्यूची खोटीच बातमी आणलेली होती. वडिलांच्या थडग्याजवळ बहीणभावंडांची गांठ पडली आणि तिथें त्यानें बहिणीला स्वतःची ओळख दिली.

वडिलांच्या थडग्यासमोर त्यानें वडिलांच्या आत्म्याची प्रार्थना केली आणि मागणें मागितलें कीं " माझ्या संकल्पित कार्यांत मला यश लाभेल येवढी शक्ति मला मिळूं दे. " यावर एलेक्ट्रानें त्याची अशी खातरजमा करून दिली कीं " भाऊराया, तूं कांहीं काळजी करूं नकोस. ॲट्रियसच्या वंशजांपैकीं प्रत्येकाच्या वांट्याला दुःखच वाढून ठेवलेलं आहे. तो सर्वनाश एकदांचा आला म्हणजेच मला समाधान वाटेल. "

एकदां ओरेस्टेसची आई क्लिटेम्नेस्ट्रा हिला असें स्वप्न पडलें होतें कीं आपण एका सापाला स्तनपान देत आहोंत आणि या सापानें दुधाऐवजीं आपल्या स्तनांतून रक्त काढलें. या स्वप्नाची हकीकत ओरेस्टेसला कळली. त्यावरून त्यानें असा निष्कर्ष काढला कीं हें स्वप्न आपल्यालाच अनुलक्षून आहे आणि आपण जें कृत्य करण्याचा निर्धार केलेला आहे त्या कृत्याच्या यशाची हमीच या स्वप्नाच्या द्वारां आपल्याला मिळते. म्हणून तो वेष पालटून राजवाड्यांत गेला आणि त्यानें आयेगिस्थसला ठार केलें. आपल्या आईच्या प्रियकराच्या रक्तानें माखलेली तरवार तशीच हातीं धरून तो आपली आई क्लिटेम्नेस्ट्रा हिच्या समोर हजर झाला. त्या तरवारीवरून रक्ताचे थेंब अजून ठिबकतच होते. त्याच तरवारीनें त्यानें तिथल्या तिथें आपल्या आईचाहि शिरच्छेद केला.

ओरेस्टेसनें तीं दोन प्रेतें नागरिकांसमोर आणून ठेवलीं. आणि ॲपोलो देवाला उद्देशून त्यानें उच्च स्वरांत जाहीर केलें कीं " हे देवा ! तुझ्या आदेशानुसार मी माझं संकल्पित कार्य पूर्ण केलं आहे. " परंतु मातृहत्येच्या आपल्या या भयंकर गुन्ह्याबद्दल आपल्याला शिक्षा ही भोगावीच लागणार हें त्याच्या ध्यानांत येऊन चुकलें. त्याचबरोबर त्याला वेड लागायची पाळी आली. आईच्या आत्म्यानें त्याचा पिच्छा पुरविण्यासाठीं फ्यूरीज या देवतांना त्याच्या अंगावर सोडलें. त्यांचा छळवाद चुकवितां चुकवितां त्याला पळतां भुई थोडी झाली.

फ्यूरीज या देवतांनीं ओरेस्टेसचा सतत पाठलाग चालू ठेवला. तो देशोदेशीं भटकत राहिला. तरी त्या त्याला सोडेनात. तो जिथें जाई तिथें त्या हजर होत. शेवटीं त्यानें एका देवळांत आसरा घेतला. परंतु तिथली पायथियन पुजारीण रागावली. या भयंकर फ्यूरीज देवतांनीं आपलें देऊळ बाटविलें अशी तिनें तक्रार केली. कारण त्या सगळ्या जणी ओरेस्टेसजवळच झोंपलेल्या होत्या. तेवढ्यांत ॲपोलो देव तेथें प्रगट झाला आणि त्यानें ओरेस्टेसला सांगितलें कीं " वत्सा, तूं कांहीं काळजी करूं नकोस. तुला थोडीशी तरी विश्रांति मिळावी म्हणून मीच त्या फ्यूरीज देवतांवर मोहनास्त्र सोडून त्यांना झोंपेची गुंगी आणलेली आहे. आतां तूं असं कर. इथून थेट अथेन्स नगराला जा. तिथें पाल्लास ॲथेना या देवतेच्या देवळांत जाऊन तिचं दर्शन घे. तिथं तुला तुझ्या गुन्ह्याबद्दल संपूर्ण माफी मिळेल. "

इकडे ओरेस्टेस देवाधिदेव ॲपोलोचें हें बोलणें ऐकत होता. तेवढ्यांत क्लिटेम्नेस्ट्राच्या आत्म्यानें दुष्ट बुद्धीनें फ्यूरीजनां जाग आणली आणि तिनें त्यांना पुन्हां ओरेस्टेसचा छळ चालू करण्याचा आदेश दिला. यावर ॲपोलोनें त्या फ्यूरीजनां तिथून निघून जा असें फर्माविलें. तेव्हां त्या फ्यूरीज खुद्द देवाधिदेव ॲपोलो याच्यावरच उलटल्या नि त्याला म्हणाल्या : " देवा, क्लिटेम्नेस्ट्रा व आयेगिस्थस यांच्या खुनाचा दोष तुमच्याकडेच येतो. आणि ओरेस्टेसला आम्ही त्याबद्दल ही जी शिक्षा देतों आहोंत, तिलाहि पर्यायानं तुम्हीच जबाबदार आहांत. "

मग देवाधिदेव ॲपोलो यानें कबूल केलें कीं, " होय. खरं आहे. मीच ॲगॅमेम्नॉनच्या मारेकऱ्यांना देहान्त शासन करण्याचा आदेश दिला होता. " फ्यूरीज उत्तरल्या : " देवा, तुम्ही हा असा आदेश दिला खरा, परंतु तुम्ही या आदेशापायीं पूर्वीच्या गुन्ह्यापेक्षांहि आणखी अधिक भयंकर असा गुन्हा घडवून आणलांत. तुम्ही ओरेस्टेसला मातृहत्येचं पातक करायला लावलंत. " शेवटीं ॲपोलोनें सांगितलें : " या प्रकरणांतला अखेरचा न्यायनिवाडा ॲथेना देवतेनं द्यावा. "

अथेन्स शहरीं ॲथेना देवतेच्या मंदिरांत ओरेस्टेस दाखल झाला आणि त्यानें त्या देवतेकडे मदतीची याचना केली. देवता उत्तरली : " या प्रकरणाचं

स्वरूप फार गंभीर आहे. मला एकटीला याचा न्यायनिवाडा करणं जमणार नाहीं." म्हणून तिनें आपल्याला शहाणपणाचा निर्णय देतां यावा यासाठीं न्यायाधीशांना मदतीकरतां पाचारण केलें. या न्यायाधीशांपैकीं कांहीं जणांचें असें मत पडलें कीं "या प्रकरणीं जर पुरावा सादर झाला तर आपल्या प्राचीन कायद्यांचा दबदबा कमी होईल. याऱ्यापेक्षां ओरेस्टेसनं आपल्याला मिळाली आहे तीच शिक्षा योग्य आहे असं समजून तीच मुकाट्यानं भोगावी हें अधिक बरं. प्राचीन कायद्यांच्या प्रतिष्ठेला उगाच एका माणसामुळें बाध यायला नको."

ओरेस्टेसनें विचारलें: "मग माझे वडील ॲगॅमेम्नॉन यांच्या खुनाबद्दल माझी आई क्लिटेम्नेस्ट्रा हिचा छळ कां नाहीं केला तुम्ही ?"

त्याला उत्तर मिळालें: "अरे, तिनं जरी नवऱ्याचा खून केला तरी नवऱ्याचं व तिचं रक्ताचं नातं नव्हतं. तुझी गोष्ट वेगळी आहे. तूं मातृहत्या केली आहेस. प्रत्यक्ष जिच्या पोटीं जन्म घेतलास, जिच्याशीं तुझं रक्ताचं नातं, त्या आपल्या आईचा तूं खून केला आहेस."

या खटल्यांत देवाधिदेव ॲपोल्लो हाहि एक साक्षीदार म्हणून हजर झाला. त्यानें असा युक्तिवाद केला: "आई ही खरी जन्मदात्री नव्हेच मुळीं. पति हाच खरा जन्मदाता असतो. कारण त्यानंच आईच्या गर्भाशयांत बीजारोपण केलेलं असतं. याच कारणास्तव आपण वंशावळ लावतांना पुरुष अपत्यांनाच प्राधान्य देतों. यावरून हें सिद्ध होतं कीं आपल्या रक्ताच्या नात्यांतल्या खऱ्या-खुऱ्या कुळबांधवाचा खून केल्याचा गुन्हा ओरेस्टेसवर शाबीतच होत नाहीं."

न्यायाधीशांनीं ओरेस्टेसला अनुकूल असा निवाडा दिला. परंतु जमलेल्या लोकांपैकीं पुष्कळांना हा निवाडा मुळींच पसंत पडला नाहीं. ज्या भूमीमध्यें अशा प्रकारचा न्यायनिवाडा चालतो, तिचा नायनाट होवो असा शाप या लोकांनीं संतापाच्या भरांत उच्चारला. प्रस्थापित परंपरेच्या हातून प्राचीन हक्क हिसकावून घेणाऱ्या लहान सहान देवांना व अशा बाकीच्या सगळ्या लोकांना त्यांनीं खूप शिव्याशाप दिले. परंतु ॲथेना देवतेनें कोर्टाचा निर्णयच मान्य केला आणि फ्यूरीज देवतांच्या संतापाच्या तावडींतून ओरेस्टेसला मुक्तता मिळाली.

# द ज्यू ऑफ माल्टा

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* ख्रिस्टॉफर मार्लो ( १५६४-१५९३ ). *कथानकाचा प्रकार :* अद्भुतरम्य शोकान्तिका. *काळ :* पंधरावें शतक. *स्थळ :* माल्टा ( भूमध्य समुद्रांतील बेट ). *पहिला प्रयोग :* १५८९.

*प्रमुख पात्रें :* **बाराबास,** एक यहुदी व्यापारी. **ॲबिगेल,** त्याची कन्या. **इथामोर,** एक गुलाम. **माल्टाचा गव्हर्नर.**

*समीक्षण :* ' द ज्यू ऑफ माल्टा ' या नाटकांत बाराबास हें पाताळयंत्री पात्र सबंध नाटकावर आपला प्रभाव पाडतें. इतर पात्रें केवळ आनुषंगिक ठरतात. नाटकाचें कथानक मार्लोच्या सुपीक डोक्यांतूनच सर्वस्वीं निर्माण झालेलें दिसतें. या नाटककाराचीं कृत्रिम कथानकें व त्यांतील अद्भुतरम्य नायक यांचा एक सांचाच तयार झाला आणि त्याबरहुकूम, मागाहून एलिझाबेथ राणीच्या काळीं पुढें आलेल्या शेक्स्पियरसकट सगळ्याच नाटककारांनीं आपलीं नाटकें रचलीं. ' द ज्यू ऑफ माल्टा ' या नाटकाचा प्रारंभ सुयंत्रितपणें होत असला तरी दुसऱ्या अंकानंतर त्याला रक्तरंजित हाणामारीची अवकळा प्राप्त झालेली आढळते.

*कथानक :* भूमध्य समुद्रांतील माल्टा बेटावर ख्रिस्ती लोकांचा द्वेष करणारा बाराबास नामक एक यहुदी व्यापारी आपली पेढी चालवीत होता. त्याच्या पेढीवर व्यापाऱ्यांचें एक शिष्टमंडळ आलें. त्यांनीं त्याला अशी बातमी दिली कीं पौर्वात्य देशांहून संपत्ति लादलेलीं कित्येक जहाजें माल्टा बंदरांत आलेलीं आहेत. त्याच वेळीं तिघे यहुदी इसम आले आणि त्यांनीं त्याला सांगितलें कीं माल्टा बेटांतल्या सेनेटची ( कायदेमंडळाची ) महत्त्वाची बैठक भरत आहे.

या बैठकीला महत्त्व येण्याचें कारण असें होतें कीं माल्टा बेटावर स्वामित्व गाजविणाऱ्या तुर्की धन्यांनीं पुष्कळ वर्षांपासून थकलेली खंडणीची बाकी ताबडतोब चुकती करण्याची मागणी केलेली होती. त्या खंडणीची वसुली तुर्की ग्रँड सेनियोरनें मुद्दामच अनेक वर्षे लांबणीवर टाकली, हेतु हा कीं आपल्याला या थकबाकीची मागणी एकदम करायला मिळावी म्हणजे माल्टाच्या नागरिकांना तेवढी रक्कम ताबडतोब उभी करणें अशक्यच व्हावें. अशा परिस्थितींत एक तर सगळी

रक्कम भरावी, नाहीं तर शरणागति पतकरावी येवढा एकच पर्याय माल्टानिवासी नागरिकांना उपलब्ध होता.

माल्टा बेटाच्या ख्रिस्ती गव्हर्नरनें ही खंडणी एक महिन्याच्या आंत जमा करण्याचा प्रयत्न चालविला. त्यासाठीं त्यानें असें फर्मान काढलें कीं बेटावरील सगळ्या यहुद्यांनीं या खंडणीपोटीं एक तर आपली अर्धी इस्टेट देऊन टाकावी, नाहीं तर खिस्ती धर्म स्वीकारावा. यहुदी जमातींतल्या सगळ्या लोकांनीं या नाहीं त्या रूपानें गव्हर्नरच्या या फर्मानापुढें मान तुकविली. अपवाद काय तो एकटा बाराबास तेवढाच निघाला. या अपराधाबद्दल गव्हर्नरनें शिक्षा म्हणून बाराबासची सगळी संपत्ति जप्त केली आणि त्या यहुद्याचें घरहि जप्त करून तिथें एक खिस्ती मठ चालू केला.

बाराबास तसा पक्का होता. त्यानें सर्वनाश चुकविण्यासाठीं आपल्या संपत्तीच्या कांहीं भागाचा ठावठिकाणा जाणूनबुजून गव्हर्नरला लागूच दिला नाहीं. ही संपत्ति त्यानें आपल्या घराच्या पायामध्यें पुरून ठेवलेली होती. मग त्यानें आपली कन्या ॲबिगेल हिला सांगितलें : “ बेटी, तूं आतां असं कर. तूं आपण खिस्ती धर्माचा स्वीकार केल्याची बतावणी कर. म्हणजे तुला मठांत दाखल व्हायच्या सबबीवर आपल्या घरांत प्रवेश मिळेल आणि तिथून तूं आपली संपत्ति बाहेर आणून माझ्या हवालीं कर. ” ॲबिगेलनें वडिलांची आज्ञा शिरसावंद्य मानून खिस्ती धर्म स्वीकारला. ती जोगीण झाली. तिनें रात्रीच्या वेळीं पूर्वसंकेतानुसार द्रव्याच्या थैल्या खिडकींतून बाहेर फेंकून दिल्या आणि बाहेर वाट बघत असलेल्या तिच्या वडिलांनीं त्या थैल्या उचलून नेल्या.

पुढें स्पेन देशाचा दुय्यम दर्यासारंग मार्टिन डेल बॉस्को हा आपलें जहाज घेऊन माल्टा बंदरांत आला. त्यानें आपल्या जहाजांतून कांहीं तुर्की गुलाम आणलेले होते. ते त्याला या बंदरांत विकायचे होते. परंतु गव्हर्नर या व्यवहाराला परवानगी द्यायला तयार होईना. कारण तुर्की ग्रँड सेनियोरबरोबर त्याची खंडणी-वसुलीबाबतची कटकट चालूच होती. तेव्हां डेल बॉस्को म्हणाला : “ तुम्ही तुर्कांची भीति कशाला बाळगतां ? स्पेन तुम्हांला जरूर असल्यास हवी तेवढी लष्करी मदत देईल. तुम्ही तुर्कांना बिलकुल जुमानूं नका. हे तुर्की गुलाम तुम्ही बिनधोकपणानं विकत घ्यायला आपल्या नागरिकांना परवानगी द्या. ” त्याचें

हें म्हणणें गव्हर्नरनें मान्य केलें आणि तुर्की गुलामांच्या विक्रीला मोकळीक दिली.

बाराबासनें या गुलामांपैकीं एक गुलाम खरेदी केला. तो अरब होता. त्याचें नांव इथामोर. गुलामविक्री-खरेदीचा हा व्यवहार चालू असतांना बाराबासनें गव्हर्नरचा मुलगा डॉन लोडोविक आणि दुसरा एक तरुण डॉन माथियास या दोघांपुढें गोंडा घोळून त्यांची खूप खुशामत केली. या दोघां तरुणांना त्यानें आपल्या घरीं बोलावलें. मठांतला कार्यभाग उरकल्यामुळें त्याची कन्या आतां घरीं परत आलेली होतीच. तिला त्यानें या दोघांवरहि एकदम प्रेम करण्याची आज्ञा केली. बाराबास ख्रिस्ती गव्हर्नरचा सूड घेण्याचें जें कारस्थान रचीत होता. त्याचाच एक भाग म्हणजे हें बनावट प्रेमप्रकरण होतें. मग बाराबासनें या दोघां तरुणांपैकीं प्रत्येकाला अलग अलग गांठून एकेकाशीं आपल्या मुलीचें लग्न ठरवून टाकलें. नंतर त्यानें डॉन लोडोविक व डॉन माथियास यांना बनावट पत्रें धाडलीं आणि दोघांना एकमेकांविरुद्ध द्वंद्व युद्धाची चिथावणी दिली. दोघेहि बिचारे या बनवाबनवीनें चांगलेच फसले आणि द्वंद्व युद्धाला तयार झाले आणि या द्वंद्व युद्धांत हे दोघेहि तरुण एकमेकांकडून ठार मारले गेले.

राहतां राहिला माल्टा बेटाचा ख्रिस्ती गव्हर्नर. त्याचा निकाल लावण्यासाठीं बाराबासनें आतां नवें कारस्थान आरंभलें. या कारस्थानांत त्यानें आपला गुलाम इथामोर याला आपला हस्तक म्हणून शिकवून तयार केलें.

वडिलांच्या या नीच कारवाया ॲबिगेल हिला बघवेनात. ती घर सोडून परत मठांत राहायला गेली. बाराबासला तिचाहि खूप राग आला. त्यानें तिच्यासकट सगळ्या मठवासी जोगिणींचा निकाल लावण्याचा लगेच बंदोबस्त केला. माल्टा बेटाचा अधिष्ठाता संत सेंट जेक्स याच्या पुण्यतिथि-उत्सवाच्या आदल्या रात्रीं त्यानें संताच्या उपकारांबद्दल आभार प्रदर्शन म्हणून सगळ्यांना पुरेल येवढी खीर मठवासीयांना मिठाई वांटण्याच्या मिषानें धाडून दिली. या खिरींत त्यानें जलाल विष मिसळलेलें होतें. सगळ्या मठवासी जोगिणी ही खीर खाऊन गतप्राण झाल्या. ॲबिगेलनें मरतां मरतां फ्रायर जाकोमो या फ्रायर-पंथीय साधूजवळ आपल्या पापांचा कबुलीजबाब दिला. त्यांत तिनें बाराबासच्या आतांपर्यंतच्या सगळ्या कृष्णकृत्यांचा पाढा वाचला आणि त्याचे पुढील बेतहि सगळे उघड करून सांगून टाकले.

खंडणी वसूल करायला ठरल्यावेळीं तुर्की अधिकारी माल्टा बेटावर आले. गव्हर्नरनें त्यांना धुडकावून लावलें. बेटाला वेढा पडणार म्हणून तुर्कांच्या मुकाबल्याची त्यानें जय्यत तयारी आरंभली.

दरम्यान फ्रायरपंथीय साधूंनीं सगळ्या धर्मांशा गुंडाळून ठेवल्या आणि ॲबिगेलकडून तिच्या मृत्यूपूर्वी मिळालेल्या कबुलीजबाबांतील सगळी माहिती जाहीर करून टाकली. बाराबास पुन्हां पेंचांत आला. त्यानें लगेच पगडी फिरविली आणि आपण ख्रिस्ती धर्म स्वीकारण्यास तयार आहोंत अशी बतावणी केली आणि आपली सगळी ऐहिक संपत्ति आपल्याला ख्रिस्ती धर्माची दीक्षा देणाऱ्या फ्रायरपंथीयांमध्यें वांटून टाकण्याचें अभिवचन दिलें. फ्रायरपंथीयांचा लोभीपणा जागृत झाला. त्यांच्यांत संपत्तीच्या वांटणीवरून मतभेद माजले. बाराब्रासनें या परिस्थितीचा फायदा घेतला. त्यानें आपला गुलाम इथामोर याच्या करवीं बर्नार्डिन या फ्रायरचा गळा दाबून प्राण घेवविला. मग त्यानें बर्नार्डिनचें शव अशा रीतीनें बसवून ठेवविलें कीं फ्रायर जाकोमोचा त्याला नेमका धक्का लागावा. त्याप्रमाणेंच झालें. धक्का लागलेला ज्यांनीं बघितला त्यांनीं आगाऊ ठरविलेल्या बेताप्रमाणें फ्रायर जाकोमोवर आपल्याच पंथांतल्या एका बांधवाचा खून केल्याचा आरोप ठेवला.

इकडे इथामोर या गुलामाची बेल्लामारा नामक रखेलीशीं दोस्ती जमली. तिनें या गुलामाच्या स्वाभिमानाचें व दुष्टपणाचें भांडवल केलें आणि त्याला आपल्याकडे वळवून घेतला. आपला धनी बाराबास याचीं बिंगें फोडण्याची धमकी देऊन त्याच्याकडून पैसे उकळायला तिनें इथामोरला प्रवृत्त केलें. आपलें बिंग उघडकीस आणण्याच्या या धमक्यांनीं बाराबास चांगलाच घाबरला, त्यानें एका फ्रेंच संगीतकाराचें सोंग घेऊन त्या रखेलीच्या घरीं पायधूळ झाडली. आणि हातांतल्या विषारी पुष्पगुच्छानें बेल्लामारा व इथामोर या दोघांवर विष-प्रयोग केला आणि आपल्या मार्गांतले हे दोन कांटे कायमचे काढून टाकले.

मरणापूर्वी कांहीं तरी युक्तिप्रयुक्ति करून या दोघांनीं आपल्याजवळची सगळी बाराबासविषयींची माहिती कशीबशी गव्हर्नरला कळवून ठेवली. गव्हर्नर माल्टा बेटाची तटबंदी मजबूत करण्याच्या कामांत पूर्णपणें गढून गेला असतांना सुद्धां त्यानें हें सगळें कळतांक्षणीं बाराबासला तुरुंगांत टाकलें.

पण बाराबास कसला वस्ताद ! त्यानें अफूच्या बोंडांचा काढा व मँड्रेक

( लक्ष्मणा ) वनस्पतीचा थंडगार रस सेवन करायला सुरवात केली. त्याबरोबर तो मृतासारखा निश्चेष्ट पडूं लागला. तो मेलाच आहे असें समजून त्याचें निश्चेष्ट शरीर तुरुंगांतून उचलून शहराच्या वेशीबाहेर ठेवून देण्यांत आलें. बाराबास पुन्हां शुद्धीवर आला आणि सरळ तुर्कांना जाऊन मिळाला. त्यांना त्यानें चोरवाटा दाखविल्या. तुर्कांची फौज शहरांत शिरली. माल्टाच्या नागरिकांशीं दगलबाजी केल्याचें बक्षीस म्हणून तुर्कांनीं बाराबास यालाच माल्टाचें गव्हर्नरपद बहाल केलें. मग त्यानें पराभूत माल्टानिवासी नागरिकांची बाजू घेतली. आपल्याला भरपूर द्रव्य मिळाल्यास आपण तुर्कांना कैद करून तुमच्या स्वाधीन करूं असें त्यानें नागरिकांना सांगितलें.

बाराबासच्या देखरेखीखालीं तुर्की लष्कराच्या बराकींखालीं सुरुंगाची दारू ठांसून भरण्यांत आली. मग बाराबासनें तुर्की नेत्यांना गव्हर्नरच्या राजवाड्यांत थाटाच्या मेजवानीसाठीं निमंत्रण दिलें. वरच्या मजल्यावर मेजवानीची व्यवस्था केली होती आणि तळमजल्यावर मोठमोठ्या काहिलींतून पाणी, तेल, असले द्रव पदार्थ उकळत ठेवलेले होते. नेमक्या या काहिलींच्या वरचा मजल्याचा जमिनीचा भाग पोकळ ठेवून त्यावर वरपांगीं जमीन दिसेल अशी तरतूद करून ठेवलेली होती. या भागांतून तुर्की नेते चालत गेले कीं ते नेमके खालच्या काहिलींत पडून उकळून निघावेत अशी त्यांच्या पाहुणचाराची खाशी व्यवस्था बाराबासनें केलेली होती. ठराविक इशारा होतांच सुरुंग उडाले व तुर्की फौजेच्या या स्फोटांत ठिकऱ्या ठिकऱ्या उडाल्या. परंतु ख्रिस्ती गव्हर्नरनें तुर्की नेत्यांना जिवंत पकडण्याचा मनसुबा रचलेला होता. म्हणून त्यानें बाराबासच्या योजनेचा गौप्यस्फोट करून टाकला आणि तुर्की नेत्यांसाठीं लावलेल्या सांपळ्यांत खुद्द बाराबासलाच ढकलून देऊन माल्टाच्या ज्यूला अशा प्रकारें उकळत्या कढईत हालहाल होऊन मरायला लावलें.

## जस्टिस : न्याय

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* जॉन गाल्सवर्दी ( १८६७-१९३३ ). *कथानकाचा प्रकार :* सामाजिक टीका. *काळ :* १९१०. *स्थळ :* लंडन. *पाहिला प्रयोग :* १९१०.

*प्रमुख पात्रें :* **विल्यम फाल्डर**, एका सॉलिसिटरच्या कचेरींतील कारकून.

कोकसन, त्याच्यापेक्षां वरिष्ठ दर्जाचा कारकून. रुथ हनीविल, हिच्याबर फाल्डरचें प्रेम आहे.

*समीक्षण :* १९१० सालीं हें नाटक लिहिलें गेलें, तेव्हांपासून तुरुंगाच्या परिस्थितींत सुधारणा करण्याच्या बाबतींत खूपच प्रगति झालेली आहे. हें नाटक म्हणजे माणुसकीला पारख्या झालेल्या कायदेबाजीविरुद्ध निषेधप्रदर्शन आहे. एकांतवासाची शिक्षा व पोलिसांकडे हजेरी देण्याची कडक पद्धति असल्या शिक्षांविरुद्ध या नाटकानें विशेष कटाक्षानें निषेध नोंदविलेला आहे. शिक्षा झालेल्या माणसाला पुन्हां समाजोपयोगी नागरिकाचें जीवन जगण्याला लायक करण्याचा प्रश्न म्हणजे फारच गुंतागुंतीचा प्रश्न. अशा माणसाशीं संबंध आलेले सगळे लोक आपल्या वांट्याला आलेला जबाबदारीचा हिस्सा मान्य करून त्याप्रमाणें वागले तरच असा माणूस पुन्हां माणसांत येण्याचा संभव आहे अशी या बाबतींतली गाल्सवर्दीची धारणा या नाटकांत स्पष्ट स्वरूपांत दिसून येते.

*कथानक :* जेम्स अँड वॉल्टर हाऊ, सॉलिसिटर्स, या कंपनीचा मॅनेजिंग ( वरिष्ठ दर्जाचा ) कारकून आपल्या कचेरीच्या कामांत गढून गेलेला होता. ती जुलै महिन्यांतली सकाळची वेळ होती. तेवढ्यांत एका बाईनें त्याच्या कामांत व्यत्यय आणला. त्याच्या हाताखालचा कारकून फाल्डर याला भेटायला मिळेल का असें ती विचारत होती. त्या बाईचें नांव रुथ हनीविल. ती बरीच संकटग्रस्त दिसली. तिनें अशी भेट मागणें हें कचेरीच्या नियमांमध्यें बसत नव्हतें तरी देखील कोकसननें तिला फाल्डरची भेट घ्यायला परवानगी दिली.

फाल्डर आणि रुथ हनीविल हीं दोघें मिळून कुठें तरी पळून जायचा बेत करीत होतीं. रुथचे पतिराज म्हणजे एक दारुडा पशू होता. त्यानें तिला इतक्या शिव्या दिल्या कीं शेवटीं तिनें त्याच्याकडे अतःपर मुळींच राहायचें नाहीं असें ठरवून टाकलें. फाल्डरनें अशी व्यवस्था करून ठेवली कीं रुथनें आपल्या दोन मुलांना बरोबर घेऊन त्या रात्रीं रेल्वे स्टेशनावर फाल्डरला येऊन भेटावें. रुथ निघून गेली आणि फाल्डर परत आपल्या कामावर हजर झाला.

तरुण वॉल्टर हाऊ आपल्या कंपनीच्या कार्यालयांत आला. या तरुण गृहस्थाची मनीषा अशी होती कीं आपल्या कंपनीनें नुसतें कायद्याचें पालन करावें येवढेंच नव्हे तर नीतीचेंहि पालन करावें. त्याची ही इच्छा कशी काय फलद्रूप होणार याबद्दल वरिष्ठ कारकून कोकसन बराचसा साशंक होता. दोघांची या

विषयावर चर्चा चाललेली होती, येवढ्यांत जेम्स हाऊ हा ज्येष्ठ भागीदार आपल्या खास खोलींतून बाहेर आला. कंपनीची त्या दिवसाची रोकड तो आणि वॉल्टर हे दोघे मिळून मोजायला लागले. ही रोकड त्यांच्या आठवणीप्रमाणें जेवढी असायला पाहिजे होती तिच्यापेक्षां कमी भरली अशी त्यांची खातरजमा झाली. मग त्यांना असा पत्ता लागला कीं आदल्या शुक्रवारीं जो एक चेक लिहून ठेवलेला होता त्यांतला नऊ पौंडांचा आंकडा फिरवून तो नव्वद पौंडांचा केलेला आहे.

तो चेक ज्या दिवशीं वटविला, त्याच दिवशीं कंपनीचा आणखी एक दुय्यम कारकून डेव्हीज हा कंपनीच्या कसल्या तरी कामासाठीं कुठें तरी बाहेरगांवीं गेलेला होता. या फिरवाफिरवीशीं कोकसनचा कांहीं एक संबंध नाहीं याचा उलगडा चटकन झाला. मग असें निश्चितपणें प्रस्थापित झालें कीं चेकच्या आंकड्यामध्यें झालेली फिरवाफिरव ही डेव्हीज बाहेरगांवच्या दौऱ्यावर निघाल्यानंतरच्या तारखेला झाली. म्हणून मग या प्रकरणीं फाल्डरवर संशय आला.

मग बँकेच्या कॅशियरला बोलावणें गेलें. त्यानें चेक वटवायला आलेला माणूस म्हणून फाल्डरला ओळखलें. कंपनीचे थोरले भागीदार जेम्स हाऊ यांनीं फाल्डरवर स्वामिद्रोहाचा आरोप केला. फाल्डरनें दयेची याचना केली. परंतु हा स्वामिद्रोह पूर्वनियोजित असल्याबद्दल हाऊसाहेबांची खात्री पटलेली होती. त्यांनीं दयामाया करण्याचें साफ नाकारलें. त्यांनीं पोलिसच बोलावले. फाल्डरला अटक झाली.

पुढें कोर्टांत खटला उभा राहिला. फाल्डरचा वकील फ्रोम कोर्टाला उद्देशून म्हणाला : "मॅजिस्ट्रेटसाहेब, आपण एक गोष्ट लक्षांत घ्यावी. माझ्या अशिलाला हा सगळा बेत सुचणं आणि त्याची त्यानं अंमलबजावणी करणं या एकंदर प्रकाराला अवघ्या चार मिनिटांपेक्षां अधिक अवधि लागलेला नाहीं. इतकं हें सगळं अगदीं घाईघाईत त्यानं उरकलं. आणि त्या वेळीं रुथ हनीविलवर तिच्या यजमानांनीं आणलेल्या घोर प्रसंगाचा त्याच्या मनावर भयंकर परिणाम झालेला होता हेंहि लक्षांत घेतलं पाहिजे."

फ्रोमनें पहिला साक्षीदार म्हणून कोकसन याला पाचारण केलें. कोकसननें कोर्टाची अशी समजूत करून दिली कीं चेकवरच्या आंकड्यांतील फिरवाफिरवीचा हा प्रकार घडला त्या दिवशीं फाल्डरची मनःस्थिति ठिकाणावर नव्हती.

रुथ हनीविल ही या खटल्यांतली सगळ्यांत महत्त्वाची साक्षीदार. तिनें

असें दर्शविलें कीं "फाल्डरनें केवळ माझ्यासाठीं चेकवरच्या रकमेंत फिरवा-फिरव केली."

सरकारी वकील क्लीव्हर यानें रुथ ही कर्तव्यच्युत पत्नी आहे असें तिचें स्वभावचित्र दर्शविण्यासाठीं प्रयत्नाची शिकस्त केली.

फाल्डरचा बचाव करण्यासाठीं फ्रोमनें तो जबळ जवळ बेशुद्धींतच होता या मुद्यावर खूप जोर देण्याचा प्रयत्न केला. फाल्डरची उलटतपासणी घेतांना क्लीव्हरनें त्याला याबाबत प्रश्न विचारून विचारून भंडावून सोडलें तेव्हां शेवटीं त्यानें कबूल केलें कीं आपण त्या वेळीं काय करीत होतों हें आपलें आपल्यालाच कळत नव्हतें.

मग सरकारी वकील क्लीव्हर म्हणाला : "आरोपी फाल्डर याला सारं कांहीं कळत होतं. चोरलेले पैसे सांभाळून ठेवण्याइतकं तर त्याला कळत होतंच. इतकंच नव्हे, तर मूळ चेक जेवढ्या रकमेचा होता, तेवढी रक्कम आपल्या कचेरींत आणून भरण्याचंहि अवधान त्याला होतंच."

ज्यूरीनें फाल्डरला दोषी ठरविलें. आणि न्यायाधिशानें त्याला तीन वर्षें तुरुंगवासाची शिक्षा ठोठावली.

नाताळाच्या वेळीं कोकसन तुरुंगांत फाल्डरच्या वतीनें रदबदली करायला गेला. फाल्डरची एकांतवासाच्या शिक्षेंतून सुटका व्हावी म्हणून त्यानें प्रयत्न केला. रुथ हनीविल हिला आणून फाल्डरची व तिची भेट घडविण्याला त्यानें तुरुंगाच्या अधिकाऱ्यांची परवानगी मागितली. कोकसनच्या या खटपटीला कांहीं एक फळ आलें नाहीं. तुरुंगांतला धर्मोपदेशक आणि तुरुंगाचा गव्हर्नर या दोघांनींहि त्याच्या अर्जविनंत्यांच्या बाबतींत अगदीं बेपर्वाईची वृत्ति ठेवली.

शेवटीं फाल्डर एकदांचा पॅरोलवर सुटून आला. रुथ त्याच्या वतीनें रदबदली करायला सॉलिसिटर हाऊ यांच्या कचेरींत गेली. तिनें सांगितलें कीं "माझ्या यजमानांना मी सोडून दिल्यानंतर मी दुसऱ्याच एका गृहस्थाकडे राहून माझे व माझ्या मुलांचे प्राण कसेबसे जिवंत ठेवले आहेत."

कोकसनला भेटायला फाल्डर गेला. त्यानें कोकसनला सांगितलें : "माझे नातेवाईक मला कॅनडाला जाण्यासाठीं पैसे द्यायला तयार आहेत. माझं मन उद्विग्न झालंय. मला एकसारखं अस्वस्थ वाटतं. पॅरोलवर सुटल्यानंतर मी रुथला फक्त एकदांच भेटलों."

जेम्स हाऊ यांनीं स्पष्ट शब्दांत सांगून टाकलें कीं न्यायदेवतेच्या आदेशांचें कांटेकोरपणानें पालन करायला फाल्डर जर नकार देत असेल तर कंपनी त्याला परत कामावर घेईल ही आशा त्यानें मुळींच धरूं नये.

रुथ हनीविल अन्य पुरुषाकडे राहत आहे हें जेम्स हाऊ यांना माहीत होतें. परंतु त्यांनीं मागचा पुढचा कांहीं एक विचार न करतां ही बातमी फाल्डरला सांगून टाकली. तथापि त्यांनीं फाल्डर आणि रुथ यांना या आपल्या नाजुक अवस्थेबाबत एकमेकांशीं बोलणें करायची संधि मिळवून दिली.

तीं दोघें एका बाजूला खोलींत बसलीं होतीं, येवढ्यांत एक सी. आय. डी. चा हवालदार फाल्डरचा शोध करीत तिथें येऊन ठेपला. पॅरोलच्या करारा-प्रमाणें फाल्डरनें पॅरोलच्या मुदतींत ठराविक वेळीं पोलीस ठाण्यावर जाऊन हजेरी देण्यांत कुचराई केली म्हणून फाल्डरला पुन्हां अटक करण्यासाठीं वारंट सुटलेलें होतें.

फाल्डर कुठें आहे याची बातमी देण्यास हाऊ आणि कोकसन या दोघांनींहि साफ नकार दिला. परंतु फाल्डर बाजूच्या खोलींत असल्याचा हवालदाराला पत्ता लागलाच. हवालदार फाल्डरला पुन्हां अटक करीत होता, येवढ्यांत फाल्डर अचानक झटका मारून त्याच्या तावडींतून सुटला आणि कचेरीच्या खिडकींतून खालीं उडी घेऊन त्यानें आत्महत्या केली.

## द नाइट्स : गुलामांचें "शौर्य"

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* ॲरिस्टोफेनीस ( इ. स. पूर्वी ४४८-३८५ ). *कथानकाचा प्रकार :* राजकीय उपहासिका. *काळ :* इ. स. पूर्वी पांचवें शतक. *स्थळ :* अथेन्स. *पहिला प्रयोग :* इ. स. पूर्वी ४२४.

*प्रमुख पात्रें :* **डेमुस**, गुलामांचा धनी—अथेन्सनिवासी जनतेचा मूर्तिमंत अवतार. **डेमॉस्थेनीस**, डेमुस याचा गुलाम. **निसियास**, दुसरा गुलाम. **क्लेऑन द पाफ्लागोनियन**, मालकाचा आवडता गुलाम आणि अथेन्सनिवासी जुलुमशहाचा मूर्तिमंत अवतार. कबाब विकणारा एक फेरीवाला, मागाहून हाच **ॲगोरॅक्रिटस** हें नांव धारण करतो.

*समीक्षण :* इ. स. पूर्वी ४२६ सालीं अथेन्सचा जुलुमशहा क्लेऑन यानें नाटककार ॲरिस्टोफेनीस याजवर असा आरोप केला कीं "आपल्या नागरिक-

त्याच्या खास हक्कांचा तूं लबाडीनं उपयोग करतो आहेत." या प्रकारानंतर दोन वर्षांनीं सादर केलेल्या या नाटकांत नाटककारानें आपल्या जबरदस्त शत्रूवर टीकेचा हल्ला चढवून त्याची टर उडविली. हा शत्रु आपल्या धन्यासमोर लाळघोटेपणा करणारा गुलाम असून आपल्या गुलाम बांधवांशीं मात्र उर्मटपणानें व मग्रुरीनें वागतो असें त्याचें स्वभावचित्र त्यानें या नाटकांत सादर केलेलें आहे. राजकीय उपहासिका या नात्यानें हें नाटक म्हणजे खोंचकता व योजकता यांचें उत्तम उदाहरण म्हणतां येईल. या नाटकाच्या द्वारां ॲरिस्टोफेनीसनें दिलेला संदेश असा : जोंपर्यंत माणसें आपल्या नाकाच्या पलीकडे पाहायला तयार होत नाहींत तोंपर्यंत तीं एकमेकांना कमीच लेखत राहणार, आणि त्याचबरोबर, आपण असें करतांना आपलें स्वतःचें वजन जास्तींत जास्त घटवीत आहोंत हें त्यांच्या कधींहि ध्यानांत येणार नाहीं.

*कथानक :* डेमुस हा स्वार्थी व चिडखोर म्हातारा माणूस होता. तो आपल्या गुलामांचा कर्दनकाळ होता. त्यानें कातडी कमावण्याचें काम करणारा एक गुलाम खरेदी केला. त्याला त्यानें पाफ्लागोनियन असें टोपणनांव दिलें. हा गुलाम महा लाळघोट्या, लबाड, कोल्ह्याच्या वृत्तीचा होता. त्यानें लगेच आपल्या नव्या धन्याची मर्जी संपादन करून घेतली. डेमुसच्या घरांतल्या इतर सगळ्या गुलामांनीं त्याची ही चलाखी पाहिली आणि ते अगदीं थक्क होऊन गेले. त्यांतल्या त्यांत डेमॉस्थेनीस व निसियास या दोघांच्या विस्मयाला तर पारावारच राहिला नाहीं. या पाफ्लागोनियननें वाटेल तितकें खोटेंनाटें सांगावें आणि त्याच्या पायीं डेमॉस्थेनीस व निसियास यांना अनेकदां फटके खावे लागावेत, असा प्रकार एकसारखा होऊं लागला.

त्या दोघांनीं मिळून एकदां तर असा बेत केला कीं या मालकाच्या हातांवर तुरी देऊन पळून जावें. पण मागाहून त्यांनीं हा बेत अंमलांत आणायचा नाहीं असा निर्णय घेतला. कारण आपण जर पकडले गेलों व पुन्हां आपल्याला आपल्या मालकांच्या स्वाधीन करण्यांत आलें तर आपल्याला फारच भयंकर शिक्षा भोगावी लागेल. या हालअपेष्टांतून सुटण्यासाठीं आत्महत्या करावी असाहि विचार त्यांच्या मनांत आला. परंतु शेवटीं त्यांनीं असें ठरविलें कीं दारूच्या व्यसनांत दंग होऊन आपण आपल्या सगळ्या दुःखांचा विसर पडूं द्यावा. अशा प्रकारें एके दिवशीं निसियास दारू प्यायला म्हणून गेला, तेव्हां तिथें पाफ्लागोनियन दारूच्या

धुंदींत झोंपीं गेलेला त्याला आढळला.

पाफ्लागोनियनच्या बेहोष अवस्थेचा फायदा घ्यायचें निसियासनें ठरविलें. देवदेवतांच्या भविष्यकथनाचे पवित्र लेख पाफ्लागोनियननें अतिशय काळजीपूर्वक सांभाळून ठेवलेले होते. हे लेख तो झोंपेंत असल्याचा फायदा घेऊन निसियासनें चोरले. मग डेमॉस्थेनीस व निसियास या दोघांनीं त्या पवित्र लेखांचें चोरून वाचन केलें. या लेखांमध्यें देवदेवतांनीं वर्तविलेलीं अनेक भविष्यें त्यांना वाचायला मिळालीं. तीं भविष्यें अशीं होतीं : राज्याचा कारभार पहिल्याप्रथम काथ्या विकणाऱ्या फेरीवाल्याच्या हातीं जायचा आहे. त्याच्यानंतर मेंढरें विकणारा राज्य करणार आहे. आणि मग त्याच्या पाठोपाठ कातडीं कमावणारा माणूस राज्यावर येणार आहे. शेवटीं एक कबाब-विक्या पुढें सरसावेल आणि कातडीं कमावणाराचें राज्य उलथून पाडून आपल्या हातीं सगळी सत्ता घेईल.

असा एखादा कबाब-विक्या सांपडतो का बघावा म्हणून हे दोघे त्याच्या शोधार्थ निघायच्या बेतांत होते. तेवढ्यांत खाटकाकडे राहून हा धंदा करणारा एक गुलाम आपला माल विकण्यासाठीं डेमुसच्या घरीं आला. निसियास व डेमॉस्थेनीस या दोघांनीं त्याला विश्वासांत घेतलें. त्यांनीं त्याला लवकरच आपलासा करून टाकला. त्यांनीं त्याची बेसुमार खुशामत केली. त्यांनीं त्याला असें आश्वासन दिलें कीं मूर्खपणा व अडाणीपणा या तुझ्या अंगच्या दोन गुणांच्या योगानें तूं सार्वजनिक जीवनाला अगदीं सर्वस्वी लायक ठरलेला आहेस ; सार्वजनिक कार्यकर्ता या सदरामध्यें तूं या दोन गुणांमुळें एकदम फिट्ट बसतोस.

हें सगळें कारस्थान शिजून तयार झालें असेल नसेल येवढ्यांत पाफ्लागोनियन जागा झाला. जागा झाल्याबरोबर त्याला कळून आलें, कीं आपण जतन करून ठेवलेले भविष्यकथनपर पवित्र लेख जाग्यावर नाहींत. लगेच त्यानें मोठमोठ्यानें ओरडाआरडा करून हे लेख परत मागितले. पण आतां तो कबाब-विक्या त्याला शेरास सव्वाशेर भेटला. त्यानें त्याच्याहिपेक्षां मोठ्यानें ओरडून त्याला उलट दरडावलें. बघ्यांची गर्दी जमली. कांहीं नागरिकांनीं कबाब-विक्याची बाजू घेतली. त्यांनीं पाफ्लागोनियन याला खडसावलें आणि त्या कबाब-विक्यावर अन्याय्य आरोप केल्याबद्दल त्याचा निषेध केला. इतरांनीं असा अभिप्राय दिला कीं ही बेशरम शिवीगाळ अशीच चालू राहिली तर अथेन्स राज्याची वाताहत होऊन जाईल, किंबहुना अशी वाताहत व्हायला

लागलेलीच आहे.

इतर कांहीं नागरिक म्हणाले : "अरे पाफ्लागोनियन, तूं हें चालवलं आहेस तरी काय? तुझ्या या ओरड्याआरड्यानं सगळ्या अथेन्स नगरीच्या कानठळ्या बसल्या तरी तुझा आपला घोष चालूच!" कबाब-विक्या म्हणाला : "ए पाफ्लागोनियन, तूं सगळ्या लोकांना फसवलं आहेस." या कबाब-विक्याच्या रूपानें पाफ्लागोनियनपेक्षांहि अधिक उर्मट आणि अधिक अप्रामाणिक असा कुणी तरी भेटला एकदांचा, याबद्दल कांहीं नागरिकांना तर इतका आनंद झाला कीं तो त्यांच्या पोटांत मावेना. याच्या उलट आणखी कांहीं जणांना अशी धास्ती वाटूं लागली कीं हा नवा भाषणबहाद्दर अथेन्स नगरीला तिच्या शत्रूपासून वांचविण्याच्या सगळ्या आशा धुळीला मिळवून टाकील.

इकडे नागरिकांचें निषेधप्रदर्शन जोरजोरांत चालूच राहिलें आणि त्याच वेळीं तो कबाब-विक्या आणि पाफ्लागोनियन या दोघांनीं बढाया मारण्यांत, ओरडाआरडा करण्यांत व भाषणबहाद्दरी करण्यांत एकमेकांवर कुरघोडी चालूच ठेवली. कबाब-विक्या म्हणाला : "ए, कातडीं कमावणाऱ्या ढोरा, ए पाफ्लागोनियन, मी तुझा खिमा करून तुझ्या मांसाचे लाडू बनवीन! काय समजलास तूं!" डेमुसच्या लाडावलेल्या गुलामानें यावर त्या कबाब-विक्याला धमकी दिली : "ए, तुझ्या दोन्ही डोळ्यांच्या पापण्यांचे केस उपटून काढीन मीं! तूं मला असा तसा नकोस समजूं!" तेव्हां डेमॉस्थेनीस पुढें सरसावला आणि मध्यें तोंड घालून कबाब-विक्याला म्हणाला : "अरे, तूं डुक्कर कापायच्या अगोदर तें तपासून बघतोस ना? तशी या पाफ्लागोनियनचा खिमा करायच्या अगोदर याची तूं नीट तपासणी करून घे!"

शेवटीं तो ढोर नि तो कबाब-विक्या असे दोघेहि गुलाम डेमुसला मोठ-मोठ्यानें हांका मारूं लागले. ते म्हणाले : "धनीसाहेब, घरांतून बाहेर या, आणि आम्हां दोघांपैकीं श्रेष्ठ कोण याचा निवाडा द्या." डेमुस त्यांच्या हांकेला ओ देऊन बाहेर आला. त्याबरोबर दोघांनींहि चढाओढीनें बढाया मारायला सुरवात केली आणि आपण तुमची सेवा जास्त भक्तिभावानें करूं असें दोघांनींहि अहमहमिकेनें सांगितलें. मग डेमुसनें ठरविलें कीं पाफ्लागोनियनला अधिकारपदा-वरून काढून टाकायचें. आणि पूर्वी आपल्या मर्जीत असलेल्या पण आतां मर्जीतून उतरलेल्या त्या गुलामाजवळून त्यानें आपली अधिकारपदाची मुद्रा

परत मागितली. तेव्हां दोघेहि गुलाम डेमुसची कृपा संपादन करण्यासाठीं त्याला चढाओढीनें लांच देऊं लागले. या सर्वांवर कळस चढविण्यासाठीं म्हणून कीं काय, त्या दोघांहि गुलामांनीं आपापला दावा डेमुससमोर खरा करून दाखविण्यासाठीं देवदेवतांकडे कौल मागायला धांव घेतली.

देवदेवतांचे कौल म्हणून भविष्यकथन करणाऱ्या लेखांचे मोठमोठे भारे घेऊन दोघेहि परत आले आणि आपापले भविष्यलेख आपण मोठ्यानें वाचून दाखवूं आणि ते डेमुसनें ऐकावेत म्हणून दोघेहि त्याला गळ घालूं लागले. या भविष्यलेखांमध्येंहि दोघांचे एकमेकांवर आरोप प्रत्यारोप व शिव्याशाप चालूच होते आणि त्याचबरोबर डेमुसवर या लेखांमधून दोघांनीं चढाओढीनें स्तुतिवर्षाव चालविलेला होता. कबाब-विक्या वाचून सांगूं लागला : "डेमुससाहेब, मला एक स्वप्न पडलं. त्यांत देवी ॲथेना ही ऑलिम्पस पर्वतावरून उतरून खालीं आलेली मला दिसली आणि तिनं आपल्या डोक्यावर अमृताचे घट रिते केलेले मी पाहिले आणि या ढोराच्या टाळक्यावर तिनं आंबटढाण झालेलं लोणचं ओतून दिलेलं मला दिसलं."

मग डेमुसनें दोघांनाहि कसली तरी मूर्खपणाची कामगिरी करायला धाडून दिलें. दरम्यान तो या दोघांना उद्देशून हंसला. कारण त्यानें दोघांनाहि चांगलेंच बनविलें होतें व आपली सेवा करायला लावलें होतें. शेवटीं कबाब-विक्यानें पाफ्लागोनियनवर मात केली. दोघांना मान्य असलेल्या एका प्राचीन भविष्य-कथनपर लेखाचा आधार घेऊन त्यानें पाफ्लागोनियनची अशी खात्री पटवून दिली कीं डेमुसच्या कारभारीपदावर आपलाच जास्त हक्क पोंचतो.

हा विजय मिळविल्यावर कबाब-विक्यानें स्वतःला ॲगोरॅक्रिटस हें नवें नांव घेतलें. मग तो आपल्या नव्या धन्यावर गुरकावूं लागला. "तुम्ही बावळट आहांत, लोभी आहांत," अशीं दूषणें तो त्याला लावूं लागला. तो अशा बढाया मारूं लागला कीं "पाफ्लागोनियननं अगोदर जमा करून ठेवलेला लांचलुचपतीचा पैसा घेऊन मी आतां श्रीमंत होणार आहें." आपल्या सामर्थ्याची प्रचीति दाखविण्यासाठीं त्यानें क्लेऑन पाफ्लागोनियन यालाच कबाब-विक्या व्हायला लावलें आणि जनावरांच्या रवंथकोठ्याचें मांस रस्तो-रस्तीं विकत हिंडायला लावलें.

## लेडी विंडरमीयर्स फॅन : सरदारणीचा पंखा

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* ऑस्कर वाइल्ड ( १८५६-१९०० ) *कथानकाचा प्रकार :* शिष्ट समाजावर आधारलेली सुखान्तिका. *काळ :* एकोणिसावें शतक. *स्थळ :* लंडन. *पहिला प्रयोग :* १८९२.

*प्रमुख पात्रें :* **लेडी विंडरमीयर,** शिष्टाचार कटाक्षानें पाळणारी एक महिला. **लॉर्ड विंडरमीयर,** तिचे यजमान. **लॉर्ड डार्लिंग्टन,** एक शहरी गृहस्थ. **मिसेस एर्लिन्ने,** एक साहसी महिला. **लॉर्ड ऑगस्टस लॉर्टन,** मिसेस एर्लिन्ने हिच्याशीं लग्न ठरलेला वर.

*समीक्षण :* नाट्यवाङ्मयाच्या सबंध इतिहासांतील पहिल्या अंकांमध्यें सगळ्यांत जास्त खोंचक व सर्वोत्कृष्ट रचनेचा पहिला अंक असलेलें नाटक म्हणून या नाटकाची ख्याती झाली. या नाटकाचा आविष्कार अत्यंत संक्षेपानें व मनोरंजक रीतीनें होत जातो. शेवटीं त्याची परिणति अपरिहार्यपणें एका निर्णायक प्रवेशामध्यें होते. या प्रवेशांत लेडी विंडरमीयर स्वतःच्या आईला पंख्यानें झोडपून काढायची धमकी देते. वस्तुतः या आईचें खरें नातें तिला ठाऊकच नसतें. नाटकाच्या कथानकाचा काळ खरें म्हटलें म्हणजे आजचाच आहे. परंतु असें असूनहि त्यांतली नाटककाराची मध्यवर्ती कल्पना अजून देखील आपल्याला आश्चर्याचा धक्का दिल्यावांचून राहत नाहीं. ही कल्पना अशी : “ चांगल्या स्त्रीला ” तिच्या लायकीपेक्षां अनेकदां पुष्कळच अधिक किंमत द्यावी लागते.

*कथानक :* लॉर्ड विंडरमीयर यांनीं आपल्या पत्नीला तिचा वाढदिवस होता त्या दिवशीं एक अत्यंत सुंदर पंखा भेट म्हणून दिला. त्या पंख्यावर नाजुक नक्षीकाम केलेलें होतें आणि त्यावर तिचें “ मार्गारेट ” हें नांव कोरलेलें होतें. वाढदिवसानिमित्त तिनें एक नृत्यसमारंभ त्याच रात्रीं आयोजिलेला होता. या नृत्यसमारंभाला लंडन शहरांतील प्रत्येक महत्त्वाच्या व्यक्तीला आमंत्रण गेलेलें होतें. या नृत्यसमारंभाच्या वेळीं हा भेटीचा पंखा बरोबर घेऊन जाण्याचा तिनें बेत केलेला होता.

त्या दिवशीं तिसरे प्रहरीं डचेस ऑफ बेरविक ह्या सरदारीणबाई लेडी विंडरमीयर हिच्याकडे भेटायला आल्या. दोघींची चांगलीच मैत्री होती. सरदारीणबाई तिला म्हणाली : “ हें बघ, माझ्या कानांवर एक अफवा आलेली आहे.

खरीखोटी माहीत नाहीं. पण मी तुला आपली सांगून ठेवत्ये. तुझे यजमान लॉर्ड विंडरमीयर हे मिसेस एर्लिन्ने या बाईच्या मागं लागले आहेत. ही बाई आहे मोठी मोहक. परंतु हिचा लौकिक फारसा चांगला नाहीं. अत्यंत उत्तमोत्तम कुटुंबांमध्यें तर हिला मुळीं प्रवेशच नसतो."

या प्रकरणाचा आणखी तपशील सरदारीणबाईनीं सांगितला तो असा : "तुझे यजमान लॉर्ड विंडरमीयर गेले कांहीं महिने मिसेस एर्लिन्ने हिला खर्चासाठीं लागणारे पैसे पुरवीत असतात. म्हणून माझं तुला सांगणं असं आहे कीं या दोघांमधील ही भानगड काय आहे याची माहिती करून घ्यायसाठीं तूं ताबडतोब कांहीं तरी इलाज कर."

लेडी विंडमीयर साहजिकच भयंकर बेचैन झाली. या बाजारगप्पांमध्यें खरोखरीच कांहीं तथ्य आहे का नाहीं याचा तलास लावण्याचा तिनें निश्चय केला. म्हणून तिनें आपल्या यजमानांच्या टेबलाचा खण उघडला. त्यांत तिला एक सीलबंद बँक पासबुक सांपडलें. तें तिनें सील फोडून खोललें. पाहते तों त्यांत तिला आपल्या पतिदेवांच्या दुटप्पीपणाचा पुरावाच सांपडला. मिसेस एर्लिन्नेच्या नांवानें फाडलेल्या सगळ्या चेकांची तारीखवार नोंद त्यांत मिळाली. हा व्यवहार किती तरी काळ बिनबोभाट चाललेला होता.

एकूण लॉर्ड विंडरमीयर यांना आपल्या प्रेमाची व आपल्या पातिव्रत्याची कांहींच किंमत नाहीं, हें तर तिला धडधडीत दिसून आलें. तिला अनिवार संताप आला. तिच्या भावना भलत्याच दुखावल्या गेल्या. यजमान घरीं येण्याचा अवकाश, कीं तडकाफडकीं ती त्यांच्यावर उसळली. लॉर्डसाहेब आपल्याच तोऱ्यांत होते. आपल्या पत्नीला आपल्या गैरहजेरींत आपल्या मालमत्तेची ढांढाळपट्टी करायची हिंमत कशी झाली याचीच त्यांना भलती चीड आली.

त्यांनीं तिला चक्क सांगून टाकलें : "माझा मिसेस एर्लिन्ने हिच्याशीं जो व्यवहार आहे तो सर्वस्वीं सभ्य स्वरूपाचाच आहे. तूं उगाच संशय घेत बसूं नकोस. ती बाई फार चांगली आहे. परंतु बिचारी दुर्दैवी आहे. तिला शिष्ट समाजाचा आदर पुन्हां एकदां संपादन करावा असं फार फार वाटतं. म्हणून मी तुला अगदीं स्पष्ट शब्दांत असा आदेश देतों कीं तूं स्वतः मिसेस एर्लिन्ने हिला नृत्यसमारंभासाठीं जरूर निमंत्रण पाठव." लेडी विंडरमीयरनें असें निमंत्रण पाठवायचें साफ नाकारलें. तेव्हां तिच्या यजमानांनीं आपल्या

सहीनें हें निमंत्रण धाडून दिलें. त्यांच्या या कृतीचा लेडी विंडरमीयरला भलताच राग आला. तिनें आपल्या यजमानांना चक्क धमकी दिली : "येऊं दे तर ती बया आमच्या नृत्यसमारंभाला. आमच्या घराचा उंबरा ओलांडून ती आंत यायची हिंमत करायचा अवकाश, कीं मी माझ्या पंख्यानं तिला झोडपून काढलीच म्हणून समजा."

परंतु मिसेस एर्लिन्ने नृत्यसमारंभाला समक्ष आल्यानंतर लेडी विंडरमीयरचा सारा निर्धार लटपटला आणि तिनें आपला पंख आपल्या हातून जमिनीवर पडूं दिला. जमलेल्या पाहुण्यांचा असा प्रामाणिक समज झाला कीं मिसेस एर्लिन्ने हिला खुद्द लेडी विंडरमीयरनेंच निमंत्रण दिलेलें असणार. म्हणून त्यांनीं साहजिकच तिला आपुलकीनें आपल्यांत सामील करून घेतलें. सगळ्या पुरुषांनीं तर तिला डोक्यावरच घेतलें. आणि स्त्रियांनासुद्धां अगोदरच ऐकलेल्या अनेक हकीगतींमुळें तिच्याविषयीं खूपच कुतूहल वाटलें आणि ही बाई खरोखरी आहे तरी कशी ती प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं बघावी म्हणून सगळ्या जणींनीं तिच्या भोंवतीं गर्दी केली.

तिच्या खास चाहत्यांपैकीं एक होता लॉर्ड ऑगस्टस लॉट्टन. हा डचेस ऑफ बेरविक हिचा बिन अक्कलचा भाऊ. याच्याशीं तिच्या लग्नाचा वाङ्निश्चय नुकताच झालेला होता. त्या रात्रीं मिसेस एर्लिन्ने हिचें एकटीचेंच तेवढें फार कौतुक झालें अशांतला प्रकार नव्हता. लॉर्ड डार्लिंग्टन तर लेडी विंडरमीयरचा शब्द झेलायला सतत तत्पर असलेला दिसला. मिसेस एर्लिन्ने या नृत्यसमारंभाला आल्यामुळें लेडी विंडरमीयर हिची मनोवृत्ति भलतीच बेफाट झाली. या गोष्टीचा फायदा लॉर्ड डार्लिंग्टननें नेमका घेतला. त्यानें आपल्या यजमानिणीला घुलवून घुलवून तिच्या मनाची येवढी तयारी केली कीं ती आपल्या यजमानांना सोडून या लॉर्डाकडे जायला तयार झाली.

पाहुणेमंडळी निघून गेल्यावर लेडी विंडरमीयरनें स्वतःच्या मनाशीं खूप विचार केला. परस्परविरोधी भावनांचें तिच्या हृदयांत प्रचंड काहूर माजलें. त्याचा शेवट असा झाला कीं तिनें लॉर्ड विंडरमीयर यांना उद्देशून एक पत्र लिहिलें आणि त्यांत आपण हें घर कायमचें सोडून जात असल्याचें तिनें त्यांना कळवून टाकलें. तिनें हें पत्र आपल्या नोकराच्या हातीं लॉर्डसाहेबांच्या स्वाधीन करण्यासाठीं दिलें आणि ती स्वत: लॉर्ड डार्लिंग्टनच्या बिऱ्हाडाकडे

निघून गेली.

इकडे मिसेस एर्लिन्ने ही देखील लॉर्ड ऑगस्टससमवेत लॉर्ड विंडरमीयर यांजबरोबर बोलणें करण्यासाठीं म्हणून मागें राहिलेली होती. लेडी विंडरमीयरनें लिहिलेल्या त्या पत्राचा तिला पत्ता लागला. तें पत्र बघून तिला ब्रह्मांड आठवलें. त्या बाईच्या आततायी कृतीमुळें स्वतःच्या कृतीच्या जुन्या आठवणी तिच्या मनांत तरळल्या. वीस वर्षांपूर्वी मिसेस एर्लिन्ने हिनें अशाच प्रकारचें पत्र आपल्या पतीला लिहिलेलें होतें आणि आपली मुलगी व आपले यजमान यांना सोडून देऊन ती अशीच एका प्रियकराच्या मागें लागून घरांतून निघून गेली होती. पुढें त्या प्रियकरानें तिला टाकून दिल्यावर मग तिचे डोळे खाडकन उघडले. अनेक वर्षांच्या सामाजिक बहिष्कारापायीं ती स्वतःच्याच मुलीला परकी होऊन बसली. परंतु या वेळीं तिच्या मनानें असें घेतलें कीं जी चूक आपल्या हातून झाली ती निदान आपल्या मुलीला आपण करूं देऊं नये. मिसेस एर्लिन्ने हीच लेडी विंडरमीयरची आई होती. आपल्याला जो पश्चात्ताप करीत बसण्याची पाळी आली तशी पाळी आपल्या कन्येच्या वांट्याला कधींहि येऊं नये असें तिला फार फार वाटलें.

म्हणून मिसेस एर्लिन्ने हिनें लेडी विंडरमीयरचें तें पत्र उचललें आणि तिथून ती तडक लॉर्ड डार्लिंग्टनच्या बिऱ्हाडाकडे घाईघाईनें चालती झाली. त्याच्या अगोदर तिनें लॉर्ड ऑगस्टसला अशी गळ घातली कीं त्यानें लॉर्ड विंडरमीयरला स्वतःबरोबर आपल्या क्लबांत घेऊन जावें आणि रात्रभर त्याला तिथेंच राहवून घ्यावें.

लॉर्ड डार्लिंग्टनच्या बिऱ्हाडीं पोंचल्यावर मिसेस एर्लिन्ने हिनें स्वतःचें लेडी विंडरमीयरशीं असलेलें आईचें नातें उघड न करतांच कसेंबसें तिचें मन वळविलें आणि आपल्या लहानग्या बाळाच्या हितासाठीं आपल्या यजमानांकडे परत जायला तिला उद्युक्त केलें. स्वतःला आलेल्या कटु अनुभवाचा मिसेस एर्लिन्नेला या वेळीं फार उपयोग झाला. त्याच्या जोरावरच तिला आग्रहपूर्वक असें प्रतिपादन करतां आलें कीं लेडी विंडरमीयरचें आद्य कर्तव्य स्वतःच्या पतीचा विचार करणें हें नसून स्वतःच्या बाळाच्या भवितव्याचा विचार करणें हेंच आहे.

लेडी विंडरमीयर त्याप्रमाणें तिथून घरीं परत जायला निघाली, येवढ्यांत

डार्लिंग्टन आपल्या बिऱ्हाडीं परत आला. त्याच्याबरोबर लॉर्ड विंडरमीयर व लॉर्ड ऑगस्टस हे दोघेहि होते. मिसेस एर्लिन्न हिनें घाईघाईनें आपल्या कन्येला रस्त्यावर वाट बघत उभ्या असलेल्या एका गाडींत बसवून घरीं रवाना करून दिलें आणि मग ती स्वतः या तिघां पुरुषांना तोंड द्यायला मागें राहिली.

हें एक प्रकारचें अग्निदिव्यच ठरलें. कारण त्या गडबडींत लेडी विंडरमीयर आपला पंखा तिथें विसरून गेली आणि लॉर्ड विंडरमीयरला तो पंखा दिसतांक्षणीं त्याला आपल्या पत्नीचा भलताच संशय आला. त्याबरोबर मिसेस एर्लिन्न एका पडद्याआडून पुढें सरसावली आणि तिनें चक्क असा खुलासा करून टाकला कीं " विंडरमीयर मंडळीच्या घरांतून बाहेर पडतांना मीच हा पंखा चुकून माझा समजून बरोबर आणला. "

तिच्या या खुलाशामुळें लेडी विंडरमीयर बचावली परंतु खुद्द मिसेस एर्लिन्न हिच्या अब्रूचें मात्र साफ खोबरें झालें. लॉर्ड विंडरमीयर हा प्रकार पाहून जो काय चिडला म्हणतां ! त्यानें ताडदिशीं असें सांगून टाकलें कीं " या बाई चालचलणुकीनं चांगल्या असतील असं समजून मी सद्बुद्धीनं त्यांच्याशीं स्नेह जोडला होता व यांना मदतहि करीत होतों. परंतु आतां बघतों तर हें भलतंच कांहीं तरी उघडकीला आलं. " तेव्हां लॉर्ड ऑगस्टसनेंहि तडकाफडकीं जाहीर करून टाकलें कीं " यापुढं मला मिसेस एर्लिन्न हिच्याशीं कसलाहि संबंध ठेवतां येणं शक्य नाहीं. आमचा वाङ्‌निश्चय मी मोडून टाकतों. "

एकट्या लेडी विंडरमीयरनेंच तेवढी मिसेस एर्लिन्नची बाजू घेतली व तिचें समर्थन केलें. हा कांहीं तरी विलक्षण योगायोग असला पाहिजे असें तिच्या शेवटीं ध्यानांत आलें. येरव्हीं एका चांगल्या सच्छील बाईला वांचविण्यासाठीं एका वाईट चालीच्या बाईनें जाहीर नाचक्की पतकरावी या रहस्याचा अन्य कांहीं अर्थच तिला लावतां येण्याजोगा नव्हता. खरा प्रकार काय घडलेला होता याचा लॉर्ड विंडरमीयर यांना कांहींच पत्ता नव्हता. म्हणून मिसेस एर्लिन्न तो पंखा परत करायला त्यांच्या घरीं आली तेव्हां त्यांनीं तिची सगळी खरीखरी हकीकत समजावून घेण्याचा निश्चय केला.

परंतु लेडी विंडरमीयरच्या भ्रामक समजुतींच्या ठिकऱ्याठिकऱ्या उडविण्याचेंहि मिसेस एर्लिन्न हिच्या जिवावर आलें. कांहीं झालें तरी ती तिची आई होती. आणि आपल्या मुलीला आपलें खरें नातें उघड करून सांगायचें नाहीं

असा तिनें ठाम निश्चय करून टाकला. तथापि आश्चर्याची गोष्ट अशी कीं लॉर्ड विंडरमीयर यांच्या घराबाहेर खुद्द लॉर्ड ऑगस्टस हेच मिसेस एर्लिन्ने हिची वाट बघत उभे होते. खुद्द लॉर्ड ऑगस्टस यांच्या हिताप्रीत्यर्थच आपण लॉर्ड डार्लिंग्टन यांच्या बिऱ्हाडीं गेलों होतों हा मिसेस एर्लिन्नेचा खुलासा लॉर्ड साहेबांनीं मान्य केला होता आणि आपला तिच्यावरचा राग सोडून दिला होता. लॉर्ड विंडरमीयर यावर म्हणाले : "लॉर्ड ऑगस्टस यांना एका अत्यंत चतुर स्त्रीशीं लग्न करायला मिळतंय." तेव्हां लेडी विंडरमीयर हिनें आग्रहपूर्वक प्रतिपादन केलें : "नका हो, असं नका म्हणूं. कुणा तरी अगदीं दुर्मिळ अशा फार चांगल्या स्त्रीशीं ते लग्न करताहेत असं माझं ठाम मत आहे. आणि तेंच तुम्ही मान्य केलं पाहिजे."

## लि लि यो म

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* फेरेन्क मोल्नार ( १८७८-१९५२ ) *कथानकाचा प्रकार :* कल्पनाविलास. *काळ :* विसाव्या शतकाच्या आरंभींचा काळ. *स्थळ :* बुदापेस्त. *पहिला प्रयोग :* १९०९.

*प्रमुख पात्रें :* **लिलियोम**, करमणुकीच्या बागेंतील फिरत्या चक्रासाठीं गिऱ्हाइकें जमविणारा नोकर. **मिसेस मुस्काट**, त्याची मालकीण. **ज्यूली**, त्याची पत्नी. **मारी**, तिची मैत्रीण. **वूल्फ**, मारीचे यजमान. **मिसेस हॉलुंडर**, ज्यूलीची मावशी. **फिक्सूर**, लिलियोमचा मित्र. **लिन्झमन**, फिक्सूर ज्याच्यावर दरोडा घालायचा बेत सुचवतो तो कॅशियर. **लुइझे**, ज्यूली आणि लिलियोम यांची कन्या.

*समीक्षण :* या नाटकाला युरोप-अमेरिकेंतील रंगभूमीवर चांगलीच लोकप्रियता लाभली. कामगारवर्गांतील प्रेम व इमानदारी यांची कथा सांगणें हा हें नाटक लिहिण्यांत नाटककाराचा उद्देश होता. ललित साहित्य या दृष्टीनें हें नाटक सखोल नसलें तरी करमणुकीच्या दृष्टीनें तें बहुधा दीर्घायुष्याचा उपभोग घेईल.

*कथानक :* हंगेरीची राजधानी बुदापेस्त या शहराच्या कडेला करमणुकीच्या बागेंत मिसेस मुस्काट हिचें फिरतें चक्र होतें. त्यासाठीं गिऱ्हाइकें मिळवायचें काम लिलियोम हा नोकर करीत असे. हीं गिऱ्हाइकें मिळवायच्या कामांत त्याला फार मोठें यश मिळे. कारण त्याच्याजवळ हास्यकारक कथांचा मोठाच संग्रह होता,

आणि त्याच्या तोंडून या कथा ऐकतां ऐकतां गिऱ्हाइकांची हंसून हंसून मुरकुंडी वळे. त्याच बरोबर मुलींना खेळकरपणें वागवायची एक खास हातोटी त्याच्या अंगीं होती.

एके दिवशीं मारी व ज्यूली या दोघी तरुण मोलकरणी त्या चक्राजवळ आल्या. तेव्हां लिलियोम मागचा पुढचा विचार न करतां चक्रापाशीं गेला आणि त्यानें ज्यूलीच्या कमरेभोवतीं आपल्या हातांचा विळखा घातला. हें बघून चक्राची मालकीण मिसेस मुस्काट हिला भयंकर राग आला. मिसेस मुस्काटनें ताबडतोब ज्यूलीला बजावलें: "पुन्हां जर का या चक्राजवळ आलीस तर खबरदार! तुला मी इथून ताबडतोब हांकलून देईन. या बागेंत भलतं सलतं वागायला मीं जर कुणाला मोकळीक दिली तर चक्र चालवायचा माझा परवाना रद्द होईल त्याची वाट काय? मनाची नाहीं तरी जनाची तरी लाज धरायला हवीस तूं!"

तथापि लिलियोमचा खाक्याच वेगळा. त्यानें मालकिणीच्या देखत ज्यूलीला चक्क सांगून टाकलें: "ज्यूली, तूं खुशाल इथं तुला हवं असेल तितके वेळां मनमोकळेपणानं येत जा. मी तुला मोठ्या आनंदानं चक्रांत बसायला देत जाईन. माझ्या मालकीणबाईचं बोलणं तूं अजिबात मनावर घेऊं नकोस." मिसेस मुस्काटच्या मनांत तसें पाहिलें तर लिलियोमला हातचा सोडायचें अजिबात नव्हतें. ती त्याला जाऊं द्यायला मुळींच तयार नव्हती. परंतु असल्या उर्मट-पणापुढें ती तरी काय करणार? त्याच्या या उद्दामपणाकडे दुर्लक्ष करणें तिला अशक्यच होतें. आणि तिनें त्याला नोकरीवरून ताबडतोब काढून टाकलें.

मालकिणीच्या या आदेशाचा आपल्यावर कांहीं एक परिणाम झाला नाहीं, उलट आपण आझाद झालों हें चांगलेंच झालें, असें दर्शविण्यासाठीं लिलियोमनें लगेच सांगून टाकलें कीं "मी आत्तांच्या आत्तां थोडीशी बीयर दारू घेऊन येतों." तो इकडे आपल्या सामानसुमानाची आंवराआंवर करीत होता आणि तिकडे मारी व ज्यूली या मैत्रिणींचें आपसांत हितगुज चाललेलें होतें. मारीनें आपलें एक रहस्य ज्यूलीला सांगून टाकलें. मारी म्हणाली: "माझं एका गणवेश-धारी पुरुषावर प्रेम बसलंय. मात्र तो सैनिक नाहीं. तो आहे कचेरींतला गडी. त्याचा गणवेश कित्तीकित्ती छान आहे म्हणून सांगूं!"

तितक्यांत लिलियोम परत आला आणि त्यानें मारीला बाटेला लावून ज्यूलीबरोबर प्रेमाविषयीं चर्चा आरंभली. या सगळ्या बोलण्यांत तो एकसारख्या

स्वतःच्या बढाया सांगत होता आणि ज्यूलीला अधून मधून दमदाटी देत होता. ज्यूलीनें आपलें त्याच्यावर नितांत प्रेम असल्याचें प्रत्यक्ष कृतीनें दाखवून दिलें. कारण त्याच्या प्रेमापायीं इतक्या खूप उशीरांपर्यंत बाहेर राहून ती आपली नोकरी घालवून बसलेली होती. तेवढ्यांत उनाडक्या करणारांचा शोध करीत असलेले दोन गस्तवाले पोलीस शिपाई तिथें हजर झाले. त्यामुळें दोघांच्या या प्रेमकूजनामध्यें व्यत्यय आला. उभयतांना पोलिसांनीं ठराविक धर्तीचे प्रश्न विचारले. मग त्यांनीं ज्यूलीला इशारा देऊन ठेवला कीं "हें बघ, हा लिलियोम म्हणजे इरसाल कामचुकार इसम आहे. याच्या नादीं लागून तूं आपलं हकनाक नुकसान करून घेऊं नकोस." मग पोलीस आपल्या गस्तीच्या कामासाठीं पुढें निघून गेले. ज्यूलीनें आपलें लिलियोमवर मुळींच प्रेम नाहीं असें त्या वेळीं निक्षून सांगितलें असलें तरी तिचें त्याच्यावर प्रेम असल्याचें अगदीं उघड दिसत होतें. म्हणून त्या दोघांचें लग्नहि झालें.

मग हें जोडपें एका फोटोग्राफरच्या मोडकळीला आलेल्या दुकानांत आसरा घ्यायला गेलें. हें दुकान मिसेस हॉल्लुंडर व तिचा मुलगा अशीं दोघें चालवीत होतीं. बागेच्या कडेलाच हें दुकान होतें. मिसेस हॉल्लुंडर ही ज्यूलीची मावशीच असल्यामुळें तिनें या जोडप्याला आसरा दिला इतकेंच नव्हे तर त्यांच्यासाठीं जेवण्याखाण्याची व सर्पणाची सोय करून दिली. ही मावशी एकसारख्या कांहीं ना कांहीं तरी तक्रारी सांगत बसायची. तरी पण वरपांगीं द्वाष्टिक दिसणाऱ्या या बाईचें हृदय आंतून फारच प्रेमळ होतें. दरम्यान ज्यूलीची मैत्रीण मारी ही आपला प्यून प्रियकर वूल्फ याच्या प्रेमांत जास्तजास्तच गुरफटूं लागली. एके दिवशीं या दोघी मैत्रिणी एकमेकींना आपापलीं गुपितें सांगतां सांगतां अगदीं रंगांत आल्या. तेवढ्यांत हॉल्लुंडर आली आणि तिनें एक बातमी ज्यूलीला सांगितली.

मावशी म्हणाली : "ए ज्यूली, तुला लग्नाची मागणी घालणारा तो दुसरा इसम आहे ना, तो आज मला भेटला. तो सुतारकाम करणारा कारागीर आहे. त्याची पहिली बायको वारली. त्याला दोन मुलं आहेत. त्याला त्याच्या धंद्यांत चांगली कमाई होते. तुझी अशी ही दरिद्री दशा बघून तुझी त्याला दया येते. तो अजून देखील तुला या गरिबीच्या गर्तेतून काढून सुखाच्या राशीवर बसवायला तयार आहे. तूं या लिलियोमला सोडून दे आणि त्या सुताराशींच लग्न कर." परंतु ज्यूलीनें मावशीचें मुळींच ऐकलें नाहीं. आपण

आहों तिथंच सुखी आहोंत असें तिनें मावशीला स्पष्ट सांगून टाकलें.

इतक्यांत मिसेस मुस्काट तिथें आली आणि तिनें लिलियोमला परत कामावर यायला पाचारण केलें. परंतु त्याला भलतीच गुर्मी चढलेली होती. त्यानें आपल्या जुन्या मालकिणीकडे परत जाण्याचें साफ नाकारलें. तो म्हणाला : "मला आतां पैशाची फिकीर नाहीं. मी आणि माझा दोस्त फिस्कूर असे दोघे मिळून खूप पैसे मिळविणार आहोंत. आम्ही दोघांनीं त्यासाठीं एक भली मोठी योजना आंखून तयार ठेवलेली आहे. *आतां मला तुमचं तें चक्र चाल-वायला यायची कांहीं एक जरुरी नाहीं.*"

फिस्कूरनें जी पैसे मिळविण्याची योजना चालविलेली होती ती अगदीं साधी होती. तो एक मोठी चोरी करायच्या विचारांत होता. त्याबाबतची त्याची योजना अशी होती :- एका चामड्याच्या कारखान्यांत कामावर असलेला कॅशियर दर शनिवारीं तिथल्या कामगारांना द्यायचे पगाराचे पैसे एका चर्मी बॅगेंतून बरोबर घेऊन एका ठराविक वाटेनें पायीं जात असे. ही वाट रेल्वे लाइनीच्या उताराजवळून गेलेली होती. लिलियोमनें या कॅशियरला तिथें गांठायचें आणि त्याला "किती वाजले?" म्हणून विचारायचें. तेवढ्यांत फिस्कूरनें पाठी-मागून यायचें आणि त्या कॅशियरवर सुरीहल्ला करायचा. अशी या दोघांची एकंदर योजना होती.

तेवढ्यासाठीं एक सुरी पाहिजे होती. मिसेस हॉल्लुंडरच्या स्वयंपाक-घरांतली सुरी लिलियोमनें लंपास करावी असा फिस्कूरनें त्याच्यामागें लकडा लावला. हे दोघे कांहीं तरी काळेंबेरें करायच्या विचारांत असावेत हें ज्यूलीनें ओळखलें. म्हणून ती लिलियोमला आर्जवानें म्हणाली : "तुम्ही त्या फिस्कूर-बरोबर आतां बाहेर नका जाऊं. आजच संध्याकाळीं मी त्या सुतारबुवांना घरीं बोलावून घ्यायची व्यवस्था केलेली आहे. ते तुम्हांला काम देणार आहेत." *पण तिचें न ऐकतां लिलियोम बाहेर निघून गेला. तो बाहेर गेल्यावर मिसेस* हॉल्लुंडरला स्वयंपाकघरांतली सुरी सांपडेना. त्यानेंच ती लांबविली असणार असा तिनें संशय घेतला. त्याला निरपराधी ठरविण्यासाठीं ज्यूलीनें चक्क थाप ठोकून दिली. तिनें सांगितलें : "ते बाहेर जायला निघाले त्या वेळीं मी स्वतः त्यांचे खिसे तपासले. त्यांच्या खिशांत मला फक्त एक पत्त्यांचा जोड मिळाला. सुरी कांहीं मिळाली नाहीं."

संध्याकाळीं सहाची गाडी निघून जातांक्षणीं लिलियोम व फिस्कूर हे दोघे रेल्वे लाइनीच्या उताराजवळील वाटेवर ठराविक जागीं दाखल झाले. खूप अगोदर आलेले असल्यामुळें दोघांनीं 'गेम ऑफ ट्वेंटीवन' हा खेळ सुरू केला. हा खेळ पैसे लावून चाललेला होता. त्यांत लिलियोम हरला. किती हरला? कॅशियरकडून त्यांच्या हिशेबानें चोरायला मिळणारी जेवढी रक्कम होती, तिच्यांतला त्याचा हिस्सा तो हरला. म्हणजे त्याच्या हिश्शाचे लुटीचे पैसे तो फिस्कूरचे देणें लागूं लागला. तेव्हां लिलियोमनें आपली फसवणूक केल्याचा आरोप फिस्कूरवर केला. तेवढ्यांत त्या दोघांचें सावज त्या वाटेनें चाललेलें त्यांना दिसलें. लिलियोमनें ठरलेल्या संकेतानुसार त्याला हटकलें. फिस्कूर त्याच्यावर सुरीचा वार करणार, येवढ्यांत त्या कॅशियरनें शिताफी करून फिस्कूरचें मनगट गच्च पकडलें, आणि आपल्याजवळचें पिस्तुल काढून तें लिलियोमच्या छातीवर रोखलें.

विलक्षण योगायोग असा कीं हा कॅशियर या वेळीं कारखान्यांतील कामगारांचे पगार वांटायला चाललेला नव्हता. उलट तो पगार वांटायचें काम संपवून रिकामी थैली बरोबर घेऊन परत चाललेला होता. फिस्कूरनें या वेळीं जर ठरल्याप्रमाणें त्याचा खून केला असता तर या दोघां चोरांना त्याच्याजवळून एक कपर्दिकाहि लुटायला मिळाली नसती. दूर अंतरावर दोघे पोलिस शिपाई चाललेले होते, त्यांना त्या कॅशियरनें मोठमोठ्यानें हांका मारल्या. तेवढ्यांत लिलियोम सटकला आणि त्यानें जातां जातां फिस्कूरच्या हातांतली सुरी हिसकावून घेऊन ती स्वतःच्या पोटांत खुपसून घेतली.

पोलिसांनीं त्याला इस्पितळांत नेण्याचा प्रयत्न केला परंतु बघतात तों त्याची प्रकृति अत्यवस्थ झालेली. त्यांनीं त्याला परत त्याच्या बिन्हाडीं फोटोग्राफरच्या स्टुडियोंत पोंचता केला. तिथेंच त्यानें प्राण सोडला. ज्यूली त्याच्याजवळ त्याचा हात आपल्या हातीं घेऊन बसून राहिलेली होती.

मरतां मरतां लिलियोमला एक स्वप्न पडलें. स्वर्गातले दोन पोलिस शिपाई त्याच्या समोर हजर झाले. त्यांनीं त्याला आपल्याबरोबर चलण्याचा हुकुम केला. त्याला घेऊन जातां जातां त्यांनीं त्याला एका गोष्टीची आठवण करून दिली. ते म्हणाले : " अरे, नुसतं मेलं म्हणजे सगळा कारभार आटोपला असं नको समजूंस. तुझी स्मरणशक्ती देखील तुझ्याबरोबर जेव्हां नष्ट होईल तेव्हांच

तुझा पृथ्वीशीं असलेला संबंध तुटेल." मग या स्वर्गीय पोलिसांनीं त्याला आत्महत्त्या करणाऱ्यांवर खटले चालविणाऱ्या खास स्वर्गीय कोर्टात हजर केलें. तिथें त्यांना कळलें कीं आत्महत्त्या करणाऱ्यांना कांहीं काळ आगींत जाळून शुद्ध करून घेतात ; मग या शुद्धीकरणाचा त्यांना कांहीं फायदा झाला किंवा नाहीं हें बघण्यासाठीं या आत्मघातक्यांना एका दिवसाच्या मुदतीपुरतें परत पृथ्वीवर धाडून देतात. या स्वर्गीय कोर्टात लिलियोमला सोळा वर्षें आगींत जळत ठेवण्याची शिक्षा देण्यांत आली.

शिक्षा पूर्ण भोगून झाल्यावर लिलियोम पृथ्वीवर परत आला. घरीं जाऊन बघतो तों त्याची पत्नी व सोळा वर्षें वयाची कन्या लुइझे या दोघी जणी आपल्या चिमुकल्या चंद्रमौळी घराच्या बागेंत दुपारचें जेवण जेवायला सुरवात करायच्या बेतांत दिसल्या. लिलियोमला ज्यूलीनें ओळखलेंच नाहीं. तिनें त्याला थोडेंसें खायला दिलें. लुइझे त्याच्याशीं गप्पा मारूं लागली. तिनें त्याला सांगितलें : "माझे बाबा दिसायला फारच देखणे होते. मी जन्माला यायच्या अगोदर ते अमेरिकेला गेले आणि तिकडेच त्यांचं निधन झालं." लिलियोम ज्यूलीला उद्देशून म्हणाला : "तुमचे यजमान माझ्या ओळखीचे होते. ते भारी खाष्ट होते. ते तुम्हांला मारझोड करीत असत." तेव्हां ज्यूली त्याच्यावर खूप संतापली. ती म्हणाली : "भल्या गृहस्था, तुला आम्ही पाहुणा म्हणून खाऊं पिऊं घातलं. आणि तूंच माझ्या यजमानांवर असे खोटेनाटे आरोप करतोस ! माझ्या यजमानांनीं उभ्या आयुष्यांत मला कधींच गैर रीतीनं वागवलं नाहीं. असा कसा कृतघ्न माणूस रे तूं ! चालता हो बघूं इथून !"

लिलियोम आपल्या मुलीला खूष करण्याचा प्रयत्न करूं लागला. त्यानें तिला पत्त्यांच्या हातचलाखीचे अनेक प्रकार करून दाखविले. त्यानें स्वर्गांतून येतांना एक सुंदर तारा चोरून आणलेला होता, तो तिला देऊन तिला आपल्या बाजूला वळवून घेण्याचा त्यानें प्रयत्न करून बघितला. पण ती कशालाच बधेना. तिनें त्याला चक्क सांगून टाकलें : "तुमचा आमचा कांहीं एक संबंध नाहीं. तुम्ही आपला रस्ता सुधारा कसे !" जातां जातां त्यानें तिच्या हातावर जोरांत चापट मारली. परंतु ही चापट तिला लागलीच नाहीं. उलट तो आपला हात हळुवार-पणें गोंजारतो आहे असेंच तिला वाटलें. तिची आई तिला म्हणाली : "मला देखील कधीं कधीं अशा प्रकारचा अनुभव आलेला आहे. रट्टा म्हणून

खावा, तर तो लागायचाच नाहीं. कुणी तरी आपल्याला गोंजारतंय असंच वाटायचं." मग लिलियोम त्या दोघां स्वर्गीय पोलिसांसमवेत निघून गेला. लिलियोमला जें अपेश आलें त्याबद्दल आपणाला खूप खूप वाईट वाटत असल्याचें दर्शविण्यासाठीं ते पोलीस एकसारखे माना वेळीत होते.

## लॉ य ल्टी ज : नि ष्ठा

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* जॉन गाल्सवर्दी ( १८६७-१९३३ ). *कथानकाचा प्रकार :* सामाजिक टीका. *काळ :* विसाव्या शतकाचा आरंभ. *स्थळ :* लंडन. *पहिला प्रयोग :* १९२२.

*प्रमुख पात्रें :* **फर्दिनांद द लेव्हिस,** एक श्रीमंत तरुण ज्यू ( यहुदी ). **कॅप्टन रोनाल्ड डान्सी** ( डी. एस. ओ.—सर्व्हिस क्रॉस मेडल ऑर्डर ), सेवानिवृत्त लष्करी अधिकारी. **मेबल,** डान्सी याची पत्नी.

*स मी क्ष ण :* ज्यू ( यहुदी ) जमातीविरुद्ध जातीय द्वेषाची दुष्ट मोहीम करण्याच्या प्रश्नाचें प्रामाणिक व उघडपणें विवेचन करणाऱ्या अगदीं पहिल्या वहिल्या नाटकांमध्यें 'लॉयल्टीज' ('निष्ठा') या नाटकाची गणना होते. तथापि या प्रश्नाच्या दोन्हीं बाजूंचा ऊहापोह निःपक्षपातीपणानें करण्याच्या बाबतींत गाल्सवर्दी इतकी कांटेकोर मेहनत करतो कीं तिच्यापायीं आपल्या मूळ सिद्धान्तावरच जवळजवळ पाणी सोडण्याइतकी त्याची मजल जाते. या नाटकांतील सगळ्यांत जास्त परिपूर्ण स्वरूपांत सादर केलेलें पात्र म्हणजे बहुधा कॅप्टन डान्सी ही व्यक्ति. हा कर्तृत्ववान माणूस असून स्थितिशील समाजाशीं मिळतें घेण्याचा त्याचा प्रयत्न चाललेला असतो आणि समाजविरोधी वर्तन करण्यांत त्याला आपल्या फाजील उत्साहाला वाट द्यायला अवसर सांपडतो. डान्सीच्या वागणुकीची गय करायला जरी गाल्सवर्दी आपल्याला सांगत नसला तरी ती वागणूक समजून घ्यायला हा नाटककार आपल्याला नक्कीच मदत करतो.

*क था न क :* तरुण कॅप्टन रोनाल्ड डान्सी, सर्व्हिस क्रॉस, मेडल ऑर्डर ( डी. एस्. ओ. ), हा इंग्लंडच्या राजाच्या लष्करी नोकरींतून निवृत्त झाला. स्वतःचें पुढें काय करायचें, हा त्याच्यापुढें मोठाच प्रश्न उभा राहिला. कर्तृत्ववान जीवन जगायची तर त्याला सवय. मग आतां रिकामपणीं वेळ कसा घालवायचा? प्रथम स्वारीनें घोड्यांच्या शर्यती व बायांचीं लफडीं, असल्या भानगडींत

स्वतःला पूर्णपणें गुरफटवून घेतलें. पण तो ज्या प्रचंड उद्दीपनासाठीं हपापलेला होता, तें त्याला या दोहोंपैकीं एकाहि गोष्टींतून सांपडेना. त्याची पागा त्याला इतकी महागांत पडूं लागली कीं अखेरीस त्याला आपली रोजमेरी ही शिंगी आपला मित्र फर्दिनांद द लेव्हिस याला देऊन टाकणें भाग पडलें. कारण तिला संभाळण्याचा भारी खर्च त्याला अतःपर परवडेनासा झाला. बायांच्या लफड्यांविषयीं म्हणाल तर रॉनीनें ( रोनाल्डनें ) असें ठरवूनच टाकलें कीं या सगळ्या साळकायामाळकायांना अजिबात धुडकावूनच लावायचें. आणि, जी आपलें कौतुक करते, आणि पत्नीच्या ठिकाणीं जो बाणा आपल्या मतें असावा असा बाणा जिच्या अंगीं आहे, अशा एखाद्या स्त्रीशीं लग्नच करून टाकायचें असा रॉनीनें निर्धार केला.

रॉनी अगदीं निष्कांचन झालेला होता. ही गोष्ट अजिबात गुप्त राहिलेली नव्हती. तरी देखील लंडन शहरांतील आपल्या आवडत्या क्लबांचें सभासदत्व त्यानें चालूच ठेवलें. तें त्यानें कसें चालू ठेवलें तें त्याचें त्यालाच ठाऊक. त्याचप्रमाणें दर शनिवारीं कुठें ना कुठें खेडोंपाडीं मेजवान्या असत आणि या मेजवान्यांना त्याचे मित्र त्याला व त्याच्या पत्नीला आमंत्रणें देत असत. चार्ल्स विन्सर हा त्याचा अशांपैकींच एक जुना स्नेही होता. या स्नेह्याचा वेल्डर कोर्ट नामक एक ग्रामीण वाडा होता. तिथें रॉनी गेला असतांना त्याला या स्नेह्याकडून असा पत्ता लागला कीं आपण जी घोडी द लेव्हिस याला बक्षीस दिली, तीच द लेव्हिसनें दुसऱ्या कुणाला तरी एक हजार पौंड किंमतीला विकली.

या बातमीनें साहजिकच रॉनीला भयंकर चीड आली. पुढें रात्रीं त्याच चिडीपायीं त्यानें द लेव्हिसबरोबर एक पैज मारली. चार फूट उंचीचें एक पुस्तकांचें कपाट होतें. त्या कपाटावर जमिनीपासून तेवढ्या उंचीवर त्यानें उडी मारून दाखवावी आणि पैजेचे दहा पौंड मिळवावे अशी दोघांची शर्त होती. ती पैज रॉनीनें जिंकून दाखविली. परंतु येवढी अल्प रक्कम मिळावी म्हणून जो माणूस दिवाणखान्यांतल्या दिवाणखान्यांत असल्या कोल्हाटउड्या मारायला तयार होतो त्याच्याविषयीं द लेव्हिस याला तिरस्कारच वाटला. आणि तो त्यानें बोलूनहि दाखविला. पण हें प्रकरण तेवढ्यावरच थांबलें नाहीं.

मध्यरात्रीचा सुमार झाला. विन्सर व त्याची पत्नी अशीं दोघें गाढ झोंपलेलीं होतीं. द लेव्हिसनें त्यांना हांका मारून जागें केलें. तो म्हणाला : " मी

माझ्या उशीखालीं एक हजार पौंडांची रक्कम ठेवलेली होती. घोडी विकून मला हीं रक्कम मिळाली आणि मी ती तुमच्याकडे येतांना बरोबर आणली. झोंपी जातांना माझ्या उशीखालीं ठेवून दिली. आतां मध्येंच मला जाग झाली आणि चांचपून बघतों तर रक्कम गायब ! या घरांत हजर असलेल्या सगळ्या लोकांची आतांच्या आतां झडती घेतली पाहिजे. तरच माझ्या रकमेचा पत्ता लागेल." आपल्या नोकर माणसांवर म्हणा किंवा आपल्या पाहुण्यांवर म्हणा, अशा प्रकारचा चोरीचा आळ येऊं देणें विन्सर पतिपत्नींना अजिबात आवडलें नाहीं. परंतु द लेव्हिसच्या हट्टापुढें त्यांचा कांहीं इलाजच चालेना. शेवटीं अगदीं नाखुषीनें का होईना, पण त्यांना पोलिस हे बोलवावेच लागले.

या सगळ्या प्रकाराचा उलगडा करून घेतांना द लेव्हिसनें पांचपोंच अजिबात ठेवला नाहीं म्हणून रॉनीचे मित्र ताबडतोब द लेव्हिसच्या विरुद्ध एक झाले. त्यांच्या वृत्तींत एकाएकीं झालेला हा पालट बघून द लेव्हिसनें लगेच असा निष्कर्ष काढला कीं आपण ज्यू (यहुदी) आहोंत म्हणूनंच या सगळ्या ख्रिस्ती लोकांनीं आपल्याविषयीं अशी दूषित वृत्ति धारण केलेली आहे. रॉनीनेंहि द लेव्हिसला टोमणा मारला कीं "अखेर तूं आपल्या जातीवर गेलासच." आणि अशा रीतीनें द लेव्हिसच्या निष्कर्षाला रॉनीनें प्रत्यक्षांत पुरावाच मिळवून दिला.

रॉनीच्या मित्रांनीं द लेव्हिसला झुकतें माप देण्यासाठीं प्रयत्नांची शिकस्त केली, परंतु कांहीं झालें तरी द लेव्हिसचें वागणें अगदींच वाईट होतें हें त्यांना कबूल करणें भाग पडलें. तेवढ्यांत त्यांना या यहुद्याच्या पूर्वपीठिकेचीहि अचानक आठवण झाली. याचे वडील लंडन शहरांत गालिचे ठोकबंद विकण्याचा धंदा करीत असत. तसें पाहिलें तर द लेव्हिस हा जरा आगाऊच इसम होता. जिथें तिथें पुढें पुढें करायची त्याला फाजील खोड होती. त्यानें पैसे खूप मिळविलेले असले तरी लंडन शहरांतील पार्क लेन, ऑक्सफर्ड स्ट्रीट, रीजंट स्ट्रीट आणि पिकॅडिली या चतुःसीमांमध्यें सामावलेल्या "मे फेअर" विभागांतील पिढीजाद शिष्ट समाजामध्यें व खेडोंपाडीं इस्टेटी असलेल्या प्रतिष्ठितांमध्यें त्याची गणना होण्याजोगी नव्हती.

आपल्या जातीला अनुलक्षून रॉनीनें काढलेल्या उद्गारांनीं द लेव्हिसचा जो अपमान झाला, त्याचें लोण त्यानें आपल्या क्लबांत पोंचतें केलें. रॉनी देखील

त्याच क्लबाचा सभासद होता. तिथें त्यानें रॉनीवर चक्क चोरीचा आरोप केला. त्या बरोबर रॉनीनें त्याला द्वंद्व युद्धाचें आव्हान दिलें. परंतु सभ्य लोकांमध्यें असल्या रानटी रीतींचा अवलंब अतःपर चालूं दिला जात नव्हता. म्हणून द लेव्हिस आपसूखच या दिव्यांतून बचावला.

मग रॉनीनें आपली पत्नी मेबल हिला आपल्याबरोबर आफ्रिकेला नैरोबी येथें चलण्याचा आग्रह चालविला. परंतु आपले यजमान निरपराधी असले पाहिजेत अशी तिची बिचारीची समजूत. म्हणून ती त्याला सांगूं लागली : "कशाला इतक्या दूर जायचं ? इथंच राहूं या आपण. तुमच्या इज्जतीवर हें जें आक्रमण चाललंय, त्याचा तुम्ही इथल्या इथंच राहून मुकाबला केला पाहिजे. नाहीं तर तुमच्या हातून कांहीं तरी काळंबेरं झालं असेल म्हणूनच तुम्ही पळून जातांय असा आक्षेप घ्यायला लोकांना उगीचच वाव मिळेल." शेवटीं आपण गप्प बसलों तर आपण गुन्हा कबूल केल्यासारखें होईल हें रॉनीच्या ध्यानांत आलें. आणि त्यानें एका वकिलाचा सल्ला घेतला व द लेव्हिसवर अब्रूनुकसानीचा दावा दाखल केला.

परंतु रॉनीनें आपली बाजू मांडण्यासाठीं वकील म्हणून ज्या माणसाची निवड केली, त्या माणसाकडे हें काम देण्यांत त्याची फार मोठी चूक झाली. हा वकील होता जुन्या जमान्यांतला. ट्विस्डेन अँड ग्रॅव्हिटर या कंपनींतला वरिष्ठ भागीदार वयोवृद्ध जेकब ट्विस्डेन. या ट्विस्डेनसाहेबांचें असें ठाम मत होतें कीं साध्या न्यायाला सगळ्या निष्ठांपेक्षां अधिक प्राधान्य मिळालें पाहिजे; मग या निष्ठा जातीय असोत, आर्थिक असोत, सामाजिक असोत, राजकीय असोत वा केवळ वैयक्तिक असोत.

खरें म्हटलें म्हणजे रॉनीच्या पराक्रमाची मर्यादा खूपच पुढें गेलेली होती. त्यानें द लेव्हिसचे पैसे तर चोरलेले होतेच. परंतु याशिवाय आपल्या लग्नापूर्वी एका इटालियन तरुणीशीं त्याचा जो प्रेमसंबंध आलेला होता, त्याची बातमी त्यानें आपल्या पत्नीपासून व मित्रांपासून चोरून ठेवलेली होती. या तरुणीचे वडील धंद्यानें कलाल होते. त्यांचें नांव रिकार्डोस. या रिकार्डोससाहेबांनीं रॉनीला तंबी द्यायला सुरवात केली. त्यांनीं त्याला एकांतांत गांठून बजावलें : "अहो महाशय, बऱ्या बोलानं माझ्या मुलीच्या अन्नवस्त्राची तरतूद करा. नाहीं तर तुमचं हें बिंग तुमच्या पत्नीजवळ उघड करून दाखविल्याखेरीज मी राहणार नाहीं." रॉनी

घाबरला. आतां काय करायचें ? ही भानगड मिटविण्यासाठीं कुठून तरी पैसे हे आणलेच पाहिजेत. म्हणून त्यानें मोठेंच साहस केलें. आपल्या खोलींतून थेट द लेव्हिसच्या खोलींत त्यानें हनुमानउडी घेतली आणि रिकार्डोसला देण्यासाठीं तिथून सरळ नोटा चोरून आणल्या. शेवटीं या चोरीच्या नोटा कुणाच्या हातून कुणाच्या हातीं कसकशा गेल्या याचा संपूर्ण छडा पोलिसांना लागला.

आपण जी केस लढवितों आहोंत तिच्या पाठीमागची खरी परिस्थिति काय आहे याची सगळी हकीगत वकीलसाहेब ट्रिस्डेन यांना कळली तेव्हां त्यांनीं रॉनीला असा सल्ला दिला कीं " उगीच ही केस लढविण्याच्या फंदांत पडूं नका. शक्य तितक्या लवकर देशत्याग करून कुठं तरी तोंड काळं करून निघून जा. " या सूचनेला खुद्द रॉनीचे वरिष्ठ अधिकारी जनरल कॅनिंज यांनींहि पाठिंबा दिला. आणि ते नुसतेच पाठिंबा देऊन थांबले नाहींत. त्यांनीं त्याला एक पळवाटहि काढून दिली. स्पेनशीं चाललेल्या युद्धामध्यें त्यांनीं त्याला अधिकारपदाची एक जागा देऊं केली.

रॉनी आपली केस काढून घेणार अशी कुणकुण द लेव्हिस याला लागली. तेव्हां त्यानें उदार मनानें झालें गेलें विसरून जायची तयारी दर्शविली. कारण त्याला असें वाटलें कीं आपली बाजूच खरी ठरली यांत सगळें कांहीं आपल्याला मिळालें. आपले चोरीला गेलेले पैसे त्याला परत मिळायला मुळींच नको होते. परंतु रॉनीसमोरचे प्रश्न येवढ्यानेंहि पुरते सुटत नव्हते याची वाट काय ? रॉनीनें घडलेला सगळा खराखरा प्रकार आपल्या पत्नीसमोर एकदांचा उघड करून सांगितला. परंतु पहिल्या प्रथम ती खुद्द त्याच्या म्हणण्यावरच विश्वास ठेवायला कबूल होईना. शेवटीं तिनें हो ना करतां करतां येवढें कबूल केलें कीं " तुम्हांला जिथं जायला हवं असेल तिथं तुमच्या बरोबर यायला मी तयार आहे. "

परंतु रॉनीनें पळून जाण्याची सगळी व्यवस्था करायच्या अगोदरच पोलिस त्याला पकडायला वारंट घेऊन हजर झाले. तेवढ्यांत तो आपल्या खोलींत पळाला आणि पोलिस अधिकाऱ्यांना हांक मारून म्हणाला : " या इकडे माझ्या खोलींत, आणि पकडा मला. " परंतु ते त्याच्यापर्यंत पोंचायच्या अगोदरच त्यानें स्वतःवर पिस्तुल झाडून घेऊन जीव दिला.

रॉनीला एक गोष्ट शेवटपर्यंत कळली नाहीं. ती ही कीं खुद्द तो आणि

द लेव्हिस हे दोघेहि सामाजिक प्रघातांना बळी पडलेले इसम होते. रॉनी शिष्ट समाजाचा घटक होता म्हणून त्याच्या मित्रांनीं आपली निष्ठा त्याला वाहून टाकली. परंतु आतां या मित्रांच्याहि ध्यानांत येऊन चुकलें कीं नुसत्या निष्ठेनें काम भागत नाहीं; निष्ठेच्या जोडीला आणखी कांहीं तरी असावें लागतें.

## मॅकबेथ

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* विल्यम शेक्स्पियर ( १५६४-१६१६ ). *कथानकाचा प्रकार :* अद्भुतरम्य शोकान्तिका. *काळ :* अकरावें शतक. *स्थळ :* स्कॉटलंड. *पहिला प्रयोग :* १६०६.

*प्रमुख पात्रें :* **मॅकबेथ**, स्कॉटलंडमधील एक मध्यम श्रेणीचा सरदार. **लेडी मॅकबेथ**, त्याची पत्नी. **डंकन**, स्कॉटलंडचा राजा. **माल्कम**, त्याचा पुत्र. **बॅन्क्वो**, स्कॉटलंडमधील एक वरिष्ठ सरदार. **मॅकडफ**, राजाविरुद्ध बंड करून उठलेला एक सरदार.

*समीक्षण :* एक अत्यंत कल्पक, महत्त्वाकांक्षी व सदसद्विवेकबुद्धीच्या आधीन झालेला सरदार आपल्या पत्नीच्या चिथावणीमुळें खून करायला प्रवृत्त कसा झाला याची कहाणी म्हणजेच " द ट्रॅजेडी ऑफ मॅकबेथ " ( मॅकबेथची शोकान्तिका ) हें नाटक. शेक्स्पियरच्या लहानांत लहान नाटकांमध्यें याची गणना होते. मॅकबेथ हा पहिल्या प्रथम मोठा इभ्रतदार व नेक माणूस होता. पण त्याच्या अंगीं एक मोठा दोष होता. तो म्हणजे महत्त्वाकांक्षा. सत्ता हातीं घेण्याची संधि त्याच्याकडे चालून आल्यावर त्यानें आयुष्यांतला पहिला गुन्हा केला. मागाहून हें पहिलें पाप लपविण्यासाठीं त्याला अधोगतीची परमावधि गांठावी लागली. " मॅकबेथ " नाटकांतील रौद्र पार्श्वभूमि, त्यांतला तो उदासवाणा किल्ला आणि तें भयानक ओसाड माळरान—या सगळ्या गोष्टी नाटकाच्या एकंदर विलक्षण खुलावटीला साजेशाच आहेत.

*कथानक :* स्कॉटलंडमधील एका ओसाड माळावर तीन चेटकिणी आपलीं उखाण्यांच्या धर्तीचीं गाणीं गात होत्या. आपल्याला लवकरच मॅकबेथची भेट होईल असेंहि त्यांनीं या गाण्यांतूनच सांगून टाकलें.

मॅकबेथ हा ग्लॅमिसचा नांवाजलेला सरदार होता. त्यानें नुकतीच उत्तरेकडील व्हाइकिंग या चांचे लोकांशीं व स्कॉटलंडमधील बंडखोरांशीं एक मोठी

लढाई करून विजय मिळविलेला होता. त्याच्या या शौर्यशाली पराक्रमाचें बक्षीस म्हणून स्कॉटलंडचा राजा डंकन त्याला कॉडरच्या बंडखोर सरदाराच्या जमिनी बहाल करणार होता.

परंतु राजेसाहेबांना भेटायला जायच्या अगोदरच वाटेंतल्या अंधारमय ओसाड माळावर मॅकबेथ व त्याचा मित्र बॅन्क्वो या दोघांना त्या तिघी विलक्षण चेट-किणींनीं गांठलें. त्या तिघी पिसाट व भयंकर बायांनीं मॅकबेथला तीन टप्प्यांनीं अभि-वादन केलें. प्रथम त्यांनीं त्याला ग्लॅमिसचा सरदार म्हणून गौरविलें. नंतर त्यांनीं त्याला कॉडरचा सरदार ही पदवी बहाल केली. आणि शेवटीं तर त्यांनीं स्कॉटलंडचा राजा म्हणून त्याचा जयजयकार केला. याच्याहि पुढें जाऊन त्यांनीं असें देखील भविष्य वर्तविलें कीं आणखी कांहीं वर्षांनीं बॅन्क्वोचे वंशज स्कॉटलंड-वर राज्य करतील.

त्या तिघी थेरड्यांना मॅकबेथ कांहीं प्रश्न विचारायच्या प्रयत्नांत होता. परंतु तेवढ्यांत त्या एकदम अदृश्यच झाल्या. त्यांच्या या विचित्र भविष्यवाणीचा विचार मॅकबेथनें तसा फारसा मुळीं केलाच नाहीं. परंतु तितक्यांत राजा डंकन याजकडून आलेल्या जासुदांपैकीं एक त्याला भेटला आणि त्यानें सांगितलें कीं "मॅकबेथसाहेब, आपण आतां कॉडरचे सरदार झाले आहांत !" ही बातमी ऐकून मॅकबेथ सुन्नच झाला. त्यानें लगेच बॅन्क्वोकडे वळून विचारलें: "काय रे मित्रा, त्या चेटकिणींची भविष्यवाणी खरी झाली असं यावरून समजायचं का ?" परंतु बॅन्क्वो तसा वस्ताद होता. तो त्या चेटकिणींच्या मुळींच आहारीं गेला नाहीं. त्यानें मॅकबेथला उलट इशारा देऊन ठेवला. तो म्हणाला: "या चेटकिणी महा नीच आहेत. त्या तुला दगा देतील. तुझ्या महत्त्वाकांक्षेला चालना देऊन आपली भविष्यवाणी तुझ्या हातून खरी करून घेण्यापायीं तुला फशीं पाडतील."

तथापि बॅन्क्वोच्या या इशाऱ्याकडे मॅकबेथनें लक्षच दिलें नाहीं. या चेटकिणींनीं आपल्याला राजा म्हणून गौरविलें, ही गोष्ट मॅकबेथच्या मनांत घर करून बसली. आपण राजा होण्याची कितपत शक्यता आहे, याचा तो गंभीर-पणें विचार करूं लागला. आणि हें ध्येय साध्य करण्यासाठीं आपली सगळी शक्ति पणाला लावायची असा त्यानें मनोमन निश्चय करून टाकला. आपण कॉडरचे सरदार तर झालोंच आहोंत. मग सगळ्या स्कॉटलंडचें राजपद तरी

आपल्याला मिळणें अशक्य कां असावें ? परंतु या घटकेला स्कॉटलंडवर डंकन राजा राज्य करतो आहे आणि त्याच्या मागाहून त्याची गादी चालवायला त्याचे दोघे मुलगेहि आहेत. अशा परिस्थितींत आपल्याला राजपद मिळणें हा प्रश्न महा कठीण आहे ही गोष्ट तर अगदीं उघड दिसते. म्हणून आपलें महत्त्वाकांक्षी स्वप्नरंजन त्यानें मनांतून झटकून टाकलें आणि तो राजा डंकन याला भेटण्यासाठीं बॅन्क्वोसमवेत पुढें चालूं लागला.

राजा डंकन तसा फार चांगला राज्यकर्ता होता. तो प्रेमळ होता, राजबिंडा होता, विनयशील होता आणि सामर्थ्यशाली होता. मॅकबेथची त्याच्यावर जबर निष्ठा होती. परंतु "माझा मुलगा माल्कम माझ्या पश्चात स्कॉटलंडच्या गादीवर बसेल" असें डंकन राजानें सांगतांक्षणीं मॅकबेथच्या मनांत विकल्प शिरला. हा माल्कम आपल्या मार्गांत एक धोंड होऊन बसला आहे असें मॅकबेथला वाटूं लागलें. आणि ही धोंड आपल्याला किती तापदायक होत आहे हें स्वतःच्या मनाशीं कबूल करायची हिंमत मॅकबेथला कांहीं केल्या होईना.

एकदां राजेसाहेबांची दरबारी थाटांत मिरवणूक निघाली. त्या प्रसंगीं राजेसाहेब डंकन यांनीं अशी इच्छा प्रदर्शित केली कीं "सरदार मॅकबेथ यांच्या किल्ल्यावर आम्हीं एक रात्रभर मुक्काम करणार आहोंत." इकडे लेडी मॅकबेथ हिला चेटकिणींची भविष्यवाणी कळलेली होती. ती तर आपल्या पतीपेक्षांहि अधिक महत्त्वाकांक्षी होती. राजाचें आपल्या घरीं आगमन ही तर मॅकबेथला राजपद मिळवायला सुवर्णसंधि आयती चालून येत आहे असें तिला वाटलें. तिनें या संधीचा फायदा घ्यायचा निर्धार केला. याच वेळीं आपल्या पतीनें डंकनचा खून करावा आणि जबरदस्तीनें राजसिंहासन बळकावावें असें तिनें ठरवूनच टाकलें.

त्या रात्रीं किल्ल्यावर मोठी थाटाची मेजवानी झाली. हा कार्यक्रम आटोपल्यावर सगळी मंडळी झोंपी गेली. लेडी मॅकबेथ मात्र जागीच होती. तिनें राजाच्या खुनाची आपली योजना मॅकबेथला सांगितली. ती ऐकून मॅकबेथ पहिल्या प्रथम खूपच घाबरला. त्यानें हें कुकर्म करण्याचें साफ नाकारलें. त्याबरोबर लेडी मॅकबेथनें त्याच्यावर भेकडपणाचा आरोप केला. तिनें आपल्या पतीच्या भावी राजवैभवाचें चित्र त्याच्या मनश्चक्षूंसमोर उभें केलें. एका बाजूनें निर्भर्त्सना, दुसऱ्या बाजूनें आमिष दाखविणें, असा दुहेरी प्रयोग तिनें

त्याच्यावर केला. शेवटीं तिची मागणी त्यानें अगतिक होऊन मान्य केली. तो हळूच चोरपावलांनीं डंकन राजाच्या शयनमंदिरांत गेला आणि त्यानें झोंपलेल्या राजाच्या छातींत सुरा भोंसकला.

खून तर केला. आतां तो पचवायचा कसा? लेडी मॅकबेथनें यावरहि एक तोड अगोदरपासून योजून ठेवलेली होती. तिनें डंकन राजाचें रक्त दोघां झोंपलेल्या मोतद्दारांच्या अंगावर चोपडलें. म्हणजे त्या दोघांनींच खून केला असा पुरावा तयार झाला. परंतु खरा प्रकार काय घडला याबाबत किल्ल्यांतल्या लोकांना संशय आल्याखेरीज राहिला नाहीं. आणि खून झाल्याचें उघडकीस येतां-क्षणीं मृत डंकन राजाचे दोन्ही मुलगे स्वतःचे जीव बचावण्यासाठीं स्कॉटलंड-मधून पळून गेले. माल्कम गेला इंग्लंडला आणि डोनाल्बेन गेला आयर्लंडला. सरदार मॅकबेथ याची राजा म्हणून ग्वाही फिरली. परंतु राजा डंकन याचा जिवलग स्नेही सरदार मॅकडफ यानेंहि या खुनाची अगदीं काळजीपूर्वक नोंद घेतली. हें कृष्णकृत्य मॅकबेथनेंच केलें असलें पाहिजे असा जबर संशय मॅकडफला आला. खुद्द मॅकबेथचा राज्याभिषेक झाला त्या वेळीं तर मॅकडफचा हा संशय आणखीच बळावला.

आतां मॅकबेथला एकापेक्षां एक भयंकर स्वप्नें पडूं लागलीं. त्याच्या मनांत भीतीनें कायमचें ठाण मांडून ठेवलें. कधीं कधीं त्या चेटकिणींच्या भविष्य-वाणींतला दुसरा भाग त्याला आठवूं लागे. बॅन्क्वोचे वंशज स्कॉटलंडच्या राज-गादीवर बसतील या भविष्यवाणीच्या आठवणीनें तो अतिशय बेचैन होऊं लागला. आपण स्वतः येवढे अपार कष्ट करून हें राजवैभव मिळविलें, त्याचा हिस्सा बॅन्क्वोला कधींच मिळतां कामा नये हा मॅकबेथचा अगदीं कृतनिश्चिय झाला. म्हणून त्यानें असें पक्कें ठरवून टाकलें कीं बॅन्क्वो आणि त्याचा पुत्र फ्लीआन्स या दोघांचेहि खून पाडून स्कॉटलंडची राजगादी आपल्या वंशासाठीं निष्कंटक करून ठेवायची.

मग या नव्या दोन खुनांची सिद्धता झाली. लेडी मॅकबेथ आणि तिचे पतिराज मॅकबेथ राजेसाहेब यांनीं स्कॉटलंडमधील सगळ्या सरदार लोकांना एक भली मोठी मेजवानी दिली. या मेजवानीला बॅन्क्वो व त्याचा पुत्र या दोघांनाहि खास निमंत्रण होतें. वाटेंत येतां येतांच या दोघांना गांठून त्यांचे खून पाडण्यासाठीं मॅकबेथनें मारेकरी धाडून दिले. त्या झटापटींत बॅन्क्वो ठार झाला. पण त्याचा

पुत्र फ्लीआन्स मात्र मारेकऱ्यांच्या हातांवर तुरी देऊन निसटला. दरम्यान बॅन्क्वो हजर नाहीं म्हणून मॅकबेथनें मेजवानीच्या ऐसपैस दालनामध्यें जमलेल्या सरदार मंडळींसमोर आपल्याला खूप खेद होत असल्याची यथास्थित बतावणी केली.

परंतु काय आश्चर्य ! बॅन्क्वो स्वतः त्या मेजवानीला हजर राहूं शकला नाहीं, तरी त्याचें भूत मात्र तिथें हजर राहिलें. या भुतानें राजविलासी रुबाबांत खुद्द मॅकबेथच्याच आसनाचा कबजा घेतला. तें भूत बघून मॅकबेथ दचकला. त्याची बोबडीच वळली. त्याच्याखेरीज इतर कुणालाच तें भूत दिसलें नाहीं. भुताला पाहून त्याची भयंकरच त्रेधातिरपीट झाली. इतकी कीं त्याचा बुद्धिभ्रंश होऊन तो आपला गुन्हा कबूल करायच्या अगदीं बेतांत आला. तथापि लेडी मॅकबेथ मोठी प्रसंगावधानी. तिनें त्याला चटकन दुसरीकडे नेलें आणि राजेसाहेबांची प्रकृति एकाएकीं बिघडल्याची सबब सांगून सगळ्या पाहुण्यांना ताबडतोब वाटेला लावलें.

मॅकबेथनें जी धास्ती घेतली, तिला कांहीं सुमारच राहिला नाहीं. बॅन्क्वोचें भूत तर त्याच्या एकसारखें बोकांडींच बसून राहिलें. तें जें मेजवानीनंतर पुन्हां परत आलें, तें जागचें हलतां हलेना. त्यांत बॅन्क्वोचा पुत्र फ्लीआन्स पळून गेलेला. तो स्कॉटलंडच्या राजगादीवर हक्क सांगायला केव्हां येईल त्याचा काय नेम ? या सगळ्या विचारांनीं मॅकबेथ इतका त्रासून गेला कीं त्यानें त्या ओसाड माळावरील चेटकिणींना गांठून आपल्या मनाला शांति मिळते का बघावी असा निश्चय केला. मग तो त्या चेटकिणींना एकदांचा भेटला. त्यांनीं त्याला असें आश्वासन दिलें कीं “ राजा, तूं कांहीं काळजी करूं नकोस. स्त्रीच्या पोटीं जन्माला आलेला कोणीहि माणूस तुझ्यावर मात करूं शकणार नाहीं. दुसरी गोष्ट अशी : बिर्नामचं जंगल जोंपर्यंत डुन्सिनाने टेकडीपर्यंत चालून येत नाहीं, तोंपर्यंतहि तुला कुणाकडून देखील धोका नाहीं. तूं अगदीं निर्धास्त राहा.”

मात्र जातां जातां त्या चेटकिणींनीं मॅकबेथला एक धोक्याचा इशारा देऊन ठेवला. त्या म्हणाल्या : “राजा, तूं मॅकडफपासून तेवढा अतिशय सावध राहा. त्याच्यापासून तुला केव्हां धोका पोंचेल याचा कांहीं नेम सांगवत नाहीं.” मग मॅकबेथनें धीर करून त्या चेटकिणींना विचारलें : “ पण काय हो, बॅन्क्वोचीं मुलं स्कॉटलंडवर राज्य करतील असं भविष्य तुम्ही वर्तवून ठेवलेलं आहे, तें खरं

होईल का?" त्याच्या या प्रश्नाला कांहीं एक उत्तर न देतां त्या चेटकिणी एकदम अदृश्य झाल्या. त्यांनीं दिलेल्या बातमीमुळें त्याला पुष्कळच धीर आला. मॅकबेथला असें वाटलें कीं आतां आपण कोणत्याहि माणसाला भिण्याचें कांहीं एक कारण नाहीं. एक तर सगळेच स्त्रीच्या पोटीं जन्माला आलेले असणार; आणि दुसरें असें कीं बिर्नामचें येवढें मोठें जंगल जाग्यावरून हलवून दुसरीकडे नेणें ही मानवी शक्तीच्या आवांक्याबाहेरचीच गोष्ट आहे.

मग मॅकबेथच्या कानांवर अशी बातमी आली कीं इंग्लंडमध्यें बसून मॅकडफ आपल्याविरुद्ध चाल करून येण्यासाठीं फौजेची जमवाजमव करीत आहे. या फौजेचें नेतृत्व मृत राजा डंकन याचा मुलगा माल्कम हाच घेणार आहे; स्वतःच्या वडिलांच्या खुनाचा बदला घेण्याचा निर्धार माल्कमनें केलेला आहे. ही बातमी ऐकून मॅकबेथ इतका हवालदील झाला कीं बंडवाल्यांना अद्दल घडवून ताळ्यावर आणण्यासाठीं मॅकडफची पत्नी व मुलें यांना ठार करण्याचा त्यानें निश्चय केला. परंतु ही कत्तल उरकल्यानंतर त्याला पूर्वीपेक्षां अधिक स्वस्थता वाटण्याऐवजीं त्याला भलत्याच धास्तीनें अगदीं हैराण करून टाकलें. त्याच्या विकृत मनाला स्वतःच्या हातून घडलेल्या भयंकर पापांचा ताण सहन करणें आतां जवळ जवळ अशक्य होऊन बसलें. आपल्या छातीवर सतत भूत बसलेलें आहे अशा मनःस्थितींत जीव जगविण्यापेक्षां मरण पतकरून या सगळ्यांतून आपली कायमची सुटका करून घ्यावी असें त्याला फार फार वाटूं लागलें.

इकडे लेडी मॅकबेथची जबरदस्त इच्छाशक्ति देखील फार काळ तग धरूं शकली नाहीं. तिलाहि लवकरच तडे जाऊं लागले. खून व अत्याचार यांचीं काळीं-कुट्ट स्वप्नें तिला एकसारखीं सतावूं लागलीं आणि त्यांपायींच तिला शेवटीं वेड लागलें. आपल्या हातून घडलेल्या गुन्ह्यांचा भयानकपणा तिच्या मनाला खाऊं लागला. आणि मॅकबेथ राजाचे सगळेच प्रजाजन आपला सतत द्वेष करणार व आपल्याला सतत भीत राहणार या विचारानें तिच्या मनाला इंगळ्या डसल्याप्रमाणें वेदना होऊं लागल्या. या सगळ्यांच्या परिणामीं तिची प्रकृति इतकी ढांसळली कीं ती आतां फार दिवस जगणार नाहीं हें उघड दिसूं लागलें.

आणि मॅकबेथच्या किल्ल्यावर मॅकडफच्या हल्ला होण्याच्या आदल्याच सायं-काळीं लेडी मॅकबेथनें प्राण सोडला. मागच्या सगळ्या घडामोडींच्या वेळीं तिनेंच त्याला धीर देऊन मजबूत केलेलें होतें. तिच्या अभावीं आतां मॅकबेथचें सगळें

धैर्य साफ गळून गेलें. तरी पण त्यांतल्या त्यांत होती नव्हती तेवढी सगळी शक्ति एकवटून मॅकबेथनें शत्रूच्या हल्ल्याला तोंड देण्याची तयारी केली. दरम्यान बिर्नामचें जंगल चालायला लागलें होतें. कारण माल्कमच्या सैनिकांनीं हिरव्या पानांनीं गजबजलेल्या झाडांच्या फांद्या तोडून त्यांच्या आड दडून आगेकूच चालविलेलें होतें. त्यामुळें दुरून पाहणाराला जणूं काय जंगलच चालून येत आहे असें दिसत होतें. आपल्या निरपराध बायकामुलांच्या क्रूर कत्तलीमुळें मॅकडफच्या संतापाला पारावार उरलेला नव्हता. त्यानें मॅकबेथला समक्ष गांठून त्याच्याशीं द्वंद्व युद्ध करून या अत्याचाराचा बदला घेण्याचा पक्का निर्धार केलेला होता.

मॅकबेथ मोठ्या आत्मविश्वासानें लढाईच्या मैदानांत उतरला. आईच्या पोटांतून जन्माला आलेला कोणीहि माणूस आपल्याला उलथून पाडूं शकणार नाहीं हें त्या चेटकिणींनीं सांगितलेलें भविष्य आठवून त्यानें आपल्या अंगांत खोटेंच धैर्य बाणवून घेतलेलें होतें. मॅकडफची समोरासमोर गांठ पडतांच मॅकबेथ त्याच्याशीं लढूं लागला. त्याच वेळीं तो त्याला असा टोमणा मारूं लागला कीं "कांहीं झालं तरी तूं आपल्या आईच्या पोटांतूनच जन्माला आला आहेस. तुझ्या हातून माझा पराभव होणार नाहीं हें नक्की. होऊनच जाऊं देत आपले दोन हात!" परंतु मॅकडफच्या जन्माच्या वेळीं त्याच्या आईचा गर्भाशय चिरून काढल्यावर मगच त्याचा जन्म झालेला होता. अशा प्रकारें त्या चेटकिणींची भविष्यावाणी तंतोतंत खरी ठरली. लढतां लेढतां मॅकबेथची ताकद कमी कमी होऊं लागली. त्यानें मनांत बाळगलेली विजयाची सगळी आशा वाऱ्यावर विरून गेली. मॅकडफनें हात उंच करून जोराचा वार केला. त्या सरशीं स्कॉटलंडच्या या रक्तलांच्छित राजाचें शिर धडापासून वेगळें झालें.

## कॅडमुस

*वाङ्मयप्रकार :* अभिजात दंतकथा. *आधार :* लोककथांची परंपरा. *कथानकाचा प्रकार :* शौर्यशाली साहसकथा. *काळ :* अतिप्राचीन काळ. *स्थळ :* प्राचीन ग्रीस. *प्रथम लेखन :* अज्ञात.

*प्रमुख पात्रें :* **कॅडमुस,** थीब्रीस नगरीचा संस्थापक. **ज्युपिटर,** देवांचा राजा. **मिनर्व्हा,** ज्युपिटरची कन्या. **मार्स** ( मंगळ ), युद्धाचा अधिष्ठाता देव. **हार्मोनिया,** कॅडमुस याची पत्नी.

*समीक्षण :* अत्यंत लोकविश्रुत अशा पौराणिक कथांमध्यें कॅडमुस या कथेची गणना होत नाहीं. तथापि ही एक महत्त्वपूर्ण कथा आहे. कारण हिचाच आधार घेऊन त्यावर इतर अनेक कथांची उभारणी झालेली आहे. इतर अनेक मोठमोठ्या अभिजात कथांच्या नायकांप्रमाणें कॅडमुस कमींत कमी तीस शतकांपूर्वी होऊन गेला. त्याच्या मोठमोठ्या शौर्यशाली कृतींच्या गाथा पुन्हां पुन्हां सांगण्यांत आलेल्या आहेत. दरेक कथेच्या निवेदनांत थोडा थोडा फरक होत गेला. ही दुनिया ज्या काळामध्यें देवादिकांचें क्रीडांगण होती, त्या काळीं देव-देवता, सर्पादि प्राणी व मोठमोठे राक्षस आणि इतर महाशक्तिशाली प्राणी सर्वत्र भटकत असत असा समज आहे, आणि या सर्वांची भेट आपल्याला कॅडमुसची ही कथा वाचतांना होते. त्या शौर्यशाली कालखंडामध्यें सगळ्या गोष्टी घडूं शकत असत असा लौकिक समज आहे.

*कथानक :* ज्युपिटरनें बैलाचें रूप घेतलें आणि फेनिशियाचा राजा आगेनॉर याची कन्या युरोपा हिला पळवून नेलें. तिच्या दासींनीं ही बातमी राजाला कळविली, तेव्हां त्यानें आपला पुत्र कॅडमुस याला फर्माविलें : "तिचा शोध करायला जा आणि ती सांपडेपर्यंत परत येऊं नकोस."

अनेक अनोळखी देशांमध्यें त्यानें आपल्या बहिणीचा कैक वर्षें शोध केला. त्यानें खूप मेहनत घेऊन हें काम केलें, अनेक राक्षसांना ठार मारलें, कितीदां तरी आपला जीव धोक्यांत घातला, पण त्याला कांहीं केल्या तिचा पत्ता लागेना. वडिलांकडे परत जायचें त्याला भय वाटलें आणि त्यानें डेल्फी येथील अपोल्लो देवाला कौल लावला आणि विचारलें : "मी आतां कुठं स्थाईक व्हावं?" देवानें त्याला सांगितलें : "तुला शेतांत एक गाय सांपडेल आणि तिच्या पाठोपाठ जर तूं गेलास तर ती तुला एका चांगल्या देशांत घेऊन जाईल. ती जिथं थांबेल तिथं तूं एक मोठं शहर वसव आणि त्याला थीबीस असं नांव दे."

लवकरच एक गाय आपल्या पुढ्यांत चालत आलेली त्याला दिसली आणि तो तिच्या पाठोपाठ चालूं लागला. शेवटीं ती गाय पानोपेच्या मैदानावर थांबली. कॅडमुसनें देवांना धन्यवाद देण्याची तयारी केली. बळी देण्याप्रीत्यर्थ स्वच्छ पाणी शोधून आणायला त्यानें आपले गुलाम धाडून दिले. एका गर्द राईत त्यांना एक छानसा निर्मळ झरा सांपडला. पण त्या झऱ्यावर मार्स देवाचा पाठिंबा असलेला भयंकर सर्प-राक्षस पाहरा करीत होता. त्याच्या अंगावरचे

खवले सोन्यासारखे झळाळत होते आणि त्याच्या शरीरामध्यें जलाल विष भरलेलें होतें. त्याला तीन जिभा होत्या. त्याच्या जबड्यांत अक्राळविक्राळ आडव्या-तिडव्या दांतांच्या तीन तीन कवळ्या एकीमागें एक असलेल्या दिसत होत्या. केवळ धन्याला खूष करण्याच्या इराद्यानें गुलामांनीं आपल्या घागरी झऱ्यांत बुडविल्या आणि तत्काळ त्या सर्वांना राक्षसानें ठार करून टाकलें.

गुलाम परत येतील म्हणून कॅडमुसनें अनेक तास वाट पाहिली आणि तो स्वतःच त्या राईत गेला. पाहतो तों त्याच्या इमानी गुलामांचे छिन्नविछिन्न देह तिथें पडलेले होते आणि जवळच त्या झऱ्याचा रखवालदार अक्राळविक्राळ राक्षस उभा होता. प्रथम त्या राक्षसावर त्यानें एक भला मोठा धोंडा भिरकावला. त्या धोंड्यामुळें त्या झगझगत्या खवल्यांना पोंचा देखील आला नाहीं. मग त्यानें आपली बर्ची उगारली आणि ती त्या सर्प-राक्षसावर भिरकावली. ती त्या सर्प-राक्षसाच्या खवल्यांमधून आरपार शिरून त्याच्या आंतड्यांत घुसली. तो राक्षस ती बर्ची आपल्या तोंडानें बाहेर ओढून काढायची खटपट करीत असतां तिचें पातें मोडलें, तें त्याच्या अंगांत खुपत राहिलें. संतापानें तट्ट फुगून तो राक्षस कॅडमुसवर चालून गेला. प्रथम कॅडमुसनें त्याच्यापुढें माघार घेतली आणि मग त्यानें आपला भाला त्याच्यावर अशा रीतीनें फेंकला कीं त्यामुळें तो राक्षस एका झाडाला चिणून राहिला अणि तिथेंच त्याचा प्राण गेला.

या प्रचंड प्राण्याकडे कॅडमुस टक लावून बघत उभा राहिला, येवढ्यांत मिनर्व्हा देवतेची आकाशवाणी त्याच्या कानीं आली. ती म्हणाली: "या राक्षसाचे दांत तूं एका शेतामध्यें पेरून टाक." हें पेरणीचें काम त्यानें पुरें केलें असेल नसेल येवढ्यांत तिथल्या प्रत्येक दांतामधून एकेक चिलखतधारी वीर उगवून वर आला. कॅडमुसला वाटलें कीं या सगळ्या वीरांना आपण ठार मारलें पाहिजे, नाहीं तर आपणच आपला जीव गमावून बसूं. म्हणून तो या वीरांवर चाल करून गेला. पण पुन्हां मिनर्व्हा देवतेची आकाशवाणी झाली. ती म्हणाली : "त्यांना तूं मारूं नकोस." मग हे वीर आपसांतच लढूं लागले आणि या यादवीमध्यें पांच वीर वगळून बाकीचे सगळे ठार झाले. हे पांचजण मागाहून कॅडमुसकडे आले आणि म्हणाले : "आम्ही तुमची चाकरी करूं." या सहा वीरांनीं थीबीस शहराची उभारणी केली.

मार्स देव आणि सौंदर्यदेवता व्हीनस यांची कन्या हार्मोनिया ही ज्युपिटर

देवानें कॅडमुसला अर्पण केली. ती त्याची पत्नी झाली. या जोडप्याला आशीर्वाद द्यायला सगळे देव ऑलिम्पस पर्वतावरून मुद्दाम खालीं आले. व्हल्कन देवानें एक झगझगीत गोफ मुशींत घालून आपल्या हातांनीं तयार केला आणि तो वधूला अहेर म्हणून दिला. या जोडप्याला चार मुलें झालीं आणि कांहीं काळ मुलां-बाळांसमवेत त्यानें गुण्यागोविंदानें संसार केला. परंतु त्या सर्प-राक्षसाला ठार केल्यावर मार्स देवाचा प्रकोप कॅडमुसच्या शिरावर कायमचा लटकत होता. मार्स देवानें कॅडमुसच्या सगळ्या मुलांना मारून टाकवून त्याच्यावर सूड उगविला.

कॅडमुस व हार्मोनिया हें जोडपें हताश होऊन थीबीस नगरी सोडून गेलें. त्यांनीं एन्चेलियन लोकांच्या देशाकडे प्रयाण केलें. या लोकांनीं कॅडमुसला आपला राजा केलें. परंतु मार्स देवाच्या शापामुळें त्याच्या मनाला शांतता अशी मुळींच लाभेना. एके दिवशीं तो हार्मोनियाला म्हणाला : " सर्प जर देवांचा येवढा लाडका असेल तर मी स्वतःच सर्प होऊं इच्छितों." त्याच्या तोंडून हे उद्गार निघायचा अवकाश, कीं लगेच त्याच्या अंगावर खवले दिसूं लागले आणि त्याचें रूप पालटत चाललें. आपल्या पतीला सर्पाचें रूप प्राप्त झालेलें पाहून " मलाहि सर्पिणी होऊं द्या " अशी हार्मोनियानें देवांची प्रार्थना केली. दोघेंहि सर्परूप झालीं, परंतु त्यांनीं आपल्या मानवी बांधवांवरील आपलें प्रेम कायम ठेवलें आणि कुणालाहि कधींहि इजा म्हणून केली नाहीं.




जगप्रसिद्ध अशा ७६० लेखकांच्या ( यांत ३१ लेखक 'नोबेल प्राइझ' विजेते आहेत ) उत्कृष्ट अशा १६०० कलाकृतींचा सारांशरूप परिचय **अमर विश्व साहित्य** मालेंतून क्रमशः आपणांस सादर होईल.

या निवडक कलाकृतींत कादंबरी, कथा, नाटक, काव्य, चरित्र, इतिहास, तत्वज्ञान, प्रवास, निबंध, लोककथा इत्यादि सर्व साहित्य–प्रकार आढळतील.

प्रस्तुत तिसऱ्या भागांत कॅमील, अ डॉल्स हाऊस, हॅम्लेट, लेडी विंडरमियर्स फॅन, जस्टिस, द मर्चंट ऑफ व्हेनिस इत्यादि इंग्लिश, ग्रीक, फ्रेंच, नॉर्वेजियन, हंगेरियन अशीं एकवीस नाटकें आणि दोन इंग्लिश व एक जर्मन अशीं तीन नाट्य काव्यें, आणि एक ग्रीक लोककथा अशा एकंदर पंचवीस जगप्रसिद्ध ग्रंथांचे सारांश दिले आहेत.

**मूल्य रु. ३–५०**

